इस्किलस कृत ॲगमेम्नॉन, कोई फोरी, युमेनिडीज, सेव्हन अगेंस्ट थीब्ज, दी सप्लायंटस व प्रोमिथ्युस बाउंड या नाटकांचा अनुवाद

# ग्रीक शोकनाट्ये

अनुवाद

माधुरी भिडे

आ. ना. पेडणेकर

प्रभाकर उर्ध्वरेषे



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

# ग्रीक शोकनाट्ये



## (इस्किलसकृत ग्रीक नाटकांचा अनुवाद)



अनुवाद

सौ. माधुरी भिडे
आ. ना. पेडणेकर
प्रभाकर उध्वरिषे



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती - जुलै १९९०

प्रकाशक - सचिव
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
नवीन प्रशासन भवन,
मुंबई - ४०० ०३२.



मुद्रक : विकास म्हात्रे
रचना प्रिंटर्स
राऊत इंड. इस्टेट
पहिला मजला,
माहिम, मुंबई -४००० ०१६.

किंमत : रु. ७०/-

# अ नु क्र म णि का


| अ.क्र. | नाटकांचे नाव | पृष्ठ क्र. |
|---|---|---|
| १) | ॲगमेमनॉन | १ |
| २) | कोआीफोरी अथवा अर्घ्यधारिका | १२४ |
| ३) | युमेनिडीज् | २०८ |
| ४) | थीब्जवर सातांची चढाई | २८४ |
| ५) | शरणार्थी | ३४५ |
| ६) | शृंखलाबद्ध प्रोमिथ्यूस | ४०७ |




# ॲगमेमनॉन

पात्रे

पहारेकरी : आरगॉसमधील बारा श्रेष्ठींचा वृंद

क्लायटेमनेस्ट्रा : ॲगमेमनॉनची पत्नी

दूत

ॲगमेमनॉन : आरगॉसचा राजा

कॅसॅन्ड्रा : ट्रॉयची राजकन्या

इजिस्थस : क्लायटेमनेस्ट्राचा प्रियकर, ॲगमेमनॉनचा चुलतभाऊ

ॲगमेमनॉनच्या समवेतचे सैनिक

इजिस्थस समवेतचे रक्षक सैनिक

(रात्रीची वेळ आहे. सूर्योदयाला थोडा अवकाश आहे. ॲट्रियसच्या वाड्याच्या छतावर एक पहारेकरी उभा आहे, मधूनमधून ताशीव दगडावर पसरलेल्या एका छोट्या सतरंजीवरून उठतो आहे. राजवाड्यासमोर झ्यूस, ॲपोलो व हर्मिस ह्यांचे पुतळे आहेत. प्रत्येकासमोर एक वेदी आहे.)

पहारेकरी : हे देवांनो, करा माझी सुटका
हया दीर्घ शिणवणाऱ्या पहाऱ्यातून.
हे देवांनो, सोडवा मला.
पुरे बारा महिने, रात्रीमागून रात्री
एकाद्या कुत्र्यासारखा
पहारा करतो आहे मी
हया ॲट्रियसच्या राजवाड्याच्या उंच सौधावर.
रोज रात्री भरणारा ताऱ्यांचा दरबार --
थंडी आणि उष्णता क्रमाने आणणारे
हे तेजस्वी शास्ते
आकाशाला तेजाने भरून टाकतात.
ओळखतो मी प्रत्येकाला
रोज बघतो त्यांना

## ग्रीक शोकनाट्ये

उगवतांना नि मावळतांना
पण मला आस आहे ती मात्र
त्या एका ज्योतीची
एक नवा तारा --
पूर्वयोजित अशी ती खूण
तो खुणेच्या दिव्याचा प्रकाश
ट्रॉयमधून येणारा.
एकच शब्द उच्चारील तो - विजय
क्लायटेमनेस्ट्रासाठी मोठीच बातमी असेल ती
स्त्री असून जी हृदयात
मर्दाच्या हिंमतीने मनोरथ रचीत आहे.
आता पुन्हा, दंवाने न्हालेला मी
हिंडतो - पुन्हा झोपतो - पण मला स्वप्ने पडत नाहीत.
निद्रेची वैरीण - भीती पहारा करते आहे माझ्याजवळ.
पळभर सुद्धा डोळ्याला डोळा लागू नये म्हणून
जर मी काही गावे म्हटले –
म्हणतात ना की संगीत हे
हृदयविकारावरले एकमेव औषध आहे.
तर अश्रू झरतात डोळ्यांतून
किती बदलले आहे हे घर ह्या विचाराने.
मावळले ते जुन्या काळातले वैभव
की जेव्हा इथला हक्कदार
ह्या घराचा स्वामी होता.
म्हणून देव कृपा करोत आणि पाठवोत तो प्रकाश
ह्या अंधाऱ्या रात्रीला शुभ बातमीने उजळून टाकायला.

(खुणेचा उजेड दिसतो)

रात्रीला चेतवून तिला
तेजोमय दिवसाचे रूप देणाऱ्या
खुणेच्या स्वागतार्ह तेजा,

ॲगमेमनॉन

तुझे स्वागत असो.
तुझ्याबरोबर आलेला निरोप ज्यांना ऐकवशील त्यांना
आरगॉसच्या रस्त्यातून
आनंदाने नाचायला लावशील तू.
कोण आहे रे तिकडे! अहो!
क्लायटेमनेस्ट्राला जागी करा.
आमच्या राणीने उषेप्रमाणे उठले पाहिजे
तावडतोब तिच्या शय्येतून
आणि केले पाहिजे स्वागत ह्या ज्योतीचे
श्रद्धापूर्ण शब्दांनी आणि
उच्च स्वराने केलेल्या विजयघोषाने.
कारण- इलीयन शहर आमचे झाले आहे.
स्पष्ट आहे ह्या ज्योतीचा अर्थ.
विजयाचे नृत्य सुरू करण्यात
पुढाकार असेल माझा स्वतःचाच
मी म्हणू शकेन आता
की देवांची कृपा आहे
माझ्या स्वामीच्या पराक्रमावर
आणि माझ्यासाठी सुद्धा
भाग्याचाच ठरणार आहे हा खुणेचा अग्नी
आता ईश्वरकृपेने
सुखरूप येवो ॲगमेमनॉन स्वगृही
घेईन मी प्रेमाने त्याचा हात माझ्या हातात.
इतर कशाबद्दल मात्र
कुलूप लागलेले आहे माझ्या जिभेला.
जर भिंतींना जिभा असत्या
तर हे घरच सांगू शकले असते
स्पष्टपणे त्याची कहाणी.
ठीक, ठीक.
मी सुद्धा त्यांच्याशीच बोलतो
की ज्यांना माझे बोलणे समजेल.

दार बंद आहे माझे इतरांसाठी.
(पहारेकरी सौधाखाली उतरतो. राजवाड्यात हळूहळू दिवे लागतात. आतून क्लायटेमनेस्ट्राचा विजयोत्साहाचा उद्‌गार ऐकू येतो. इतर स्त्रिया तिला प्रतिसाद देतात. नंतर राजवाड्यातून एक दूत घाईघाईने बाहेर पडून शहराकडे जातो. त्याच्यामागून इतर सेवक हातात हवनासाठी तेलाचे बुधले, धूप आणि धूपदाण्या घेऊन वेगवेगळ्या दिशांना जाताना दिसतात. मग क्लायटेमनेस्ट्रा दोन अनुचरांसह राजवाड्यातून येते, ती झ्यूसपुढच्या वेदीवर धूप जाळते व त्याच्या पुतळ्यासमोर प्रार्थना करते.
हळूहळू उजाडत आहे. शहरातून आरगॉसचे श्रेष्ठी येतात. त्यांचे क्लायटेमनेस्ट्राकडे अजून लक्ष गेलेले नाही.)

श्रेष्ठीवृंद : ॲट्रियसचे बलदंड पुत्र
मेनेलॉस आणि ॲगमेमनॉन,-
सत्तेचा राजदंड आणि सिंहासन मिळवून
दोघेही झ्यूसकडून सम्मानित झालेले
त्यांनी आरगॉसची एक हजार जहाजे
हेलासच्या शस्त्रसज्ज युवकांसह
प्रायॅमने केलेल्या अपमानांचा बदला घेण्यासाठी
ह्या बंदरातून हाकारली

दहा वर्षं झाली ह्या घटनेला.
मग उच्चरवाने गरजला त्यांचा
युद्धाभिमुख क्रोध
शोकवेगाने वेड्यापिश्या झालेल्या गरुडांसारखे
जे एकाद्या उंच, एकाकी डोंगरमाथ्यावर
घिरट्या घालतात, तरंगत राहतात
त्यांच्या लुटल्या गेलेल्या घरट्यांवर,
वाऱ्यांच्या लाटांवर जणू वल्ही मारीत,
आणि आक्रोशतात.
त्यांच्या व्यर्थ झालेल्या श्रमांबद्दल

आणि हरपलेल्या अभिमानस्थानांबद्दल
जे त्यांनी सावधानपणे जपले हाते.
अखेरीस एकादी आकाशस्थ देवता
झ्यूस, पॅन अगर ॲपोलो
त्यांचा तो शब्दाला पारखा झालेला
दु:खी, दूरवर पोचणारा आक्रोश ऐकून
दया येऊन त्यांच्या हताश स्थितीची
(कारण स्वर्गाच्या संरक्षक छत्राखालीच असते ना अवकाश?)
पाठवतो एक वेगवान सूडदेवता
पाठलाग करून हल्लेखोर अपराधाचा योग्य तो बदला घेण्यासाठी

त्याचप्रमाणे
पॅरिसच्या अपराधी बढाईला जबाब म्हणून
झ्यूसने - साक्षीदार होता जो
अतिथी आणि गृहस्वामी यांच्यामधला
पाठवले ॲट्रियसच्या मुलांना
त्याच्या आणि हेलनच्या
विजयोन्मत्त वागणुकीचे
करण्यासाठी कडक पारिपत्य.
आता ग्रीस आणि ट्रॉय दोघेही
फेडताहेत आपले ऋण बरोबरीने
वेदनापीडित गात्रे, जखमा अणि घाम ह्यांच्या रूपाने
गुडघे बुडताहेत खोल जेव्हा रक्ताळलेल्या धुळीत
आणि भाल्यांच्या चिरफाळ्या होताहेत पहिल्याच घावात.
सध्या सारे आहे आता जसे दिसत आहे
तसे त्याचा शेवट मात्र होणार
नियतीदेवतेच्या हुकुमाला अनुसरून
जो कोणी फिरवू नाही शकत.
व्यर्थ जळत राहील अग्नि
प्रायॅमच्या वेदीवर
बहुमोल अर्घ्ये व्यर्थ वहातील

ग्रीक शोकनाट्ये

स्वर्गस्थ देवांसाठी आणि
अधोलोकातील शक्तींसाठी
कुठलीही देणगी
अगर यज्ञीय ज्वाला
शांतवू नाही शकणार
वा फिरवू नाही शकणार
स्वर्गाच्या कोपाला
त्याच्या आग्रही उद्दिष्टापासून.

फार वृद्ध होतो आम्ही तेव्हा
जे सैन्यात दाखल झाले
त्यांच्याबरोबर जाऊन
आपला जबाबदारीचा वाटा उचलायला.
काठ्यावर आपला भार टाकणारे आम्ही
आमची शक्ती बालकांची,
मर्दांची नव्हे.
म्हणून आम्हाला मागे ठेवले त्यांनी इथेच.
शक्तीहीनतेच्या दृष्टीने बालपण
आणि वार्धक्य सारखेच
अविकसित अवयवात, तसाच जीर्णशीर्ण अंगात
जीवनरस जणू निद्रिस्त असतो.
हिरव्या देठांना काटे नसतात
म्हणून पिकू लागलेल्या वयात
वृद्ध माणसांना तीन पायांवर चालावे लागते
जणू दुबळी बालकेच
आणि दिवसाच्या प्रकाशात
वाट चुकलेल्या स्वप्नासारखे चाचपडत
रहावे लागते भटकत.

(श्रेष्ठीवृंदाच्या मुख्याचे क्लायटेमनेस्ट्राकडे लक्ष जाते)

ॲगमेमनॉन

टिंडॅरिअसच्या कन्ये क्लायटेमनेस्ट्रा राणीसाहेब,
काय बातमी आली आहे कानांवर?
घडले आहे तरी काय?
साऱ्या शहरात होमहवन सुरू करण्याचा
हुकूम का दिला आहे आपण?
वर्तमान आले आहे का काही?
स्वर्गस्थ देव आणि अधोलोकातील शक्तींच्या –
आपल्या राज्याच्या संरक्षक अशा
या साऱ्या देवतांच्या वेदी
शहराशहरातील आणि गावागावातील वेदी
आहुतींनी प्रज्वलित होत आहेत
चारी बाजूंनी स्वर्गापर्यन्त धाव घेणाऱ्या ज्वाला
क्रोधाचे सौम्यपणात परिवर्तन करण्यासाठी विनवीत आहेत.
पवित्र लेपनाने ऐश्वर्यसंपन्न झालेली धग
असे दुर्मिळ लेपन की जे
केवळ राजभांडारातच उपलब्ध व्हावयाचे
हे सर्व का घडत आहे?
राणी साहेब, कृपा करा
सांगा जेवढे तुम्ही सांगू शकाल
अथवा जेवढे सांगण्याची तुम्हाला मुभा असेल.
सोडवा आम्हाला ह्या झपाटणाऱ्या भीतीतून
जी क्षणांत शत्रूसारखी दबतदबत
नजदीक येते
तर क्षणात आशा युक्त मनाला
या धीर देणाऱ्या धगधगणाऱ्या वेदी दिसताच
शरमिंदी अशी हळूच निघून जाते.
सांगा आम्हाला
म्हणजे आशा जागी होऊन हलका करील
आमच्या हृदयावरील
रात्रंदिवस पीडणारा
चिंतेचा भार

घडून गेलेल्या पापी घटनांनी
व्याकूळ झाली आहेत आमची हृदये
आणि ज्या पापी घटनांची चाहूल
आधीच लागली आहे
त्यांनीही व्याकूळ केले आहे आमच्या हृदयांना
(क्लायटेमनेस्ट्रा उत्तर न देता श्रेष्ठीवृंदाकडे पाठ करून उभी रहाते.
श्रेष्ठीवृंद प्रेक्षकांना उद्देशून बोलतो.)

ऐकणार असाल जर तुम्ही
तर तिच्या आशादायक सुरवातीपासून
सांगू शकेल सर्व कथा
असा आहे मीच एकटा माणूस
दहा वर्षे झाली त्याला
पण मी तिथे होतो उपस्थित
तेव्हा मिळालेल्या त्या घोर भविष्यसूचनेने
चकित झाले आमचे युद्धाला निघालेले तरूण
कवीवाणीचे लालित्य, गायकाचा घोष
वृद्धिंगत होतो वाढत्या वयाबरोबर
आणि मी अजूनही सत्य सांगू शकतो
ईश्वरदत्त असंदिग्ध खणखणीत स्वरात.
कसे आमच्या रणतत्पर जमातीचे
ते दोघे जुळे राजे
एकाच ध्येयाशी समरस झालेले असे दोन नेते
त्यांचे सूडबुद्धीने प्रेरित हजारो भाले
उत्तरेकडे ट्रॉयकडे रोखून
वाऱ्यासारखे भरारी मारीत निघाले ते
चार पंखांच्या फडफडाटाने प्रेरित होऊन.
त्या विशाल थोर आरमारांच्या. स्वामींच्या
सुयशाचे जणू भविष्य वर्तवीत,
पक्ष्यांचे दोन राजे
राजवाड्याच्या नजदीक

# ॲगमेमनॉन

रस्त्याच्या भालाफेकीच्या बाजूला –
एक केशरी भगव्या रंगाच्या पिसांचा
एक पांढऱ्या शेपटीचा
साऱ्यांच्या अगदी नजरेसमोर बसून
अधाशी वखवखलेल्या चोचींनी फाडीत होते ते
एक गर्भवती शशकजायेचे शरीर
गर्भभाराने जडावलेली होती ती
त्या गर्भातील जीव आता जितेपणीच
झाला होता शिकार
त्या अखेरीच्या अंधारात
दिवस कधी उजाडलाच नाही त्याचा
हाय! हाय!
त्या दु:खद घटनेसाठी करा आक्रोश
पण तरीसुद्धा
भल्याचा जय व्हायलाच हवा!
सेनेबरोबरच्या विद्वान भविष्यवेत्याने
पाहिले हे दृश्य
आणि ओळखले त्याने
की त्या ससाचे भक्षक
म्हणजेच ती आग्रही जोडी
स्वभावाने अगदी भिन्न
त्या दोन पक्ष्यांच्या भिन्न रंगांसारखे
ॲट्रियसचे ते दोन पुत्र
आणि युद्धाच्या सल्लागार मंडळात
केली त्याने भविष्याची घोषणा
"हे सत्य आहे की तुमचे सैन्य
योग्य वेळी बनवील
राजा प्रायॅमच्या नगरीला
आपले भक्ष्य.
ट्रॉयचे पुजारी तिच्या तटबंदीच्या रक्षणासाठी
प्रार्थनापूर्वक ज्यांचा देतील बळी

त्या (मेंढ्यांच्या आणि बैलांच्या) कळपांचे
बलिदान ठरेल व्यर्थ
ट्रॉयच्या घोर विनाशात होईल सार्‍यांचाच स्वाहाकार!
मात्र ट्रॉयच्या अहंकाराला
वेसण घालायला जाणार्‍यांनो,
एक लक्षात ठेवा की
देवांचा कोप तुमच्या उज्वल दिवसावर
अंधाराचे सावट न टाको
आणि तुमचे जहाज मार्गी लागण्यापूर्वी
त्यावर देवांच्या क्रोधाचा आसूड न पडो
कारण सर्व जिला भजतात
ती कुमारी आरटेमीस्
करते जीवघेणा द्वेष
त्या झ्यूसच्या शीघ्रवेगी पंखांच्या शिकारी कुत्र्यांचा
ज्यांनी भयाने वेड्यापिश्या झालेल्या
त्याच्या असहाय्य बळीवर
तीरासारखी झडप घालून हल्ला केला
तिच्या आशापूर्तीचा-प्रसूतीचा क्षण येण्यापूर्वीच
ज्यांनी धाडस केले धिक्कारण्याचे
मातृपदाच्या हक्काभोवतीच्या दिव्य वलयाचे –
स्वर्गस्थ देवांच्या नावाने आचरणीय विधीभोवती
असेच असते आदरयुक्त भीतीचे दिव्य वलय.
असे सावधगिरीचे शब्द बोलला उपाध्याय
होय खरेच! आरमेटिस तिटकारा करते
त्या गरूडांच्या ताव मारणाऱ्या वर्तनाचा
बोला–हाय! हाय!
काय ही दुःखद घटना म्हणून आक्रोश करा
मात्र तरीही भल्याचा जय व्हायलाच हवा.

पुढे उमटली आणखी
त्या उपाध्यायाची वाणी

# ॲगमेमनॉन

हे झ्यूसच्या सुंदर कन्ये
प्रार्थना करतो मी तुझी
हिस्त्र सिंहांच्या सुकुमार छाव्यांवर
तु प्रीती करतेस
आणि शृगाल-मूषक-मृगी-शशकांच्या
खोडकर नवजात दुधपित्या पिल्लांचीही काळजी
तूच वहातेस.

जर आजवर तुझ्या स्वर्गीय मदतीने
शुभआशांना यशाचा फुलोरा लाभला असेल
तर आज आमच्या दृष्टीस पडलेल्या सुचिन्हांना आशीर्वचन दे.
त्या चिन्हांनी काही अशुभ वर्तले असेल
तर ते नष्ट होऊ दे
त्यांनी वर्तवलेले शुभ मात्र
फलद्रूप होऊ दे
आता माझी पुढची आर्त प्रार्थना आहे
देवाधिदेव ॲपोलोचा निरामयकारी शक्तीला
त्याची भगिनी
ग्रीक जहाजांच्या ताफ्यांना अटकाव करणारे
वारे निर्माण न करो.
तिचा कोप
आनंदोत्सवाने पावन न झालेल्या
अशा एका आगळ्याच यज्ञात
बळीच्या रक्ताने
आपखी एक समाधी भिजवण्याची
निकराची मागणी न करो.
अशा रक्ताने उभारला जातो
द्वेषाचा मनोरा
स्वत:चेच उत्पत्तीस्थान नष्ट करण्यासाठी
दात ओठ खाणारे, वेडे झालेले असते हे रक्त सदैव
रहाते झुंजत हाडामासांच्या मानवांशी

## ग्रीक शोकनाट्ये

दयामाया नसलेल्या नियतिच्या स्वरूपात.
अशा ह्या रक्तपाताच्या मागोमाग
वहातात रक्ताचे पाट
त्यांच्याच संबंधीयांच्या रक्ताचे
न निमालेला, धुमसतच राहिलेला क्रोध
साऱ्या घराण्यात अंधाराचे आपत्तीचे जहर कालवतो
तसेच विश्वासघाताचे आणि कलहाचे
बालकाच्या हत्येचा उगवलेला सुड असतो तो.

अशा तऱ्हेने कॅलचासने
राज्यकर्त्या वंशाचे भवितव्य
त्या प्रयाणकालच्या लोक विलक्षण
भविष्य चिन्हावरून वर्तवले व
त्या घातक शापासंबंधीची भयसूचक वाणी उच्चारली.
अधिक अशुभाच्या भयात मिसळली
ज्याने शुभाची आशा
आपण सुद्धा त्याच्या त्या संदिग्ध कथनाच्या
सुरात सूर मिळवून हाक देऊ या
म्हणा आता हाय! हाय!
पण अखेर शुभाचाच होऊ द्या जय

होवो जय सत्‌तत्वाचा!
पण अखेर सत् म्हणजे तरी काय?
आणि देव म्हणजे तरी कोण?
कोणचे नाव दिले म्हणजे
त्याचे सत्य स्वरूप वर्णिल्यासारखे होईल?
जर मानवाने दिलेले नाव
स्वीकारणार असेल तो
तर 'झ्यूस' हे नाव
देईन मी त्याला.
अजूनही गोंधळलेलेच आहे माझे मन

कारण फार दिवस
शोध घेतो आहे मी
स्वास्थ्याची मदतीची हरएक आशा
अजमावून पहातो आहे.
तरीपण
माझ्या मनावरील औदासिन्याचे
पछाडीत रहाणाऱ्या निष्कारण भीतीचे –
ओझे हलके करील
अशी तत्वप्रणाली सापडत नाही अजून
श्रद्धेला आवाहन करणारे दुसरे नाव सुचत नाही.
हुरहुरत्या तर्काला दुसरी साद मिळत नाही
मग उरते केवळ एकच नाव – झ्यूस
तो पहिला वहिला देव नष्ट झाला
पुरातन युरेनॉस –
एकेकाळी हिंसाचाराने माजलेला
अहंकाराने फुगलेला
त्याचे नावनिशाणही नाही माहित होणार कोणाला यापुढे
त्याचा वंश एकदा अस्तित्वात होता
आणि पुढे नष्ट झाला
ह्याची आठवणही रहाणार नाही कुणाला.
त्याचा बलशाली वंशज क्रॉनॉस
आपली सद्दी भोगून गेला मग आपल्या वाटेने
दुसऱ्या एका जास्त बलशाली सत्तेने
त्रिवार पराभव केला त्याचा.
आता सत्ताधारी आहे झ्यूस
आणि जो निष्ठेने त्याचा जयजयकार करील
त्याला हृदयस्थ उत्स्फुर्त जाणीवेने
विश्वाची गुरुकिल्लीच प्राप्त होईल

झ्यूस-ज्याच्या संकेताचे पालन हाच आहे मानवाला
ज्ञानसाधनेचा एकमेव मार्ग

## ग्रीक शोकनाट्ये

विश्वचालनाची एक सर्वकालीक योजना
आखून ठेवली आहे त्यानेच
माणसाला शहाणपण येते ते यातना चक्रातून गेल्यावरच.
जुन्या अरिष्टांच्या भाराने जड झालेले
समोरून मारा करणारे वारे
त्याला त्याच्या रास्त मार्गावरून हुसकून काढतात
त्याच्या हिंमतीवर अभ्रे आणतात
मग त्या डोळ्यांसमोर अंधेरी आलेल्या जीवाला दुःख
साथ देऊ लागते
आणि मग माणूस इच्छा नसली तरी
शहाणपणाने वागू लागतो.
कारण आकाशस्थ सिंहासनावरून सत्ता चालवणाऱ्या शक्ती
कठोरतेतूनच प्रकट करतात त्याच्या जिव्हाळा

तर मग असेच झाले तेव्हा
मनस्ताप भोगीत असलेला ॲगमेमनॉन
कबूल करीना की आपला मार्ग चुकतो आहे
धीर होईना तसे करण्याला त्याला
आपल्या ग्रीक आरमाराच्या थोरवीतच तो दंग
आणि खोट्या अभिमानाला बळी पडून
ज्याचा प्रतिकार करायला हवा होता
अशा प्रतिकुल वाऱ्यात त्याने आपली शिडे उभारली
दरम्यान त्याचे शस्त्रसज्ज सैनिक
किनाऱ्यावर मनाशी कुढत फिरत राहिले
वाऱ्याला शिव्याशाप देत
आणि संपत आलेल्या अन्नपुरवठ्याचा फडशा पाडीत
ॲलिस सामुद्रधुनीला घुसळून काढणाऱ्या उधाणावरून
पलिकडे चॉलकिसच्या पांढऱ्याशुभ्र छपरांकडे
दिवसामागून दिवस डोळे ताणून बघत राहिले
आणि तरीही स्ट्रीमॉनकडून येतच राहिले
सतत ते उत्तरेचे सोसाट्याचे वारे

## ॲगमेमनॉन

जहाजांचे सांगाडे आणि दोरखंड कुजून जाऊ लागले
नांगराच्या साखळ्या विलग झाल्या
पळ काढणारे लोक तोंड लपवीत निघून गेले.
सारे दात ओठ खाऊ लागले
कंटाळलेले, निराधार, भुकेले, हतबल झालेले.
वाट पहाण्याचे दिवस वाढतच गेले
दिवसामागून दिवस जात राहिले
लढाऊ हेल्लसचे सर्वोत्तम योद्धे झपाट्याने मरगळत चालले.

मग कॅल्चास पुन्हा एकवार बोलला
म्हणाला "आर्टेमिसने पाठवला आहे हा प्रतिकूल वारा"
आणि उघड केला त्याने
त्यावर तिने सुचवलेला उपाय
ज्याच्या कल्पनेने, शिशासारख्या वजनाने
दडपली गेली ॲट्रिअसच्या पुत्रांची काळजे
अश्रू ढाळू लागले ते
त्यांनी अश्रू ढाळावे असाच होता तो उपाय
आणि अवाक होऊन
ते आपले राजदंड धुळीत घासू लागले.

मग तो वडीलधारा राजा म्हणाला
"काय बोलू आता मी?
देवाचा उपाय झिडकारून लावला
तर संकट ओढवेल
पण जर तो मान्य केला –
जर तिच्या निरागस कोवळ्या वयात
माझ्या गृहाच्या आनंदकंदाची - माझ्या अपत्याची
मी स्वतः आपल्या हाताने हत्या केली
पावित्र्याला लाथाडणाऱ्या अनैसर्गिक क्रूरतेने
माझे पितृत्व सांगणाऱ्या रक्ताने न्हाणून
माझे हात डागाळले तर -

तर खचितच जास्त भीषण अनर्थ ओढवेल.
दोन्हीतला कुठलाही मार्ग पत्करला
तरी परिणाम एकच-
सर्वनाश!
विसर्जित करायचे हे आरमार
घराकडे वळवायची जहाजे
आणि लावून घ्यायचा भाली
विश्वासघातकी पळपुटेपणाचा शिक्का!
— माझ्या सर्वाधिकाराचा त्याग करायचा
मित्रराज्यांचा विश्वासघात करायचा
आता? ह्या वेळी?
छे! बदललाच पहिजे हा वारा-
झालाच पाहिजे मेघ
कुमारिकेचे रक्त वाहिलेच पाहिजे
त्यांच्या धुमसणाऱ्या त्वेषाची हीच मागणी आहे.
बरोबर आहे त्यांचे
शुभाचा जय होवो
आणि माझे हे कृत्य अखेर न्याय्य ठरो.

मग चढवले त्याने खोगीर आवश्यकतेचे
त्याच्या हृदयातल्या अनिश्चिततेच्या वादळाने
आपली दिशा बदलली
त्याच्या प्रार्थनेचे परिवर्तन झाले अभद्र वाणीत
आणि त्याच्या बलिदानाचे, अभद्रकृत्यात
म्हणून तो-
उशीराने झालेल्या प्रदीर्घ पश्चातापाने
त्याचे ते पळभराचे वेड संपल्यावर
करतो आहे भरपाई
त्या एकमेव अविचारी अन्यायाची
निलाजरा, हट्टी, वेडा उन्माद
नरकयासाला सुद्धा आव्हान देण्याइतका धीट

अॅगमेमनॉन

करतो माणसांना
आणि विनाशाची चक्रे सुरू करतो
जी त्याच्या करूणास्पद साध्याच्या मार्गावर
कुठलीही क्षिती न बाळगता गडगडत रहातात
म्हणून अॅगमेमनॉनने
परत फिरणे नको असे निश्चित करून
आपल्या कन्येच्या जीवनाचा
बळी देणे पत्करले -
एका पतीद्रोह केलेल्या पत्नीसाठी
होणाऱ्या युद्धाच्या सहाय्यार्थ
एका वादळाने अडवलेल्या आरमाराच्या
सुटकेची खंडणी होती ती.

लक्ष न देता तिच्या अश्रूंकडे
किंवा तिच्या "पिताजी, पिताजी" अशा आक्रोशाकडे
वा तिच्या कुमारवयाकडे
त्यांच्या कीर्तीची त्यांच्या युद्धाची किंमत
जास्त वाटत होती तिचा न्याय करायला उद्युक्त झालेल्यांना
म्हटली गेली एक प्रार्थना
तिच्या पित्याने उच्चारले अनुज्ञेचे शब्द
तिच्या पायापर्यन्त रूळणाऱ्या पोषाखात
लटकी पडली होती तिची गात्रे
हो त्याच्या सहाय्यकांनी उचलून धरली तिला वेदीवर उंच
एकादे कोकरू उंचावर धरावे तशी.
पुन्हा आज्ञा केली तिच्या पिताश्रींनी एक बोळा आणायला
आणि घट्ट दाबून बांधले तिचे मनोज्ञ ओष्ठ एका दोरीने,
अॅट्रियसचा वंश एकाद्या अशुभसूचक उद्गाराने
शापला जाऊ नये म्हणून.
धसमुसळ्या हातांनी हिसकला गेला तिचा कमरपट्टा
आणि गळून पडली जमिनीवर तिची केशरी रेशमी वसने
तिच्या मारेकऱ्यांचा शोध घेऊ लागली तिची नजर

आणि त्याच्यापैकी प्रत्येक
एकाद्या चित्रकाराच्या दिव्य स्वप्नाला मागे टाकील
असे तिचे सौंदर्य पाहूनही
नाकारीत होते तिला दया -
जिची भीक मागत होती तिची अबोल नजर
आवाज फुटावा म्हणून धडपडणारी.
कारण पूर्वी पुष्कळदा
जेव्हा तिच्या पित्याच्या भोजनगृहात
मेजवान्या होत वीरांसाठी,
तेव्हा -
साध्यासिध्या कसबाने व श्रद्धापूर्ण प्रशंसा गात
बासरीच्या शुद्ध सुराशी मेळ करीत
तिचा अक्षत आवाज -
तिसऱ्या मद्यार्घ्याच्या वेळी
पित्याच्या सिंहासनाजवळ ती उभी असतांना
सर्वांचे अन्त:करण विरघळवून टाकीत असे.
नंतर काय काय घडले ते पाहिले नाही मी
आणि बोलणार नाही मी त्याबद्दल
पण ही एक गोष्ट मला माहित आहे
कॅलचासने वर्तवलेली सारी भविष्ये खरी ठरणार खचित
न्यायाचा तराजू शेवटी औचित्याकडेच झुकतो
मारेकरी मारला गेल्याशिवाय रहाणार नाही
पण आता भविष्यकथन पुरे
जे होणारच आहे
ते काळ दाखवीलच
पण टाळू मात्र शकणार नाही
मग आगामी संकटे कोसळण्याआधीच
त्यांच्यासाठी शोक करून काय फायदा?
घटना आखलेल्या मार्गानेच घडत रहाणार
जशा भविष्यवेत्याने आधीच वर्तवलेल्या आहेत तशा.
पण जे आता लवकरच घडणार आहे

त्यात शुभाचा विजय होवो
हीच प्रार्थना करतो आता आम्ही
इथे ॲगमेमनॉच्या घरी
या आरगॉसच्या भूमीचे रक्षण करण्यासाठी
एकाकी खडे असलेले आम्ही.

(आता उजाडले आहे. राणी आता वळून श्रेष्ठीवृंदाकडे तोंड करून उभी रहाते.)

श्रेष्ठवृंद : क्लायटेमनेस्ट्रा तुझ्या बोलावण्याला मान देऊन
आलो आहोत आम्ही
आमचा राजा आणि नेता उपस्थित नसतांना
आणि त्याचे सिंहासन रिकामे असतांना
त्याला देण्याचा मान त्याच्या पत्नीला देणे
हे आमचे कर्तव्य आहे.
काही निरोप मिळाला आहे का तुम्हाला?
काही चांगल्या बातमीमुळे का होत आहेत हे यज्ञयाग?
का अनेक दिवस मनी बाळगलेल्या आशेचा पूर्तीक्षण
नजीक आला म्हणून आहेत हे धन्यवाद देण्यासाठी?
प्रेमाने विचारतो आहे मी
आणि तितक्याच निष्ठेने स्वीकारीन
मिळालेले उत्तर तसेच मौनही.

क्लायटेमनेस्ट्रा : जर लौकिक म्हण खरी असेल
तर रात्रीच्या दयामय गर्भाशयातून
सूर्योदयाबरोबर चांगली बातमी बाहेर पडावी.
पण तुमची आशा जिची कल्पनाही करण्यास धजली नसेल
इतकी उत्कट आनंद देणारी बातमी आहे.
आपल्या आरगॉसच्या वीरांनी
प्राॲमची नगरी जिंकली आहे.

श्रेष्ठीवृंद : काय केले आहे म्हणता वीरांनी?
माझ्या ऐकण्यात चूक झाली असावी.
छे! विश्वास नाही बसत.

क्लायटेमनेस्ट्रा : ट्रॉय आता आपले झाले आहे.
हे बोलणे तर स्पष्ट आहे ना?

श्रेष्ठीवृंद : आनंदाश्रूंनी माझे डोळे भरून आले आहेत.

क्लायटेमनेस्ट्रा : ह्यातून तुमची निष्ठाच दिसून येते.

श्रेष्ठीवृंद : पण ह्या बातमीच्या खरे पणाचा काही निश्चित पुरावा आहे का?

क्लायटेमनेस्ट्रा : आहे तर! अर्थात एखाद्या देवाने मला फसवले नसले तर!

श्रेष्ठीवृंद : देवाने कसले तरी स्वप्न पाडल्यामुळे तुमचा असा समज झाला का?

क्लायटेमनेस्ट्रा : स्वप्न? स्वप्निल कल्पिताच्या गोष्टी करीत बसणारी का आहे मी?

श्रेष्ठीवृंद : तर मग खचितच खात्रीलायक पुरावा नसलेल्या बातमीतच
समाधान मानीत बसला आहां तुम्ही!

क्लायटेमनेस्ट्रा : एखादी अडाणी मुलगी म्हणून माझ्यावर टीकाच करायची ठरवली
आहेत तर तुम्ही!

श्रेष्ठीवृंद : बरे तर मग सांगा, केव्हा जिंकले गेले ट्रॉय?

क्लायटेमनेस्ट्रा : ह्या आजच्या रात्र –
जिच्या गर्भातून हा तेजोमय सूर्य अवतरला आहे.

श्रेष्ठीवृंद : ट्रॉयहून इतक्या लांब,

इतक्या त्वरेने कोणता दूत दौडू शकला बरं?

क्लायटेमनेस्ट्रा : अग्निदेव!
इडाने प्रथम चेतवली त्याची तळपती शलाका
आणि तिथून ओळीने खुणेच्या ज्योती मागे ज्योत पेटत
ह्या राजवाड्यापर्यन्त वार्ता येऊन पोचली
इडानंतर लेमनॉसवरच्या हर्मिसच्या कड्यावर पेटली ज्योत
त्या बेटानंतर
वरवर ज्वाला जाणाऱ्या मशालीचा संकेतटिपणारा तिसरा
होता अथॉस-झ्युसचा खडक
तिथे ज्वालेने अंधाऱ्या क्रोशांना मागे टाकीत झेप घेतली
त्याबरोबर पहाऱ्यावरचे लोक तिचे स्वागत करीत पटकन उठले
आणि आकाशात एका प्रकाशाच्या
जुळ्या मनोऱ्याने आपले वरचे टोक खुपसले
वाटचाल झालेला सगळा मार्ग उजळीत
आणि चाबकाच्या फटकाऱ्यासारख्या (चमकणाऱ्या) विजेसारखी
एका झेपेत अिजियन ओलांडून गेला
तो वितळलेल्या सोन्यासारखा
पेटत्या राळेचा चमचमाट.
सूर्योदय झाल्यासारखे मासे नाचू लागले
भुलून जाऊन त्या संकेतज्वालेच्या प्रकाशाने
मॅकिसटॉसच्या शिखरांवर सूर्योदयाचे
प्रतिबिंब उमटले त्या लखलखाटाने
झोप, अनपेक्षितता वा आळस वर्ज्य असलेला तिथला पहारेकरी
उठला त्या निरोपाशी इमान राखून
आणि त्याच्या पेटत्या ओंडक्यांच्या उजेडाने
यूरायपसच्या खाडीपर्यन्तचे विस्तृत अंतर कापले
तिथे त्याचा पेटता निरोप मेसॅपीच्या पहारेकऱ्यांना मिळाला
त्यांनीही पेटवला अग्नि आपल्यापरीने
आणि वाळलेल्या झुडपांच्या रचलेल्या ढिगांना पेटवून
निरोप पुढे पोचवला.

तो अद्याप क्षीण न झालेला तेजस्वी किरण
एका उड्डाणात ॲसापसचे मैदान ओलांडून गेला
आणि चंद्रासारखा तेजामय प्रकाश त्याने
सिथीसॅनच्या टोकदार खडकांवर पाडून
तिथल्या पहारेकऱ्यांना उठवले,
आणि या धावत्या संकेताच्या वाटचालीस
गती देण्यास उद्युक्त केले.
तसाच पुढे उड्या घेत राहिला तो उष्ण स्रोत
गॉरगॉपिसच्या तलावावरून जात त्याने
इगिप्लॅन्कटस् गाठले आणि
डोंगराळ प्रदेशात रहाणाऱ्या त्या
पहारा करणाऱ्या लोकांना
भरपूर फांद्या आणि रानगवत गोळा करण्यास लावले
आपल्या खुणेच्या जाळाला
त्यांनी यथेच्छ इंधन घातले
आणि मग एकादी राक्षसी दाढी फुटावी
त्याप्रमाणे तो अग्नि वर उफाळला
त्याने सॅरोनिक आखातासमोरच्या
गर्वोन्नत सुळक्यावरून उडी घेतली
आणि आपल्या राजरस्त्यांच्या शेजारीच असलेल्या
उंच ॲरॅक्नीअसला तो पोचला
आणि तिथून ह्या ॲट्रियसवंशीयांच्या राजवाड्यावर
फाकले त्या विजयी अग्निचे तेज
ज्याचा इडाच्या ज्वालेच्या वंशात झाला होता उगम.
श्रेष्ठींनो अशी पूर्ण केली
माझ्या मशालधारी पहारेकऱ्यांनीही
एकाद्या धर्मकृत्यासारखी ही शर्यत
प्रत्येकजण आपल्या नेमलेल्या ठिकाणी
एकनिष्ठतेने एकापाठोपाठ आपली कामगिरी बजावीत होता.
पहिला आणि शेवटचा
दोघेही शर्यतीच्या विजयाचे सारखेच मानकरी.

हा आहे माझा पुरावा आणि माझे संकेतचिन्ह
जे मी तुम्हांपुढे ठेवते आहे.
ॲगमेमनॉनने ट्रॉयहून मला पाठवलेला हा संदेश.

श्रेष्ठीवृंद : बाईसाहेब,
ईश्वराला धन्यवाद देऊच आम्ही यथावकाश
पण सध्या मात्र पुरता आस्वाद
घ्यायचा आहे आम्हाला ह्या घडलेल्या नवलाचा.
आणि सविस्तर सारे ऐकायचे आहे तुमचे वक्तव्य.
सांगा ना पुन्हा आम्हाला
त्या वार्तेची सारी हकीकत!

क्लायटेमनेस्ट्रा : आज ट्रॉयनगरी ग्रीकांच्या ताब्यात आहे.
तिच्या तटांवर घुमताहेत आरोळ्या
ज्या एकमेकात मिसळू शकत नाहीत.
एकाच भांड्यात तेल आणि व्हिनीगर ओता
ते एकमेकांपासून वेगळे होत लहरत रहातील
पण ते मिसळणार नाहीत कधीच.
तसेच मला वाटते.
त्या अरुंद रस्त्यांमधून
कानाला तापदायक वाटणारा
एक विसंवादी सूर उमटतो आहे -
बंधनात पडलेल्यांच्या किंकाळ्या
आणि त्यांना बंदीवान करणाऱ्या जेत्यांचे विजयघोष.
काही आनंदी, काही दु:खी अलग अलग
ट्रॉयमधील स्त्रिया
मृत नवऱ्यांच्या आणि बंधूच्या कलवरांव
घालून घेत आहेत स्वत:ला
वृद्ध पितामह मुलांनातवासाठी
शोक करीत आहेत
आणि त्यांचे शोकोद्‌गार हे गुलामांचे रूदन आहे.

हे सारखे जाणवते आहे त्यांना
आणि मग विजयी झालेले वीर
रात्रभर चाललेल्या लढाईनंतर
भटकत आणि लुटालूट करीत
न्याहारीसाठी भुकावलेले असे ते
संचार करीत आहेत.
आणि त्यांचे यजमान मात्र
धुळीत निपचीत पडलेले आहेत.
कुठलेच नियम पाळायची जरूर नाही.
कुणी कुठे जावे ह्याचा निर्बंध नाही
प्रत्येकाने आपल्याला नशीबाने मिळेल ते घ्यायचे.
ट्रॉयमधल्या जिंकून घेतलेल्या घरांमधून
वस्तीला राहिलेले ते
अखेर आज रात्री
आपल्याला कोरड्या पांघरूणात लपेटून घेऊन
हिमपातापासून सुरक्षित असे
पहारा करण्याच्या कामगिरीपासून सुटलेले.
सुखाने झोपतील तिन्हीसांजेपासून पहाटेपर्यन्त.
जर त्या जित नगरीत ते
ज्या देवांची ती वसतीस्थान होती
त्या देवांचा आदराने मान राखतील
आणि पवित्र स्थाने विटाळून टाकणार नाहीत
तरच त्या आजच्या जेत्यांवर
उद्याचे जित ठरण्याची पाळी येणार नाही.
मात्र अनधिकृत लूटमार करण्याची लालसा
संपत्ती गोळा करण्याचा मोह
आमच्या शिपायांना न पडो
कारण त्यामुळे ते स्वत:चेच नुकसान करून घेतील.
कारण अजून परतीचा प्रवास व्हावयाचा आहे
देवाच्या कृपेने ते सुखरूप आमच्या नजरेस पडोत
जर त्यांची जहाजे पाच्या कलंकापासून बचावून मार्गस्थ होतील,

तर मग देव त्यांना
परतीच्या सुखरूप प्रवासाचे वरदान देतील
अर्थात ज्यांची आठवणही उरलेली नाही
त्या मृतांचा जागृत कोप जर
त्यांचा अनपेक्षितरीत्या सूड घेण्यास
तिष्ठत उभा नसला तरच ते वरदान त्याना प्राप्त होईल.
एका स्त्रीचे शब्द आहेत हे
सर्वांच्या नजरेसमोर
सत्तत्वाचा जय होवो
वादंग कलहावर मात करून.
माझ्या आयुष्यात पुष्कळ सुखद गोष्टी आहेत
त्या साऱ्यांचा मी आता उपभोग घेईन.

श्रेष्ठीवृंद : बाईसाहेब,
एकाद्या पुरूषासारखेच आहेत तुमचे शब्द
वत्सल आणि शहाणपणाचे पण
आता तुमच्या स्वतःच्या तोंडून
विश्वासार्ह पुरावा मिळाला आहे आम्हाला
तेव्हा आम्ही आता पुन्हा देवांना गौरवण्यास सिध्द होऊ
त्यांच्या कृपाप्रसादाला
आत्यंतिक श्रद्धेचा प्रतिसाद देणेच उचित आहे.

(क्लायटेमनेस्ट्रा राजवाड्यात जाते)

श्रेष्ठीवृंद : हे झ्यूस,
सर्व स्वर्गस्थ शक्तींच्याहून श्रेष्ठ असलेल्या,
हे स्नेहपूर्ण निशे,
तुझ्या त्या घातक निर्णायक प्रहारांनी
युद्धकौशल्याबद्दल प्रसिद्ध असलेल्या
आरगॉसच्या नावाभोवती अविनाशी कीर्तीचे
तेजोवलय निर्माण केले.

अशी रात्र की जीमध्ये
ट्रॉयच्या मनोऱ्यांभोवती फेकण्यात आले
एक पक्के जाळे
असे की ज्यातून कोणाही मर्त्य मानवाला
मग तो थोर असो वा क्षुद्र —
करून घेता येणार नाही सुटका
भीषण सर्वनाशाचा प्राणघातक सापळाच होता तो
ह्यामागे दिसतो आहे झ्यूसचा हात
झ्यूस-आम्ही भजतो त्याला
त्याचा अविनाशी कायदा
यजमान आणि अतिथी
दोघांनीही कदर राखली पाहिजे त्याची
त्याने कितीतरी पूर्वीच पॅरिसवर
रोखला शर, वाकवून धनुष्य आपले
आणि गतिमान केला
काळजीपूर्वक नेम धरून आपला सूड
फार त्वरित पोचेल असा नाही
किंवा पार ताऱ्यांच्या पलीकडे जाईल असाही नाही
तर निश्चित केलेल्या दिवशी न्यायाचे ऋण फेडले जाईल अशा बेताने.

"झ्यूसच्या शक्तीने
भल्याभल्यांना ओढले आहे
आपल्या उंच स्थानावरून खाली."
म्हणू शकतो आपण हे
आणि आरंभापासून अखेरीपर्यन्त
रेखाटू शकतो त्या हाताची करणी
झ्यूसला असते साऱ्या घटितांचे पूर्वज्ञान
पण तो जसजसे योजित गेला
अगदी तसतसाच झाला त्यांचा शेवट.

कोणी एक म्हणाला,

## ॲगमेमनॉन

"पवित्र वस्तुंचे सौंदर्य
पायाखाली मातीत तुडवणाऱ्या
माणसाचे स्वच्छंद आचरण
लक्षात घेण्याजोगे आहे
असे देवांना वाटत नाही -
अश्रद्धेतेचे द्योतक आहे ही समजूत!
सत्य आता स्पष्टपणे उघड झाले आहे.
अहंकाराला भोगावे लागले आहे
आपल्या करणीचे फळ.
आणि जे सत्पक्षाच्या कल्पनेला तुच्छतेने हसले
आणि ज्यांनी बढाया मारून
आपला विश्वास ठेवला.
शस्त्रे आणि राजांचे फुगलेले खजिने यावर
ते नियतीने त्यांच्यासाठी आखलेल्या मार्गाने गेले
मध्यम मार्ग हाच शेवटी सर्वोत्तम
गरीबपणाही नको आणि अहंमन्यताही नको
पण याबद्दल काही स्पष्ट नियम आखून
देता येत नसल्याने
अस्थिर, असमंजस मनाला ग्रहण होत नाही ह्याचे
त्यामुळे त्यांचा अंतिम हेतू साध्य होत नाही
आणि मग नंतर वळून दुसरा मार्ग चोखाळणे शक्य होत नाही
आणि एकदा का माणसाच्या हातून अतिक्रमण झाले
व संपत्ती आणि अहंमन्यता ह्यांच्या भरात
त्याने उच्च न्यायमंदिराला झिडकारले
की मग त्याच्या पापाला
त्या पूर्वीच्या सुरक्षित संदिग्धतेत दडून रहाण्याची
आशाच कधी करायला नको
— याप्रमाणे परतीची वाट बंद झाल्यावर
मोहरूपी सैतान -
नरकाची वाट दाखवणारा -
त्याला चुकीच्या मार्गावर

## ग्रीक शोकनाट्ये

पुढेपुढे ढकलीत रहातो
आणि एकदा का त्याचा मोहक ताजेपणा
कलंकित होऊन गेला-
घाणीने बरबटून अपवित्र झाला
आणि कवडीकिंमतीचा हिणकस काशाचा धातू
जसा कस जोखणाऱ्या घणांनी काळवंडत जातो
तसा तो निष्प्रभ होऊन पडला
की त्याची क्षुद्रता साऱ्यांच्या सहज लक्षात येते
मग प्रत्येक नवीन उपाय
नवीन निराशाच घेऊन येतो
नंतर उडत्या पाखराचा पाठलाग
करणाऱ्या एखाद्या मुलाप्रमाणे
त्याच्या वंशावर आणि देशावर
मर्त्य शरीराला सहन होणार नाही
इतकी भीषण भवितव्यता
तो ओढवून आणतो
मग देव कुठल्याही प्रार्थनेकडे
कानाडोळाच करतात
जर एखाद्या मानवी डोळ्यात दयेचे पाणी चमकले
तर न्यायासनाच्या कायद्याने
गुन्हेगाराच्या अपराधाचा वाटेकरी
होतो तो दयार्द्र झालेला
आणि त्याच्याबरोबर
मृत्यूलाही सामोरा जातो.
असाच पॅरिस - कठोर नियतीचे लक्ष्य होऊन
मोहाने फसून
आपल्या यजमानाच्या पंक्तीला भोजनाला बसला
आणि मग त्याची पत्नी हेलन हिला भ्रष्ट करून
ॲट्रिअसचे घराणे आणि झ्यूसचा कायदा
ह्यांना लाज आणील अशी वर्तणूक
त्यांच्या हातून घडली

## ॲगमेमनॉन

आणि आरगॉसमध्ये
ढाली आणि भाल्यांचे रचलेले ढीग
आणि लोहारांच्या भट्टीवरील
आणि गोदीतील गोंगाट
आमच्यासाठी ठेऊन
तिने अलगद उंबरा ओलांडला
आणि सोडला आपला राजमहाल
ज्यामुळे तिची भीति जागी व्हावी
त्याचे भय न बाळगता
आणि ट्रॉयला आंदण म्हणून आणला तिने
सर्वनाश रक्त आणि अश्रू.
इथे, तिने त्यागिलेल्या तिच्या घरात
तिचा परिचारकांचा आणि कर्मचाऱ्यांचा आवाज
करीत राहिला जिव्हाळ्याने आणि खेदाने रूदन.
हाय रे हे गृहा! हाय रे राजा! किती करूणास्पद हे!
हाय! जीवर तिच्या प्रिय मस्तकाचा
नाजूक ठसा उमटला आहे ती ही उशी!
तिथे तिचा पती पडला आहे आपल्या खोलीत
अन्नपाण्यावाचून
शोकाघाताने मूक होऊन
सागरावरून भरारी घेऊन पलीकडे
पोचते आहे त्याचे चित्त.
दोषारोपयुक्त नव्हे तर आतुरतापूर्ण
केवळ एक भूत राज्य करील आता ह्या राजवाड्यावर
कबरस्तान होईल ह्या घराचे
तिच्या पुतळ्याचे मोहक निष्कलंकत्व
त्याच्या एकलेपणाची व्यथा वाढवीत आहे
त्याच्या डोळ्यातील आस सारखा शोध घेते आहे.
पण तो चैतन्याने रसरसलेला डौल थिजला आहे
त्या सौंदर्याचा बहर अस्त पावला आहे

## ग्रीक शोकनाट्ये

तिची नजरेसमोर उभी रहाणारी चित्रे
त्याला फसवे आणि क्षणिक सुख देतात
जेव्हा गडद अंधारात स्वप्नमग्न असा तो तिला बघतो
बघतो व तिला कवळायला धावतो -
आणि त्याच्या बोटांतून निसटल्यामुळे
त्याचे ते सर्वस्व अलगद सटकून जाते
तेव्हा निद्रेच्या झाकळलेल्या पथावरून
पंखावर तरंगत येणारे ते स्वप्न
तो पकडून ठेवू शकत नाही.
अशी आहेत हा राजमहाल भोगीत असलेली
मर्मस्पर्शी दुःखे
आणि इकडे ह्याचवेळी आरगॉसच्या रस्त्यांमधून -
आमचे सारे पुरूष हेलासच्या भूमीपासून
इतक्या दूर गोळा झालेले असल्यामुळे
दुःख जास्तच कष्टप्रद होऊन राहिले आहे.
प्रत्येक पितृहीन घरात
प्रत्येक पतीहीन शय्येवर
हताशतेची धारदार तलवार वार करते
ज्यांच्या साऱ्या आशा
विशीर्ण झाल्या आहेत
आणि क्रुद्ध तिरस्कार
ज्यांच्यावर वर्चस्व गाजवतो
अशा हृदयांवर
पुरूष युद्धावर पाठवले जातात
पण ते परत मात्र येत नाहीत
आपण त्यांच्यासाठी राखून ठेवलेले
स्वागत स्वीकारण्यासाठी
येते केवळ
कलशात भरलेली रक्षा

कारण युद्धदेव म्हणजे एक सावकार आहे

तर नरमांस हे त्याच्या पेढीतील सोने आहे.
ट्रॉयच्या युद्ध क्षेत्राच्या धडधडणाऱ्या भट्टीजवळ
जेथे तलवारीवर तलवारी पडतात —
तेथे बसतो तो आपला तराजू घेऊन
आणि भाल्याचे टोक झुकतांना नजर ठेवतो
आणि वाट पहात बसलेल्या घरांना पाठवतो तो
त्या खनिजातला उरलेला गाळ —
थोडीशी धूळ -
मित्रहृदयातील कढत अश्रू टिपून काढण्यासाठी
चांगले भरपूर माप
एका बेतशीर कलशात
नीटनेटके भरून मोहोरबंद केलेले
त्यांनी पाठवलेल्या माणसाची
रास्त किंमत म्हणून
अश्रू गाळीत ते त्याची स्तुति करतात
आणि म्हणतात!
"योद्धा होता तो" किंवा
"शूराचे उदात्त मरण स्वीकारले त्याने
चारी बाजूंनी मृत्यूने वेढलेले असतांना"
आणि सक्रोध नाराजी हळूच पुटपुटते, -
"हो ना - दुसऱ्याच्या पत्नीसाठी!"
आणि अशा रीतीने
दुःखातून कडवटपणा उद्‌भवतो
जो भीतीपोटी झाकावा लागतो.
जाऊ देत सारे राजे आणि त्यांचे ते सूड!
पण इलिऑनच्या भिंतीखाली
खोलवर पुरलेले आहेत मृत झालेले
तिच्या भूमीचे वारस
आणि ती —
जिचे रक्त त्यांनी सांडले
ती आपल्या जेत्यांना चिरनिद्रेत
आच्छादून टाकते आहे.

## ग्रीक शोकनाट्ये

एका राष्ट्राचा आवाज
क्रोधाने जोरदार झालेला
एखादा सर्वव्यापी शापाप्रमाणे
जीवघेणा घाव घालतो.
वाट पहातो आहे मी
गुप्त संकटाच्या सूचनेची
आणि भितो आहे की
या वाईटाहून अधिक वाईट
तर काही कानी येणार नाहीना म्हणून.
आपले मृत बळी पलटणीनीच जो मोजतो
त्याच्यावर देवाची करडी नजर असते.
आणि जेव्हा त्याचे सुदैव
त्याचे सगर्व यश
सच्चेपणाचा कायदा विसरते
तेव्हा काळ्या कराल सूडदेवता
त्याचे सामर्थ्य खच्ची करणारा
प्रतिवार दीर्घकाल करीत रहातात
आणि त्याचे तेज काळवंडते
आणि अखेर विस्मृतीच्या अंधाऱ्या गर्तेत
तो गडप होतो.
अपार कीर्ती वा अवास्तव स्तुती –
दोहोत अरिष्टाची चाहूल असते.
ईश्वराने धाडलेले
तीव्र वीजेचे लोळ
उच्च पर्वतानाच हादरवतात
म्हणून ज्यामुळे सारखा सलत रहाणारा द्वेष उद्‌भवत नाही.
असेच ऐश्वर्य मी पसंत करतो
शहरे उध्वस्त करणे नको आहे मला
युद्ध आणि दैवगती यांच्यापायी
स्वातंत्र्य आणि जीवन गमावून बसणाऱ्यांच्या
गुलामगिरीदर्शक शृंखला लेणे नको आहे मला.

(अत्युत्तेजित होऊन ओरडणाऱ्या व जयघोषणा देणाऱ्या स्त्रियांचा आवाज ऐकू येतो. एकदोघे श्रेष्ठी बाहेर जातात व लगेच बातमी घेऊन येतात. श्रेष्ठीवृंदातले निरनिराळे सभासद पृथक्‌पृथक् पुढीलप्रमाणे आपल्या प्रतिक्रिया व्यक्त करतात.)

वृंदाचे सदस्य : त्या धुणेच्या ज्वालेने दिलेली बातमी ऐकल्यापासून
रस्त्यारस्त्यातून वावड्या उडत आहेत.
ठेवावा का आम्ही त्यातल्या एका शब्दावर तरी विश्वास?
का आहे ही कुणाला तरी स्फुरलेली फसवी कथा?
पोरकट, भरकटलेल्या मेंदूची कथित कहाणी?
अशा बातमीने तुमच्या आशांना पंख फुटावे
तर लवकरच आढळून येईल तुम्हाला
की अग्निज्वालाही असत्य बोलू शकते
सत्य घटना उलट्यापालट्या होतात
आणि श्रद्धा निष्फळ ठरते.
साऱ्याच स्त्रिया अधिऱ्या वृत्तीच्या असतात,
धुणेच्या ज्वाला उफाळतात
अगदी सहज मनावला जाऊन
विश्वास आनंदतो.
स्त्रियांच्या कंठातून अफवा डागल्या गेल्या
की त्या त्वरेने पसरतात –
ठाऊकच आहे आपल्याला हे.
पण हेही ठाऊक आहे आपल्याला
की तितक्याच जलदीने त्या लुप्तही होतात.

(श्रेष्ठीवृंद जातो. बरेच दिवस लोटले आहेत असे सुचवण्यासाठी थोडा वेळ रंगभूमीवर काहीच घडत नाही व नंतर श्रेष्ठीवृंद अत्यन्त उत्तेजित अशा स्थितीत पुन्हा प्रवेशतो)

श्रेष्ठीवृंद : आता लवकरच समजेल आपल्याला
ज्वालांची ती टप्प्यांची शर्यत.

ती मध्यरात्रीची मशाल मिरवणूक
तो खुणेच्या ज्वालांचा संदेशवाहक
सत्य सांगत होता.
का सुखस्वप्न होते ते सारे –
आणि त्या अग्नीने आपली फसवणूक केली होती!
पण पहा! एक दूत येतो आहे
किनाऱ्याच्या बाजूने वर
ऑलिव्हच्या पानांचा मुकुट त्याला आहे तो
आणि आणखी पलीकडे दूरवर
तप्त धुळीने माखलेला
शस्त्रधारी योद्ध्यांचा एक ताफा
शिस्तीत पावले टाकीत येत आहे.
मला सांगते आहे ( हे दृश्य )
की हा दूत काही चूपचाप उभा रहाणार नाही
किंवा ट्रॉयमधून निघणारा धूर घोषित करण्यासाठी
पाईनच्या लाकडांची शेकोटीही पेटवणार नाही
त्याची बातमी एकतर आपल्या सुखात दुप्पट भर घालील
नाहीतर –
पण देव ते दुसरे काही घडू न देवोत!
पहिल्या दृष्टिक्षेपात तर घटना चांगली असावीशी वाटते
आता साक्षीपुराव्यानंतरही ती चांगलीच ठरो.
जे कोणी आरगॉसच्या बाबतीत
ह्याविरुद्ध व्हावे अशी प्रार्थना करील
त्याला त्याच्या अंतरंगातील मूर्खपणाची
फळे भोगू द्या.

(एक दूत प्रवेशतो)

दूत : आरगॉस!
माझ्या पूर्वजांनी जिच्यावर संचार केला
त्या प्रियतम भूमी!
दहा वर्षांनी आज घरी येतो आहे मी!

इतर साऱ्या आशा व्यर्थ झाल्या
पण ही मात्र सफल झाली आहे
मी धजत नव्हतो आशा करायला
की मृत्यूनंतर,
जीवर माझा हक्क आहे
अशी हवीहवीशी वाटणारी विश्रांती देण्यासाठी
माझी स्वतःची भूमी मला पोटात घेईल
आता धन्य धन्य असो आरगॉस
आणि त्या सूर्याचा सुखकर प्रकाश
आणि त्याचबरोबर धन्य असो
झ्युस – ह्या प्रदेशाचा स्वामी
आणि धन्य असो पायथॉसचा ॲपोलो –
जो आता आपल्या अमर धनुष्याचे बाण
आम्हावर नेम धरून सोडणार नाही.
फिबस् देवा, तू लढलास आमच्याशी दीर्घकाळ
स्कॅमॅन्डर नदीच्याकाठी
आता हो आमचा त्राता
दुःखशामक हो आमचा,
आमचा संहारक एकदा झालास
आता नको दुसऱ्यांदा होऊस.
नागरीकसमूहाच्या देवतांनो माझी प्रार्थना ऐका
आणि तू-हर्मिस प्रिय संरक्षिका
दूत देवा, सर्व दूतांचा स्वामी,
तू पण ऐक,
आणि तुम्ही, पुरातन काळच्या योद्ध्यांनो,
ज्यांच्या आशीर्वादानेच आम्ही
पुढे पाऊल टाकले
तलवारीपासून वाचलेल्या
आणि आता परतणाऱ्या
शेष वीरांना आशीर्वाद द्या.
हे राजांच्या कुला!

ग्रीक शोकनाट्ये

प्रिय तटबंदीनो, हे परमपूज्य सिंहासनांनो
हे उगवणाऱ्या सूर्याला निरखणाऱ्या देवतांनो
आता निट बघा,
आपल्या ह्या पुरातन सिंहासनाला भूषवणाऱ्या
सुयशाच्या उत्तुंग कमानी बांधणाऱ्या ह्या राजवंशीय शिल्पकारांचे
चमकत्या नेत्रांनी स्वागत करा.
तुमच्यासाठी
आणि आरगॉसच्या प्रत्येक नागरीकासाठी
अंधार दडवणारा प्रकाश आणतो आहे अँगमेमनॉन.
या तर, आणि
सूड घेणाऱ्या झ्यूसचा नांगर
ज्याच्या हाताने ट्रॉयवर फिरला
त्याला साजेल असे त्याचे
राजेशाही स्वागत करा.
(त्या नांगराने) ट्रॉयचे मनोरे फोडले
तिची शेते घायाळ करून नरम आणली
आणि त्या सुभग मातीतून
तिचे बीज उखडून टाकले.
अँट्रियसच्या पुत्राने
ट्रॉयच्या गळ्याभोवती
असा कठोर लगाम आवळला
आणि आता
विजयी होऊन परत येत आहे तो
मर्त्य मानवात उच्चतम
असे मानसन्मान मिळवण्यासाठी
कारण पॅरिस काय
किंवा त्याची साथ करणारे शहर काय
अशी प्रौढी मिरवू शकणारच नाहीत
की त्यांचे कर्म त्यांना मिळालेल्या शिक्षेपेक्षा
जास्त थोर होते.
चोरी आणि दरवडेखोरी हे आरोप सिध्द होऊन

त्याने गमावली आहे त्याची प्रिय लूट
नष्ट केले आहे आपल्या पित्याचे घर आणि सिंहासन,
आणि त्याच्या प्रजेला
भरावा लागला आहे
दुप्पट भुर्दंड त्याच्या पापाबद्दल.

श्रेष्ठीवृंद : ग्रीक सैन्याच्या अग्रदूता! स्वस्त्यस्तु:
स्वागत असो स्वगृही तुझे.

दूत : आभारी आहे मी.
दहा वर्षे मी जिवंत रहावे म्हणून प्रार्थना केली
आता मी (सुखाने) प्राण सोडीन.

श्रेष्ठीवृंद : आरगॉसची तुझ्या गृहाची आस
तुला व्यथित करीत होती ना?

अग्रदूत : अतिशयच तापदायक रीतीने
आणि आता आनंदाश्रूंनी माझा झगा
ओला झाला आहे.

श्रेष्ठीवृंद : तुझ्या व्यथेला आनंदाचीही
एक बाजू होती की.

अग्रदूत : काय म्हणायचे आहे तुम्हाला?

श्रेष्ठीवृंद : तुझे प्रेम आणि तुझी ओढ
ह्यांची परतफेड होत होती, ही आनंदाची
गोष्ट नाही का?

अग्रदूत : म्हणजे आम्ही आरगॉससाठी
तळमळत होतो तसे आरगॉसही आमच्यासाठी

तळमळत होते असे तुम्हाला
म्हणायचे आहे का?

श्रेष्ठीवृंद : दुःखाने काळवंडली होती
आमची अन्तःकरणे तुमची फार आठवण होत होती
आणि गरजही भासत होती आम्हाला.

अग्रदूत : काय संकट आले होते तुमच्यावर?
कोणी शत्रू चाल करून आला होता का?

श्रेष्ठीवृंद : मी फार पूर्वी एक गोष्ट शिकलो.
जेवढे कमी बोलावे तेवढे
लवकर टळून जाते संकट.

अग्रदूत : पण राजाच्या अनुपस्थितीत
आरगॉसवर परचक्र आले होते का?

श्रेष्ठीवृंद : मित्रा आताच तु म्हणालास
की मृत्यूचे खुषीने स्वागत करशील तू.
आमची हृदयेही तेच म्हणत आहेत.
तुझ्या भावनेचा प्रतिध्वनी
उठतो आहे आमच्या हृदयात.

अग्रदूत : होय. आता युध्द संपले आहे.
आणि सारे काही ठीक आहे.
अशा वेळी मरायला हरकत नाही मला.
आठवणी धूसर होतात काळाच्या प्रभावाने
काही गोष्टी माणसाला चांगल्या म्हणून आठवतात
काही अप्रिय म्हणून लक्षात रहातात.
आपण काही देव नव्हे
मग आयुष्यभर सौख्यच अखंड भोगता यावे

# ॲगमेमनॉन

अशी अपेक्षा का करावी आम्ही ?
आम्ही काय काय सोसले त्याची आठवण
काटा आणते अंगावर.
जर त्या साऱ्याचे मी वर्णन केले –
आम्ही जिथे तळ टाकला ती घाणेरडी बिळे
तिथली घाण आणि आम्हाला आलेला शीण आणि घाम.
किंवा समुद्रावर असताना –
रात्रभर चाललेली वादळे
आणि त्यामध्येच
अरुंद फळ्यांवर
अर्धमुर्धे घोंगडे पांघरून केलेली
झोप मिळवण्याची धडपड
आणि सारा दिवस
ते हाल सोशीत राहिलेले
वैतागलेले-कष्टी असे आम्ही.
नंतर जेव्हा आम्ही किनाऱ्यावर उतरलो
तेव्हा तर परिस्थिती आणखीच कठीण झाली
शत्रूच्या तटबंदीच्या अगदी जवळ
नदीकाठच्या ओल्या कुरणात
आम्हाला तळ टाकावा लागला.
दंव आणि धुक्याने चिंब भिजलेले
दमट कपड्यांनी गारठून रुग्णाईत झालेले असे आम्ही.
जटा झालेल्या होत्या आमच्या केसांच्या
रानटी माणसांसारख्या
आणि जर मी हिवाळ्याचे वर्णन करू लागलो
जेव्हा इडावरून वहात येणाऱ्या
जीवघेण्या बर्फाळ वाऱ्यांनी
झाडांवर जागच्याजागी पक्षी गोठून जात होते -
किंवा जर वर्णन करू लागलो
त्या भयंकर उष्म्याचे
जेव्हा सागर - लाटा नाहीत

## ग्रीक शोकनाट्ये

वरून वारे वहात नाहीत-
अशा स्थितीत त्याच्या पात्रात
पडून रहात होता
झोपत होता दुपारच्या वेळी
पण जाऊ द्या. ही वेळ कण्हण्या कुंथण्याची नव्हे.
ते सारे संपले आहे आता.
आणि त्या तिथे जे मृत्यू पावले
त्यांच्या लेखीही सारे संपले आहे आता,
हुकूम सुटताच उडी मारून उठायला नको आता त्यांना.
सुखाने विश्रांती घेऊ शकतील ते.
जे खर्चीच पडावयाचे होते
त्यांचा नामनिर्देश कशाला करायचा आता?
आणि जिवंत असणाऱ्यांना
जुन्या जखमांवरच्या खपल्या पुन्हा काढून कशाला दुखवा?
आणि जर आपण शहाणे असू तर
जयजयकाराच्या गर्जनाही आता करणे नको.
घरी सुखरूप आलेल्या आम्हाला
जे चांगले निष्पन्न झाले आहे
त्याची किंमत फार वाटते आहे.
जे भोगावे लागले ते
त्यापुढे काहीच नाही.
जी स्तुती करायला हवी आहे
ती मोठ्या अभिमानाने
(दगडावर) कोरलेली आहे,
तेजस्वी सूर्यप्रकाशात उठून दिसणाऱ्या या शब्दांनी.
"आरगॉसच्या सैन्याने
ट्रॉय जिंकले आहे
आणि सागर आणि धरती ओलांडून
स्वगृही परत आणली आहे त्यांनी
ही परिश्रमाने जिंकलेली लूट -
पुरातन महालांची शोभा वाढवणारी

त्यांचे भूषण ठरणारी
आता हेलीनी वंशाची मंदिरे
शोभायमान करून
विजयचिन्ह होऊन राहील ती."
ऐकू दे हे आरगॉसला
आणि करू दे स्वागत ही नगरी
तिच्या सेनापतीचे स्वगृही स्तुतीसुमनांनी
कृतज्ञतेने आणि प्रशंसेने भारावून.
ज्याने आम्हाला विजय मिळवून दिला
त्या झ्यूसच्या थोर कृपेबद्दल
त्याला धन्यवाद.
जास्त काही सांगायचे नाही मला.

श्रेष्ठीवृंद : ठीक चुकलो तर मग मी मगाशी.
कबूल करतो मी ते.
वृद्ध जर शिकायला तयार असला
तर तो तरुणच म्हणायचा.
पण ही मोठी महत्वाची बातमी आहे.
खास राजमहालासाठी
आणि विशेषत: क्लायटेमनेस्ट्रासाठी
तिच्या आनंदातिशयात सहभागी आहोत आम्ही.

(क्लायटेमनेस्ट्रा राजमहालाच्या दारात उभी असलेली दिसते)

क्लायटेमनेस्ट्रा : ह्या विजयाचे स्वागत
आनंदगीतांनी मी केव्हाच केले –
जेव्हा मध्यरात्री
त्या पहिल्या अग्निसंदेशाने मला कळवले
की ट्रॉय जिंकले गेले आहे
खिळखिळे केले गेले आहे–
कोणीतरी तेव्हा धारेवर धरले मला.

"खुणेच्या अग्निज्वाला?
तर मग तू विश्वास ठेवतेस त्यांच्यावर?
ट्रॉयचा पाडाव झाला असे वाटले तुला?
बायकांच्या जातीला पुजलेला आशावाद हा"
या असल्या शेऱ्यांनी
माझा मूर्खपणा उघड करून दाखवला गेला.
तरीपण मी कृतज्ञतापूर्वक यज्ञ केला.
साऱ्या आरगॉसभर स्त्रिया,
सगळ्या देवस्थानातून, स्तुतीपर गीतांनी
आणि सुगंधी धूर निघत असलेल्या होमात
पुष्ट रूचकर मांसाच्या हवनाने
विजयोत्सव साजरा करण्यासाठी जमल्या
तुमच्याकडून तपशीलवार हकीकत ऐकण्याची
गरज पडणार नाही मला आता.
स्वतः महाराजांच्या तोंडूनच ऐकेन मी सारे.
पण प्रथम
लवकर आणि यथोयोग्य रीतीने
स्वागत करायला हवे
माझ्या आदरणीय पतीच्या
स्वगृहागमनाच्या समयी.
कारण कुठल्याही पत्नीला
देवाच्या कृपेने
युद्धाहून सुखरूप परत येणाऱ्या आपल्या स्वामीचे
स्वागत करण्यासाठी
सताड कवाडे उघडण्याच्या दिवसाहून
जास्त सुखकर दिवस दुसरा कुठला असणार?
माझा निरोप न्या त्यांच्याकडे.
लवकर या म्हणावे
आरगॉस तुमची आतुरतेने वाट पहात आहे
आणि घरी त्यांना आढळेल की
आपली पत्नी —

जातांना त्यांनी जिचा निरोप घेतला
ती निष्ठावंत पत्नी -
अजूनही आपल्यावर तितकीच एकमेव निष्ठा ठेवून आहे
जणू पहारा करणारा दारीचा श्वानच.
कुठल्याही तऱ्हेचा बदल झालेला नाही तिच्यात,
कुठल्याही शत्रूला दाद दिली नाही तिने.
ह्या दहा वर्षांत
त्यांनी मोहोरबंद करून ठेवलेल्या
कुठल्याही वस्तुच्या मोहारेला
धक्का लावलेला नाही मी
इतर पुरुषांबरोबर मिळणारे सुख
किंवा वाऱ्यावरच्या निंदापर वावड्या
ह्या दोन्ही बद्दल तितकीच अनभिज्ञ आहे मी
जितकी गरम पोलादाच्या मज्जनक्रियेबद्दल.
(क्लायटेमनेस्ट्रा राजवाड्याकडे जाते)

अग्रदूत : मोठी चमत्कारीक आत्मप्रौढी आहे
ही आणि यातले खरेपणाचे प्रमाण
जितके अधिक तितकी त्यातली विचित्रताही
अधिक. पण राणीने असले शब्द
उच्चरावे हे दोषास्पद नाही का?

श्रेष्ठीवृंद : विचित्र!
छे; छे;!
तिची बोलण्याची तऱ्हा नीट समजली नाही तुला.
पण आम्हाला लावता येतो
तिच्या बोलण्याचा अर्थ.
अगदी योग्य तेच बोलली ती.
दोष ठेवायला जागाच नाही ना.
दूता, आता आम्हाला आमचा प्रिय
राजा मेनेलॉस याच्याबद्दल सांग ना.

तो पण परत आला आहे ना?
तुमच्याबरोबरच नौकेत प्रवास केला का त्याने?
तो सुखरूप घरी पोचला आहे का?

अग्रदूत : तुमची शुभ बातमीची आशा फोल आहे. मी देऊ शकत नाही अशी बातमी तुम्हाला. माझ्या मित्रांनो फसवणूक फार काळ तुम्हाला समाधान देऊ शकणार नाही.

श्रेष्ठीवृंद : चांगली कथा खोटेपणाने सांगितली तरी तिच्यातले सत्य काही लपत नाही. जेव्हा सत्य आणि चांगली बातमी ह्यांची फाटाफूट होते तेव्हा त्या दोहीतली खोल दरी स्पष्टच दिसते

अग्रदूत : ऐका तर मग. मेनेलॉस नाहीसा झाला आहे त्याचे जहाज आणि सर्व काही दृष्टीआड गेले आहे.

श्रेष्ठीवृंद : तो ट्रॉयहून तुमच्या बरोबरच समुद्रप्रवासास निघाला आणि मग वादळ तुमच्या जहाजांवर कोसळले व तेव्हा तुमच्या जहाजांपासून त्याचे जहाज अलग झाले असे का म्हणायचे आहे तुम्हाला ?

अग्रदूत : अचूक नेम आहे तुमचा ! दु:खाचे एक पर्व अवघ्या तीन शब्दात व्यक्त केलैत.

श्रेष्ठीवृंद : पण मेनेलॉस !
त्याचे काय झाले असा तर्क आहे सर्वांचा ?
तो परत येण्याची आशा सोडून दिली आहे का सगळ्यांनी ? का अजूनही तग धरून असेल तो ?

अग्रदूत : कोणीही काही सांगू शकणार नाही त्याबद्दल कारण कोणाला काही माहीतच नाही. कदाचित सूर्यदेव– जो जीवमात्राचे ह्या पृथ्वीवरील आयुष्य जोपासतो तोच एक जाणत असेल कदाचित. आयुष्य जोपासतो तोच एक जाणत असेल कदाचित.

श्रेष्ठीवृंद : जेव्हा त्या वादळाने आपला जहाजांचा ताफा नष्ट केला तेव्हा आकाशस्थ शक्तीच्या रागाचा काही अंश तरी शांत झाला असे मला वाटते तुला म्हणायचे आहे.

अग्रदूत : हा शुभ आणि सुंदर दिवस वाईट बातमी तोंडातून काढून बिघडवून टाकणे योग्य आहे का? कृतज्ञता दर्शविण्यासाठी देवांची प्रार्थना केल्यानंतर असले भाषण अगदीच अस्थानी आहे. डोळयात रक्त उतरले असतांना जेव्हा माणूस भकास, एकटक नजरेने घातपात आणि भीषणता यांची मोजदाद करू लागतो –

मारून काढलेले सैन्य,
डगमगणारा रक्ताळलेला राज्याचा डोलारा
ओस पडलेली घरे
युद्धाचे चाबूकच जणू
अशा जाळपोळ आणि कापाकापी
यांनी जीवनातून झोडपून उठवलेली,
उडवून दिलेली माणसे-लढाऊ जहाजे –
आज मला अशा गोष्टींची जर देवघेव करायची असती
तर मी म्हटलेली ही सर्वनाशाची जयगाथा
ठीक साजून दिसली असती
पण माझी बातमी आहे विजयाची
आणि ती आणली आहे मी
या हर्षोत्फुल्ल नगरीकडे
मग या अशा आनंदाला
दुःखाचे ग्रहण कसे लावू मी?
कसे सांगू त्या घातक सशस्त्र युतीबद्दल
जी दुर्दैवाने क्रुद्ध देवांबरोबर केली
आमचा पाठलाग करून
आम्हाला सतावण्याच्या हेतूने
कारण पूर्वापारचे वैरी असलेल्या
अग्निने आणि जलाने मैत्री केली
आणि दोघांनी मिळून

## ग्रीक शोकनाट्ये

ग्रीसच्या तरूणांची हत्या करण्याबद्दल
निर्धारपूर्वक शपथा घेतल्या.
एका रात्री थ्रेसहून आलेल्या वादळामुळे
एक कराल लाट उसळली.
स्वत:च्याच कळपाची चिरफाड करणारा
वेडा मेंढपाळ बनले आकाश
माज आलेल्या मेंढ्यांसारखी
जहाजांवर जहाजे धडकली
वाऱ्याचे आणि पाण्याचे
पर्वतच्या पर्वत भोवती उसळ्या मारू लागले
उधाणाने गिळले आणि पावसाने झोडपले
आमच्या जहाजांना
पहाट झाली-पण कुठे होती आमची जहाजे?
तेजोमय सूर्य आपली किरणे चमकवू लागला
आणि आम्ही पाहिले,
इजियनचा सागर
मृत ग्रीकांच्या चेहऱ्यांनी
आणि फुटलेल्या जहाजांच्या तुकड्यांनी दाट फुलला होता....
आमचे जहाज टिकाव धरून होते
आणि आम्ही त्या साऱ्यातून निभावलो
त्या रात्री ह्या मर्त्यलोकीच्या
कुणा रहिवाशाच्या हातात नव्हते आमचे सुकाणू.
तर काही युक्तीने किंवा कुणाकडे तरी रदबदली करून
कोणा देवानेच आमचे प्राण वाचवले.
सुदैव हसतमुखाने आमच्या जहाजाच्या
अग्रभागी बसले होते.
आमच्या जहाजाला फटी पडल्या नाहीत
किंवा ते खडकांवरही आदळले नाही.
दुसऱ्या दिवशीची सकाळ उजाडली
आणि त्या सूर्यप्रकाशात
स्तंभित झालेले, रुग्णाईत,

अजूनही आपल्या स्वतःच्या सुदैवावर
विश्वास बसत नसलेले आम्ही
सारखा विचार करू लागलो
आपल्या मोडतोड झालेल्या,
आणि उध्वस्त जहाजांच्या ताफ्याचा
आणि ते जर ते अजून जिवंत असतील तर –
आता चर्चा करीत असतील
दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडलेल्या आमची
ज्या फेऱ्यात ते सापडले
असे आम्ही समजत आहोत.
पण तरीही,
सर्वात उत्तम बातमी असेल
तीच खरी ठरो
आणि मनेलॉसबद्दल बोलायचे तर
दुसऱ्या कुठल्याही गोष्टीपेक्षा
त्याच्या स्वगृही परत येण्याची अपेक्षा करीत रहा.
जर एकाद्या शोधक सूर्यकिरणाला
तो जिवंत आणि सुखरूप दिसला,
जर झ्यूसच्या संकेताने
अजून ह्याच्या वंशाला
नष्ट करायचे ठरवले नसेल तर -
तरमग आशा आहे की मेनेलॉस
अजूनही सुखरूप घरी येईल
आणि मी आतापर्यन्त बोललो
त्यातला तुम्ही ऐकलेला प्रत्येक शब्द सत्य आहे.
(अग्रदूत आला त्या दिशेने निघून जातो.)

श्रेष्ठीवृंद : कोण होता तो अज्ञात द्रष्टा
ज्याने हा विशेष विचार न करता
सहज प्रेरणेने
दैवात काय लिहिले आहे

## ग्रीक शोकनाट्ये

त्याचे भविष्यज्ञान झाले -
जिच्यायोगे अचूक तर्क बांधला त्याने
आणि निवडले नाव एका अर्भकाचे
आणि कौशल्याने सत्याशी प्रतीकाचा संबंध जुळवला,
आणि नावाचे करणीशी नाते जोडले -
एकदम स्फूर्ती होऊन
त्याने नामकरण केले
त्या भाल्यांच्या चमकत्या वधूचे
जिच्यासाठी मर्द लढले
आणि मृत्युमुखी पडले -
हेलन — विनाशिका!
कुणाच्या ओठावर उमटले
ते यथायोग्य आणि घातक नाव?
ज्याच्यामुळे जहाजातील लुटीने
समुद्र तुडुंब भरून गेले
तलवारींनी जिते जीव नासावले
आणि एक नगरी ज्वालांचे भक्ष्य झाली
आपली पडदानशीन मऊ शय्या सोडली तिने
पश्चिमेचा वारा उंच उंच शिडात
राक्षसासारखा घुमताना ऐकण्यासाठी
आणि लवकरच उठली आरोळी
सुरू झाला गोंगाट
शस्त्रसज्ज हजारोंनी धावले
तिच्यामागे निशाणी ठेऊन न गेलेल्या
वल्ह्यांचा माग काढण्यासाठी
आणि सिमॉईस नदीच्या दगडगोट्यांनी भरलेल्या काठांवर
आपली जहाजे नांगरली त्यांनी
त्या शेतांजवळ -
जिथे आज गवत माजले आहे
युद्धाच्या विपुल वर्षेने लाल झालेल्या जमिनीत.

## ॲगमेमनॉन

आणि उसळलेल्या, दयाहीन, ठाम
अशा क्रोधाने शिकवले ट्रॉयला
की शब्द हे दुधारी शस्त्र आहे.
देव आणि मानव
बंधन आणि वचन
हे शब्द वापरतात-
एक अपार प्रेमासाठी आणि दुसरा अटळ विनाशासाठी.
वधूवरांची हृदये प्रेमाने निबद्ध होतात
आणि प्रेमाचा शिक्का
हा विनाशाचाही असू शकतो.
पवित्र विवाहगीत उच्च स्वरात निनादते
रात्र आणि त्याची वधू ह्यांचा
त्यांचे बांधव सन्मान करीत असतांना
त्या घटकेचे ते भाग्यवान स्वामी असतात
पण ते भाग्य फार काळ टिकत नाही.
कोप – काळाच्या संथ लाटेवर स्वार होऊन येतो
आणि दुष्ट गुन्ह्याबद्दलच्या मोलावर हक्क सांगतो.
भ्रष्ट केलेले घर
अवमानित केलेला देव -
आणि मग गाणी अश्रूंत मग्न होतात
आणि मग पुरातन ट्रॉयला
एक नवाच सूर शिकावा लागतो.
एकेकाळचा तिच्या प्रशंसेचा
आणि अभिमानाचा केंद्रबिंदू-
पॅरिस -
त्याच्यावर ती दूषणांचा वर्षाव करते
म्हणते की त्याच्या अहंकारी प्रणयाराधनाने
त्याचा आणि तिचा सर्वनाश ओढवून आणला.
सर्व बाजूंनी तिच्या पुत्रांची कोंडी झाली
तिचा जीवनरस निर्घृणपणे सांडला गेला
नुकसान झाले तिचे आणि दोष सारा त्याचाच.

## ग्रीक शोकनाट्ये

एका धनगराने एकदा
आपल्या घरी वाढवला
एक सिंहाचा छावा.
पित्या कोकरांच्या दूधात तो वाटेकरी होई.
अगदी सौम्य होता तो.
मुलांचे प्रेम होते त्याच्यावर.
वृद्ध बघत आणि स्मित करीत.
पुष्कळदा तो धनगर
लहान मुलासारखे
आपल्या बाहुत उंचावर धरी त्याला
आणि पुष्कळदा तो
तीव्र भुकेने कासावीस झाला की
स्नेहाळ डोळ्यांनी आणि कुरवाळणाऱ्या जिभेने
त्याचा हात शोधी.
पण हळूहळू तो
आपल्या मूळ जातिस्वभावावर जाऊ लागला.
त्याला जो अन्न आणि निवारा मिळाला होता
त्याची परतफेड केली त्याने
कोणीही न सांगतासवरता
एका मेजवानीची तयारी करून,
लवकरच लचके तोडलेल्या मांसाचा
किळसवाणा दर्प घरभर पसरला.
त्या भीषण हत्याकांडाने
सारी भूमी रक्ताळ चिखलाने
बरबटून गेली.
असहाय्य परिचारक
अश्रू गाळीत जमीनीला खिळून
एकटक बघत राहिले.
कोकरांबरोबर वाढवलेला कोवळा बच्चा
आता पुऱ्या वाढीचा पशू बनला होता.
आणि आता विनाशाचा पुरोहित म्हणून

आपले स्वाभाविक कार्य पार पाडीत होता

आणि म्हणून मग आली ट्रॉयमध्ये
अशी एक रमणी की जिच्या आंगोपांगी
कल्पनेत सुद्धा अवतरणार नाही
असे सौंदर्य फाकले होते.
वसंतातल्या मधुर प्रसन्नतेची
एक निःशब्द जादू होती तिच्यात
वैभवाने जीव टाकावा अशी अपूर्वाई होती.
(तिच्या) कटाक्षातील सौम्य चमक
हृदयांना विद्ध करीत होती आणि शांतवीतही होती.
पुरुषाचे हृदय विस्मयाने आणि लालसेने
विरघळवून टाकील
असे एक पुष्प होते ते.
पण काळ पुढे सरकत राहिला
आणि प्रीतीचे साफल्य
त्याच्या मूळच्या मधुर मार्गापासून ढळले.
एकेकाळच्या त्यांच्या वसंताच्या आनंदसदृश असलेल्या तिचे
एकदम रूपांतर झाले
आणि प्रत्येक घरावर प्रत्येक जीवितावर
वेगाने कोसळणारा शाप ठरला तो
ज्यांच्या स्वागताने एकेकाळी
त्या स्वदेशातून बहिष्कृत झालेल्या पत्नीला
मैत्रीचा हात दिला होता.
एक पिशाच्चीच जणू -
यजमानाच्या आणि अतिथीच्या
अधिष्ठात्या देवाने पाठवलेली -
ज्याचा कायदा तिच्या प्रियकराने
उल्लंघिला होता-
ती झाली कारण त्याचे हृदय चुरडून टाकण्याला
आणि ट्रॉयचा अभिमान मोडून काढण्याला.

## ग्रीक शोकनाट्ये

जेव्हा ही धरित्री आणि काळ
दोन्हीही कोवळ्या वयाचे होते तेव्हा
एक साधी जुनी म्हण आहे
अगदी सर्वसामान्य माणसांच्या भाषेतली
त्याच्यात सांगून टाकलेले आहे
की माणसाने सुदैव एकदा पूर्णत्वाला पोचले
की मग ते वांझ रहात नाही
तर आपला वारस निर्माण करते
जीवनातील चांगुलपणातून
निसर्गाच्या नियमाने निर्माण होते
अटळ अरिष्ट
आणि शेवटी दारूण निराशा
मी जेव्हा आपल्याशीच विचार करतो
तेव्हा माझे मन ह्या सर्वसामान्य लोकांच्या विश्वासाचा
इन्कार करते.
उत्कर्ष नव्हे तर पाप
जे दु:खाचे उगमस्थान आहे
कारण पापी कृत्ये
स्वजातीय कृतींना जन्म देतात
आणि वृद्धिंगत होत जाणे
हा दुरिताचा स्वभावच आहे.
ज्या घराण्यातील वागणे बोलणे न्याय्य असते
त्यालाच-काळ लोटेल तसतसे
अक्षय्य वैभव मिळते
आणि त्याचे थोर पुत्र त्याचा वंश पुढे चालवतात.
म्हणून कार्यकारणाच्या नियमानुसार
जो माणूस कुमार्गाने जाणे पसंत करील
त्याच्या ठिकाणी
अहंकार किंवा पापाची थोरली पाती
औद्धत्याची खालची पाती निर्माण करील,
ही पापाची धाकटी पाती

पुन्हा जन्म देईल आणखी एका अज्ञात शक्तीला
ज्यांनी तिला जन्म दिला त्या शक्तीच्याच जातकुळीची.
उर्मट अविवेक – ज्याचा जोर पर्वा करीत नाही
युद्धाची व हिंसाचाराची
ना परलोकाची ना ऐहिकाची
ज्याच्या भीतीचे सावट
एकाद्या काळ्या ढगासारखे
ज्याचा विनाश निश्चित झाला आहे अशा घरावर
प्रहरानुप्रहर दाटून रहाते-
भीती अनुताप आणि यातना
ह्यांनी घातकी ठरणारे

पण न्यायदेवता आपल्या चमकदार नेत्रांनी
उजळून टाकते धुरकटलेले, कळकट, घरकुल सुद्धा.
जे इभ्रतीला मानतात त्यांचा सन्मान करते
आणि दूरवर शोध करते अशांचा
की ज्यांची हृदये निष्कलंक असतील.
औद्धत्य धारण केलेली नीचता जेथे छपून आहे
असे सुवर्णमहाल दुर्लक्षून निघून जाते ती
सत्ता आणि ऐश्वर्य एकत्र असले
आणि साऱ्यांच्या स्तुतीचा फसवा शिक्का त्यांच्यावर असला
तरी ते तिच्या आदरास पात्र होत नाहीत
सुजनता आणि दुरित ह्या दोहींनाही
ती त्याच्या निश्चित झालेल्या पथाने
त्याच्या निश्चित असलेल्या अखेरीकडे
संभाळून घेऊन जाते.
(ॲगमेमनॉन त्याच्या रथातून येतो. त्याच्या मागच्या दुसऱ्या रथात युद्धातली लूट व कॅसॅन्ड्रा आहेत.)

श्रेष्ठीवृंद : आमचा राजा!
ॲट्रियसचा पुत्र! ट्रॉयचा विजेता!

कोणत्या शब्दात स्वागत करू आम्ही तुमचे?
आमच्या हृदयातील भक्ती व्यक्त करण्यासाठी
कोणचे शब्द वापरू आम्ही?
सत्य आणि व्याप्ती ह्या दोहींची कदर करून
आमचे प्रेम तोकडेही भासणार नाही
व अवास्तव अधिकही वाटणार नाही
असे कसे काय बोलावे आम्ही?
ज्यांची सद्सद्विवेकबुद्धी शुद्ध नाही
असे कित्येक
स्तुतीचा देखावा करणे फार महत्वाचे मानतात.
जेव्हा दैव फिरते तेव्हा
त्या दुर्दैवी जीवांना दुःखाची नांगी
ज्यांच्या हृदयाला डसलीच नाही
अशांचे दुःखाश्रूंनी डबडबलेले डोळे
दिसतात चारी बाजूंना.
तसेच आता काही कठोर, कडवट चेहेरे
बळेबळे शोभिवंत हास्य मुद्रेवर आणून
तुमचे स्वागत करतील.
पण त्याच्या दांभिक आनंदामागे
द्रोहयांचे अन्तःकरण दडलेले असेल.
पण एकाद्या शहाण्या धनगराला
आपल्या कळपाची ओळख त्याच्या तोंडवळ्या वरून केव्हाच पटते
आणि ज्ञानी राजाला
खोट्या स्तुतीपाठकाच्या
ओल्सर, ओशट, लाळघोट्या नजरेची
पारख तेव्हाच होते
मनात नसलेल्या निष्ठेची
उद्बोधक खूणच आहे ती (नजर).
आता मी हे लपवून ठेवणार नाही.
दहा वर्षापूर्वी
हेलनसाठी ग्रीसला तुम्ही युद्धाच्या मार्गाकडे नेलेत

तेव्हा तुम्ही शहाणपणाच्या मार्गापासून फार दूर
आपली जहाजे हाकारता आहांत असेच तुमच्याबद्दल म्हणण्यात आले.
जेव्हा तुम्ही
देवभोळ्या सैनिकांचे नीतीधैर्य टिकवून धरण्याचा प्रयत्न केलात
बळी देऊ करून वादळ शमवण्यासाठी,
तेव्हा तुम्ही गैर केलेत -
तुम्ही चुकीच्या मार्गाने जात आहात
असेच आम्हाला वाटले.
पण आता ते दिवस निघून गेले आहेत.
तुम्ही विजयी होऊन घरी आला आहात
आणि आता आम्ही अगदी मोकळ्या मनाने
तुमचे भले चिंतीत आहोत.
काळ आम्ही तुम्ही स्वत: घेतलेला शोध
तुम्हाला दाखवून देतील
की तुमच्या लोकांपैकी
इमान कोणी दाखवले
आणि तुमची फसगत कोणी केली.

अॅगमेमनॉन : हे आरगॉस नगरी
आणि तिच्या रहिवासी देवतांनो,
सुखरूप परत आल्याबद्दल माझ्याकडून
हवा जे त्याचे अभिवादन स्वीकारा प्रथम
या पुनरागमनाच्या आणि प्रायॅमच्या ट्रॉयचा
मी जो न्याय्य सूड घेतला
त्याच्या यशात माझ्याबरोबर स्वर्गस्थ देवतांचाही वाटा आहे.
मी अविरत केलेल्या विनवण्या
स्वर्गीय देवतांच्या कानापर्यन्त पोचल्या
ट्रॉयचा न्यायनिवाडा झाला
आणि क्षणभर सुद्धा विचलित न होता
त्या अमर देवतांनी
आपली मते मृत्यूच्या करंडकात टाकली

## ग्रीक शोकनाट्ये

आणि ट्रॉयचे तट मातीला मिळणार
आणि तिचे रहिवासी तलवारीच्या धारेला बळी पडणार
हे निश्चित झाले.
तिची (ट्रॉयची) सुटका निश्चित करणाऱ्या करंडकाने
आशा फक्त जवळ आलेली पाहिली पण
प्रत्येक रिकाम्या हाताबरोबर
ती नजरेआड पण झाली.
अजून वर जात असलेला धूर
महानगरी ट्रॉयचा पाडाव झाल्याचे स्पष्ट करतो आहे.
विनाशाच्या (त्या) यज्ञातल्या ज्वाला
अजून धगधगत आहेत
आणि त्या जसजशा विझत आहेत तसतसा
त्या खाली बसलेल्या राखेतून
मृत वैभवाचा आणि विलासाचा
धूप जळल्याचा वास
वाऱ्याबरोबर वहात येत आहे.

आता ह्या विजयासाठी आमची श्रद्धापूर्ण -
धन्यवादाची प्रार्थना.
सांगू दे पुन्हापुन्हा वर्णू दे
स्वर्गस्थांची ही कृपा.
ट्रॉयने मोठ्या दिमाखाने केलेल्या बलात्कारासाठी
स्त्रीसाठी मोजावी लागते
तीच किंमत तिला मोजायला लावली आहे आम्ही.
आरगॉसचा पशु
आमच्या सर्वांच्या ढालींवरचा आक्रमक सिंह
ऐन मध्यरात्री घोड्याच्या पोटातून झेप टाकून आला
त्या नगरीच्या हाडांचे चूर्ण करण्यासाठी.
– एक भुकेली, ओळीने आलेली पिलावळ,
– भिंतीवरुन आणि मनोऱ्यांवरुन
उड्या टाकीत आली

आणि लालसा पूर्ण तृप्त होईपर्यन्त
तिने राजरक्त चाटले.

या प्रमाणे त्या देवांना
मी प्रथम शतशः नमन करतो.
तुमच्या सल्ल्याबद्दल म्हणाल
तर मी ध्यानात घेतला आहे तो.
मला पटते आहे तुमचे म्हणणे
उचलून धरतो मी तुमचा निर्णय.
असे फार थोडे असतात
की ज्यांच्या अंतरंगीचे प्रेम
मित्राचं वैभव पाहून
उचंबळून येतेच
मत्सराचा वासही नसतो त्याला.
हिरमोड झालेल्या मनाला
मत्सराचे विष ग्रासून टाकते
आणि त्याचे दुःख द्विगुणित करते.
स्वतःच्या नुकसानाबद्दलच्या दुःखाइतकेच,
शेजाऱ्यांच्या वैभवाचे दुःख होते माणसाला.
जे खूप प्रेमाचा देखावा करतात, त्यांचे प्रेम
पण विचारांती सावलीच्या सालीसारखे फोल ठरते.
अशी माणसे कशी दिसतात ते
दीर्घ जीवनाने व सतत निरीक्षणाने
शिकवले आहे मला.
माझ्या प्रत्यक्ष अनुभवाची गोष्टच
बोलतो आहे मी.
एक पुरुष-ओडिसीयस् –
जो आपल्या मनाविरुद्ध
जहाज हाकारून निघाला होता
तो आजच्या घटकेला
जिवंत आहे की मृत कोण जाणे –

फक्त एकट्या त्यानेच
एकदा जोखीम घेतल्यानंतर
अगदी खुषीने माझे ओझे वाटून घेतले.

राज्यकारभाराच्या कामकाजासाठी आणि
लोकांच्या संभाव्य नाराजीच्या भीतीच्या दृष्टीने
आपण आपल्या नागरीकांच्या सभेसाठी
आणि चर्चेसाठी एक दिवस नेमू
आणि जाणतेपणाने सल्लामसलत करू
जर उद्भवलेल्या रोगाला उपाय करायचा असेल
तर नगरीच्या कल्याणासाठी
अग्नीने किंवा सुरीने तिचे शुद्धीकरण
केलेच पाहिजे
आणि आता मला माझ्या घरी जायचे आहे.
माझ्या स्वत:च्या वेदीवरील अग्नीकुंडाजवळ उभे राहून
स्वर्गस्थांना माझे पहिले अभिवादन करायचे आहे.
त्याच्या संरक्षकशक्तीने
युद्धार्थ प्रस्थान ठेवण्यास उद्युक्त केले मला
आणि त्यांनीच सुखरूप स्वगृही आणले.
विजयदेवता-जिने माझे आजवर संरक्षण केले
ती मला सदैव अशीच साथ देवो.

(क्लायटेमनेस्ट्रा येते. तिच्यांबरोबर असलेल्या दासींनी लाल रेशमी चादरीसारखे एक लांबलचक वस्त्र हातातून आणले आहे)

**क्लायटेमनेस्ट्रा :** श्रेष्ठींनो आणि आरगॉसच्या नागरीकांनो
आता तुमच्या उपस्थितीतच
मी, न संकोचता,
एका पत्नीचे तिच्या पतीबद्दलचे प्रेम
बोलून दाखवणार आहे.
कालांतराने आत्मविश्वास निर्माण होतो.

अॅगमेमनॉन

आता मी जे सांगणार आहे
ते मी शिकले-कोणीही न शिकवता.
ह्या दहा वर्षात,
जी माझ्या पतीने घालवली
इलिऑनच्या तटबंदीखाली
या दीर्घकालात मला जे जे सोसावे लागले
त्यानेच ज्ञान झाले मला हे.
पहिली गोष्ट म्हणजे
स्त्रीने निराधार अवस्थेत
पुरुषसहवासाशिवाय घरी रहायचे
ही फार दु:खद गोष्ट आहे.
दुसरी गोष्ट एकापाठोपाठ एक येणाऱ्या प्रवादांनी
साऱ्या राजवाड्याला घाबरवून टाकले.
प्रत्येकाची बातमी त्याच्या आधीच्या बातमीपेक्षा
जास्त वाईट असायची.
काय सांगू! जर ट्रॉयपासुन आरगॉसपर्यन्त
पसरत येणाऱ्या "अफवांनी"
जितक्या जखमा माझ्या पतीवर लादल्या
तितक्या जर त्याला खरोखर झाल्या असत्या
तर एव्हांना तो छिद्राछिद्रांचे
एक जाळेच झाला असता
किंवा ज्या ज्या वेळी
त्याच्या मृत्यूची बातमी येत राहिली
त्या त्या प्रत्येक वेळी जर तो मृत झाला असता
तर आज तो एक प्रतिगेरीऑनच झाला असता
त्याच्या अमानुष हक्काची ऐट मिरवणारा
— प्रत्येक मृत्यूसाठी - प्रत्येक मृत देहासाठी
एक कबर.
भूमीने तीन वेळा त्याच्यावर चादर पसरली असती.
पुष्कळदा अशा निर्घृण बातमीनंतर
निराशेने माझ्या गळ्याभोवती फासाचा दोर अडकला

जो माझ्या मनाविरुद्ध बळजबरीने
नंतर काढला गेला.

आपले मूल - आपल्या सच्च्या प्रेमाची
खूणगाठ - ऑरिस्टीज
तुमचे योग्य ते स्वागत करण्यासाठी
का उपस्थित नाही इथे
ह्याचे स्पष्टीकरण ही भीतीच करील.
पण काळजी करू नका.
तो फोसीसमध्ये आहे.
स्ट्रोफिअसचा पाहुणा म्हणून
स्ट्रोफिअस - तुमचा फार दिवसांचा सच्चा मित्र
त्याने जिथून संकट येईल
अशा दोन संभाव्य स्थानांपासून
मला सावध केले.
पहिले म्हणजे ट्रॉयमध्ये
तुमच्या जीविताला भय असल्याबद्दलचा धोका.
नंतर जर आरगॉसमध्ये
एखादा कट शिजून त्यातून
लोकांचा उठाव झाला
तर लोक आपल्या सहज प्रवृत्तीला अनुसरून
सत्ता हरपलेल्या राजाला
पायदळी तुडवतील
ही भीति.
कोणाला किंचितही आशंका येऊन नये
अशीच कार्यकारण मीमांसा होती त्यांची

माझ्याबद्दल म्हणाल तर
माझ्या अश्रूंचे सारखे वहाणारे पाट
आता कोरडे पडले आहेत.
एक थेंबसुद्धा उरला नाही त्याच्यात

## ॲगमेमनॉन

आणि माझे जाग्रणाने तारवटलेले डोळे
तुमच्यासाठी वेड्या आशेने
सारख्या जळत ठेवलेल्या दिव्यापाशी
तिष्ठत असतांना
रडूनरडून सुजले आहेत.
गुणगुणाऱ्या चिलटांची
किंचितशी हालचालसुद्धा
मला स्वप्नातल्या भयंकर दृश्यातून
जागी करीत असे.
त्या दृश्यात तासाभराच्या झोपेत मावणार नाहीत
इतक्या मृत्यूंनी तुम्हाला गाठलेले असे.

वादळानंतर मिळालेल्या निवाऱ्याइतके प्रिय दृश्य
दुसरे नाही
प्रतिकूल परिस्थितीच्या वेढ्यानंतर होणारी सुटका -
दुसरी कुठली सुटका इतकी मधुर असणार आहे?
वादळांच्या आणि संकटांच्या वेढ्याच्या यातना भोगल्यानंतर
आता माझे हर्षभरित हृदय
आपल्या स्वामीचे स्वागत करते आहे.
हा माझा पती आपल्या घराचा संरक्षक,
एकनिष्ठ पहारेकरीच आहे.
आमच्या पहाऱ्याचा दृढ नांगर
ह्या राजगृहाचे छत सावरून धरणारा
उत्तुंग आधारस्तंभ आहे.
पित्याला जसा दीर्घकाळची आशा पुरी करणारा पुत्र,
तहानेल्या वाटसरूंना जसा झरा,
किंवा सागरावर फार काळ काढलेल्या
माणसांच्या दृष्टीस पडलेला
जसा अनपेक्षित किनारा
तसा प्रिय आहे मला माझा पती.
ह्या अशा प्रशंसेला माझ्या दृष्टीने तो पात्रच आहे.

आणि स्वर्गस्थ शक्तींनी आम्हाला
त्यांच्या मत्सरापासून अलिप्त ठेवावे.
खूप भोगले ओ आम्ही आजवर
ते पुरेसे ठरावे.

प्रियतम पतिदेवा,
चला आता, उतरा खाली तुमच्या रथातून.
पण स्वामी, ट्रॉयला ज्याने तुडवले
ते जेते पाऊल जमिनीवर टेकू नका.
परिचारकांनो, तुम्हाला सांगितल्याप्रमाणे करा.
त्वरा करा. त्यांच्या मार्गावर लाल गालिचे पसरा;
तुमच्या मालकांच्या पायांपुढे
रेशमी वस्त्र अंथरा.
जे पुन्हा दृष्टीस पडेल अशी
त्याला आशा अव्हती,
त्या घराकडे
न्यायदेवता स्वतःच त्याला नेईल.
निद्रेच्या आहारी जाऊन कधीही न मरगळलेल्या पूर्वचिंतीत
सगळ्या गोष्टी, ईश्वरेच्छेने नियत केल्याप्रमाणे
यथायोग्य पार पडतील.

(क्लायटेमनेस्ट्राच्या परिचारिका रथापासून राजमहालाच्या द्वारापर्यन्त
लाल करड्याच्या पायघड्या घालतात.)

ॲगमेमनॉन : लेडाच्या कन्ये,
माझ्या गृहाच्या संरक्षिके,
तुझे भाषण, त्यातील विषय जो
"माझी अनुपस्थिती"
ह्याला साजेल असेच आहे;
कारण दोन्हीही फार प्रदीर्घ होती.
स्तुती जर यथातथ्य असेल तर

ती इतरांच्या मुखातून उच्चारली जावी.
आणि ह्या नाजुकसाजुक सरबराईने
मला स्त्रीसदृश बनवू नकोस
आणि एकाद्या लाळघोट्या पर्शियनासारखी
माझ्यासमोर झुकतझुकत
तुझी उच्चस्वरातील भाषणे करीत
तोंड वाजवू नकोस.
तसेच, तुझ्या ह्या अंथरलेल्या वस्त्रांनी
देवांचा मत्सरही ओढवून घेऊ नकोस,
कारण हे असले सन्मान देवानांच द्यावयाचे असतात.
मी मर्त्य असल्यामुळे
कलाकुसर केलेल्या या बहुमोल रेशमी वस्त्रांवर
पाय देणे मी धोक्याचे मानतो.
माझा सन्मानच करायचा असेल तर,
तो माणसाला साजेल असा करावा
अशी माझी इच्छा आहे-
देवासारखा नव्हे.
यशात्री प्रशंसा
ह्या साऱ्या झालरी
आणि भपकेबाज गालिच्यांच्या पायघड्या
यांच्याशिवायच.
स्पष्टपणे निनादते
आणि देवाची सर्वात मोठी देणगी असेल
तर ती म्हणजे खुळेपणापासून
अलिप्त असे मन.
जो आयुष्याच्या अखेरीस
शांततामय वातावरणात स्थिरावतो
तो खरा भाग्यवान म्हणायचा.

क्लायटेमनेस्ट्रा : तो पहा समुद्र
चांदीइतक्या किंमती असलेल्या

### ग्रीक शोकनाट्ये

जांभळ्या किरमिजी रंगाने भरलेला -
त्याला कोण आटवू शकेल?
तलम भारी कपड्यांना रंगवण्यासाठी
वापरण्यात येणारा हा गडद रंगाचा प्रवाह
पुन्हापुन्हा तुडुंब भरतो
आणि देवाच्या कृपेने एका सिंचनकृत्याला पुरेल
एवढा लाल रंगाचा साठा ह्या घरात आहे.
तुम्ही काही भिकाऱ्यांचे राजे नाही.
जर देववाणीने सांगितले असते
आणि जर खात्री असती की
अशी काळजी घेतल्याने व हा खर्च केल्याने
ह्या एका जीवनाचा प्रवास
सुखरूप शेवटास जाईल
तर मी अशी वीस वस्त्रे
पायदळी पडण्यासाठी समर्पण केली असती.
आता तुम्ही तुमच्या प्रिय घरी आला आहात
तुमच्या वेदीस्थ अग्निकुंडापाशी,
मुळे पुन्हा ताजीतवानी झाली
की वृक्ष उंच आधारशाखांपर्यन्त
आपला पर्णभार पसरतो
आणि व्याधताऱ्याच्या दाहकतेपासून
आम्हाला संरक्षण देतो.
तुमचे हे प्रिय पुनरागमन
हिवाळ्यानंतरच्या वसंतऋतुसारखे
उबदार भासते आहे.
पण जेव्हा झ्यूस
अपक्व द्राक्षांतून स्वतःसाठी आसव गाळतो
तेव्हा साऱ्या घरातली उष्णता नाहीशी होते
आणि गारवा येतो
ह्या राजद्वारातून त्याचा स्वामी
प्रवेशतो आहे –

निष्कलंक असा स्वत:चे जे आहे त्याचा
स्वीकार करण्यासाठी.

ॲगमेमनॉन : मी सुस्वस्थ अन्त:करणाने
कसा प्रवेश करू इच्छितो
ते मी आताच सांगितले ना!

क्लायटेमनेस्ट्रा : मला एक सांगा-
तुमच्या निर्धाराविरुद्ध नाही ते-

ॲगमेमनॉन : मी माझ्या निर्धाराविरुद्ध
काही करणार नाही ह्याची खात्री बाळग.

क्लायटेमनेस्ट्रा : संकटात असतांना
हे असे वर्तन करण्याबद्दल
देवांपुढे तुम्ही आण वाहिली असती ना?

ॲगमेमनॉन : हो. कुणी जाणत्या माणसाने
तसे वागायचा मला सल्ला दिला असता तर.

क्लायटेमनेस्ट्रा : प्रॲम जिंकला आहे
अशी कल्पना करा.
अशा वेळी त्याने काय केले असते?

ॲगमेमनॉन : कलाकुसर केलेल्या
साटणीच्या पायघड्यांवरुन
तो चालला असता
ह्याबद्दल किंचितही शंका नाही मला.

क्लायटेमनेस्ट्रा : मग टीका करणाऱ्यांच्या
जिभेपुढे तुमच्या अन्त:करणाला

का नमते घ्यायला लावता?

ॲगमेमनॉन : खरेच का म्हणून करावे असे?
पण लोकांच्या शब्दांमागे फार मोठी शक्ती
असते खरीच.

क्लायटेमनेस्ट्रा : थोरपणाचाच द्वेष केला जातो ज्याचा कोणी हेवा करीत नाही
तो हेवा करण्याजोगा नसतोच.

ॲगमेमनॉन : अशी लढाऊ वृत्ती असणे स्त्रीला शोभत नाही.

क्लायटेमनेस्ट्रा : तरीपण पराभव पत्करणे थोरपणाला शोभून दिसते.

ॲगमेमनॉन : अरे वा! हे तर युध्दच सुरु झाले म्हणायचे!
जिंकावे म्हणून तू वाटेल ते देशील नाही?

क्लायटेमनेस्ट्रा : माघार घ्याना माझ्यापुढे!
तुम्ही तर जेते आहातच.
मग मलांही माझा विजय मिळू द्याना.

ॲगमेमनॉन : तुझा निश्चयच आहे तर मग!
(सेवकास) इकडे ये.
गुडघे टेकून बस.
माझी पादत्राणे काढ.
माझा मार्ग सुकर करणाऱ्या ह्या धर्मसेवकांना रजा दे.
आणि मी ह्या समुद्राच्या तळातील खजिन्यावर
पाय देत असताना
कोणी सावधान मत्सरी देव
लांबून नजर न टाको.
हे किंमती गालिचे
ज्यांची किंमत यांच्या तोलाच्या चांदीइतकी होईल

त्यांना न धुतलेल्या पायांनी मलिन करण्याला मी धजणे
म्हणजे लीनतेला झिडकारणे आहे.
पण जाऊ दे ते.
या मुलीला आत घेऊन जा
आणि तिला नीट वागव.
सौम्य वागणुकीच्या जेत्याला देव स्वर्गातून पारितोषिके देईल.
गुलामीचे जोखड कोणी आवडीने खांद्यावर घेत नाही
आणि ही माझ्याकडे सेनेची भेट म्हणून आली आहे.
साऱ्या ट्रॉयमधील संपत्तीतले निवडक रत्न आहे हे.
आता या बाबतीत मला नमते घेऊन
आज्ञापालन करायला लावण्यात आलेच आहे.
तेव्हा ह्या जांभळ्या गालिच्यावर पाय देत
मी माझ्या घरात प्रवेश करतो.

क्लायटेमनेस्ट्रा : जय असो - जय! जय!!

(एक दीर्घ विजयघोष जो श्रेष्ठीवृंद विजयी वीराचे पुनरागमन साजरे करण्याचा एक नेहमीचा प्रकार असे मानतात. फक्त कॅसॅन्ड्राला त्याचा खरा अर्थ कळतो. ॲगमेमनॉन एकटाच जांभळ्या गालिच्यावरून चालत राजवाड्यात जातो.)

क्लायटेमनेस्ट्रा : झ्यूस! झ्यूस!
हे इच्छापूर्ती करणाऱ्या देवा! आता माझ्या या प्रार्थनांची पूर्ती कर
आणि तुझे मनोगत
तुझ्या इच्छाशक्तीने सिद्धीस जावो!

(क्लायटेमनेस्ट्रा राजवाड्यात जाते. ॲगमेमनॉनचा रथ सेवक घेऊन जातात. कॅसॅन्ड्रा दुसऱ्या रथात बसून रहाते.)

श्रेष्ठीवृंद : ही कसली भीती मला अशी सारखी ग्रासीत आहे?
पुढे काय घडणार आहे याचे चिंतन करणाऱ्या माझ्या मनाला

## ग्रीक शोकनाट्ये

खाणाखुणा करीत घिरट्या घालीत आहे ही!
दरम्यान न बोलावलेला, बिदागी न दिलेला भविष्यवेत्ता
माझ्या नसानसातून स्पंदन पावतो आहे
आणि
जिने माझ्या अन्तःकरणावर सत्ता गाजवावी
आणि धूसर स्वप्नातील कल्पनाचित्रांना
झिडकारून टाकावे
ती माझी मनमिळाऊ श्रद्धा
थरथरा कापत आहे
व आपले सिंहासन सोडून जात आहे.
पूर्वी एकदाच
माझ्या हृदयाने ओळखला होता
तो हेतूगर्भ क्षण –
जरी तो दूर अंतरावर होता –
जेव्हा ट्रॉयमध्ये नौकांच्या मागच्या बाजूस
शिडांचे दोर गुंडाळतांना आमच्या खलाशांनी
मारलेल्या आरोळ्यांशी
माझ्या विजयसूचक गीताने
सुसंवाद साधला
आणि जहाजांचा ताफा घरच्या प्रवासासाठी हाकारला गेला.
तेव्हा फक्त केला होता अंदाज

आता माझ्या डोळ्यांनी
ती जहाजे परतलेली मी पहात आहे
आणि तरीही माझ्या अन्तःकरणाला
पुन्हा जाणवत आहे
तो भविष्यसूचक क्षण
कोणीही न पढवलेल्या उपजत जाणीवेने.
ते करूण, ओळखीचे, अंतिम शोकगीत
पुन्हा उमटत आहे माझ्या अंतरंगात
माझे अन्तःकरण शरीरावरील त्याची सत्ता

## अॅगमेमनॉन

सोडून देत आहे
तर्ककुतर्कांनी धीर सुटला आहे ह्या शरीराचा
आणि जाणवत आहे त्याला
वेदना वेग आणि थरथर
उदरात आणि कोथळ्यात
रक्ताने उठाव केला आहे
मेंदू गरगरतो आहे –
मज्जातंतू आणि पेशी ताणल्या गेल्या आहेत
त्याला माहित आहे की
जेव्हा शरीर त्रस्त असते
तेव्हा ती सत्याची टोचणी असते.
पण तरीही मी प्रार्थना करतो की
काळ आणि सत्य
माझ्या भीतीला लज्जेने खाली मान घालायला लावोत
भविष्यकथन नष्ट होवो
त्याची फलश्रुती कधीच न होवो.

जेव्हा सुदैव फारच जोमाने फुलोरा धरते
तेव्हा विनाश - तिचा मत्सरी शेजारी –
हल्ला करायला टपलेला असतो
वैभवाचे त्रोटक क्षण मोजकेच असतात
आणि जे फुलले आहे ते कोमेजणार हेही निश्चित.
विजयामुळे धीट झालेली महत्त्वाकांक्षा
पुढेच मजल मारीत जाते
आणि तिथे दडून बसलेल्या खडकांवर आदळते
असे तिचे ऋण चुकते होते.
पण ऋणेही काही अंश चुकता करून
वारून टाकता येतातच की.
जेव्हा श्रेसचे वादळी वारे भिववतात
तेव्हा व्यापारी आपली चांदी वाचवण्यासाठी
श्रद्धेने प्रार्थना करून

## ग्रीक शोकनाट्ये

संपत्तीचा पुरा दहावा भाग
सागराला अर्पण करतो.
तो वाटा पाण्यात पडतो
आणि त्याचे जहाज
सुरक्षितपणे मार्गक्रमण करू लागते.
हेवा करणाऱ्या दैवी शक्तींना
जे घराणे आपल्या संपत्तीचा
जास्ती झालेला भाग देईल
ते घर कधी घसरत नाही
नाश पावत नाही.
झ्यूस त्यांच्या प्रार्थनेला
विपुलतेनेच उत्तर देतो.
दरवर्षीच्या नांगरलेल्या शेतांना
सूर्यप्रकाशाचे आणि वर्षेचे वरदान देतो.
भरघोस पीक यावे म्हणून आशा करतो आणि
दुष्काळाच्या भयाला पळवून लावतो.

पण जेव्हा मर्त्य म्हणून जन्मलेल्या शरीरातून
माणसाचे रक्त - गढद
पुसून न जाणारा डाग बनून पृथ्वीवर स्थिरावते
तेव्हा मंत्र म्हणून का कुणी
त्या रक्ताला पुन्हा सजीव करू शकणार आहे?
झ्यूसने मृत शरीरांना अंधाऱ्या जगातून आवाहन करून
पुनर्जीवन देणाऱ्या त्या ऋषीच्या विद्येचा
अंत केला हे त्याच्या निखळ शहाणपणानेच.
नाहीतर खून इतक्या सहजतेने भरून काढता येतो
हे पाहून माणसे गुन्हे करायला
प्रवृत्त झाली असती.
जर अशी माझी खात्री नसती
की घटना आणि त्यांची कारणे ह्यांचा क्रम
नेहमीच दैवी शक्तीने नियत केलेला असतो

आणि पहिल्यावर दुसऱ्याचा प्रभाव असतो.
तर या नाराजीला न जुमानता
माझ्या तोंडातून शब्द बाहेर पडले असते
आणि ज्यांचा सखोल मागोवा घेण्याचे धाडस झालेले नाही
असे विचार मी बोलून गेलो असतो
व प्रत्येक भीतीचा उच्चार केला असता.
पण आता माझी जीभ
अस्पष्ट बडबडत राहिली आहे
हृदयाच्या दुःखाचा वाटा उचलला आहे तिने
समयोचित शब्द उच्चारता यावा म्हणून
तडफडते आहे ती.
पण सारखी निराशाच होते आहे तिची.
माझे मूक हृदय मात्र
खोलवर जळत राहिलेल्या अग्नीने धुमसते आहे.

(क्लायटेमनेस्ट्रा राजवाड्याच्या दारात येते.)

**क्लायटेमनेस्ट्रा :** तू सुद्धा कॅसॅन्ड्रा ऐकू येते आहे का तुला
मी काय म्हणते ते?
आत ये घरात.
झ्यूसचे आभार मान की —
ह्या राजवाड्यात तुझ्याबद्दल
कोणी विकृतभावना बाळगीत नाही.
तुला आमच्या मुख्य वेदीजवळ उभी करू
आणि इतर अनेक गुलामांबरोबर
पावन करण्याच्या विधीत तुला भाग घेता येईल.
तर मग उतर त्या रथावरून
फुकाचा अहंकार बाळगू नको.
असे म्हणतात की हर्क्यूलिसला सुद्धा
एकदा गुलाम म्हणून विकण्यात आले होते.
आणि त्याला गुलामीची भाकरी खाण्याची

सवय करावी लागली होती.
असे दुर्दैव जर ओढवले –
आणि त्याला तर काही उपायच नाही –
तर फार काळ श्रीमंती भोगलेले घराणे
उदारपणे वागते.
जिथे थोड्याची अपेक्षा असतांना
विपुल वैभव प्राप्त होते
तिथे, गुलामाची अवस्था मोठी कठीण असते.
इथे तुला तुझ्या पात्रतेप्रमाणे वागवण्यात येईल
जशी आमची पद्धत आहे तसे
जास्तच उदारतेने कधीकधी.

श्रेष्ठीवृंद : तुझ्याशी बोलली ती.
ती वाट पहाते आहे.
कळले नाही का तुला स्पष्ट काय ते?
दुर्दैवाच्या पाशात बंदीवान आहेस तू. तेव्हा तुला जर समजले असले
तर ऐकले पाहिजेस तू. का अवज्ञा करायचेच ठरवले आहेस तू?

क्लायटेमनेस्ट्रा : जर तिचे डोके फिरलेले नसले तर ऐकलेच पाहिजे तिला.
आता जर ती चिमण्यांच्या चिवचिवाटासारखी कोणी कधी न ऐकलेली
चमत्कारीक भाषा बोलत असली तर कोण जाणे!

श्रेष्ठीवृंद : हं, ऐक तर आता तिचे.
ती जे करायला सांगते आहे
तेच सध्याच्या तुझ्या स्थितीत करणे शक्य आहे व इष्ट आहे.
पुरे आता त्या रथात बसणे.
जा आत. ऐक तिचे.

क्लायटेमनेस्ट्रा : आता इथे बाहेर
उगीच उभे रहायला वेळ नाही मला
मध्यवर्ती गृहाग्नीकुंडाजवळ

यज्ञीय बली तिष्ठत आहेत.
मी काय बोलते आहे ते जर तुला कळत असेल,
तर ताबडतोब आत ये
जर समजत नसेल (एका सेवकास)
ती आहे परदेशीय –
तेव्हा खुणा करून तिला समजावून सांग पाहू.

(कॅसॅन्ड्राने राजवाड्यात चलावे अशा खुणा सेवक करतो)

श्रेष्ठीवृंद : ह्या मुलीला दुभाष्याची गरज आहे
हे अगदी स्पष्टच आहे.
नुकतेच सापळ्यात अडकलेले
एखादे वन्य श्वापद असावे
तशी मुद्रा दिसते आहे तिची.

क्लायटेमनेस्ट्रा : मला वाटते वेडीच आहे ती.
स्वतःच्या गोंधळलेल्या विचारांशिवाय
दुसरे काही ऐकूच येत नाही तिला.
स्वतःचे शहर भुईसपाट झालेले
पाहून आली आहे ना ती?
पण अजून तिला
आपल्या मालकाचा लगाम मुकाट्याने
घालून घेण्याची अक्कल नाही.
आपल्या रक्ताळलेल्या तोंडातून
आपला क्रोध फेसासारखा बाहेर पडेपर्यन्त
तरी तसे करायचे!
पण माझे शब्द वाया घालवीत
उभी रहाणार नाही मी आता.
माझ्याकडे असे दुर्लक्ष केलेले
खपवून घेणार नाही मी.
(क्लायटेमनेस्ट्रा राजवाड्यात जाते)

श्रेष्ठीवृंद : मला दया येते आहे,
राग नाही येत.
चल, गरीब बिचाऱ्या पोरी,
खाली उतर.
ह्या कठीण प्रसंगापुढे मुकाट्याने मान वाकव
तुझे हे नवे जू मुकाट्याने घालून घे.
(कॅसॅन्ड्रा खाली उतरते. ॲपोलोचा पुतळा तिच्यानजरेस पडतो)

कॅसॅन्ड्रा : हे ॲपोलो! हाय, हाय!
नाही, नाही, नाही! हे भूमी! हे ॲपोलो!

श्रेष्ठीवृंद : असा शोकाकुल चीत्कार करून ॲपोलोचे नाव का घेतेस?
असे आवाहन करायला तो काही शोकदेवता नाही.

कॅसॅन्ड्रा : अरेरे, हाय! किती भयानक आहे हे!
हे पृथ्वी! हे ॲपोलो, ॲपोलो!

श्रेष्ठीवृंद : पुन्हा ॲपोलोला हाक घालून
पावित्र्याचा अधिक्षेप करीत आहे ती!
ज्या ठिकाणी दु:खाचा फेरा आहे
त्या घरात त्या देवश्रेष्ठाचे अधिष्ठान
असूच शकत नाही.

कॅसॅन्ड्रा : ॲपोलो! ॲपोलो!
पर्यटनाच्या अधिष्ठात्या!
माझा घात करणाऱ्या!
या साऱ्या मार्गावरून तू मला घेऊन आला आहेस तो केवळ
पुन्हा माझा घात करण्यासाठी.

श्रेष्ठीवृंद : स्वत:च्या दु:खभोगांबद्दल
बोलायचे दैवी स्फुरण आले आहे तिला.

गुलामीत सुद्धा तिची भविष्यसूचक शक्ती
नष्ट झालेली नाही.

कॅसॅन्ड्रा : ॲपोलो! ॲपोलो!
पर्यटनाच्या अधिष्ठात्या! माझा घात करणाऱ्या!
कुठे घेऊन आला आहेस तू मला?
हाय! कोणाचे भयानक घर आहे हे?

श्रेष्ठीवृंद : हा ॲट्रियसचा राजवाडा आहे
हे तुझी भविष्यज्ञानी शक्ती
सांगत नाही का तुला?
तर मग मी सांगतो तुला
तसेच म्हण या जागेला म्हणजे
तू खरे तेच बोललीस असे होईल.

कॅसॅन्ड्रा : छे! नाही.
पण जे देवांचा तिरस्कार करते असे घर आहे हे.
ज्याचे दगड सुद्धा
एका रक्तलांछित कृत्याचे अपराधी साक्षीदार आहेत.
या घराने आपल्या दरवाजांच्या आत
कत्तल केलेल्या शरीरांचे अवशेष
आणि खून केलेल्या मुलांची हाडे
दडवून ठेवली आहेत.

श्रेष्ठीवृंद : ही भविष्यवेत्ती
घ्राणेन्द्रिय तीक्ष्ण असणाऱ्या शिकारी कुत्र्यांसारखी
अचूक मागावर जात आहे
ती ज्या मागावर जात आहे
तो माग ठाऊक आहे आम्हाला.
रक्ताकडेच पोचतो आहे तो.

कॅसॅन्ड्रा : रक्ताकडेच मला ठाऊक आहे
बघा तिकडे,
प्रत्यक्ष साक्षच देत आहेत ते -
स्वत:चे रक्त सांडले गेले म्हणून रडणारी ती मुले
त्यांच्या स्वत:च्या ओरबाडलेल्या कोवळ्या मांसासाठी रडत आहेत ती
ते निर्दय, ज्याचे कुणालाही नाव ठाऊक नाही असे पक्वान्न
जे त्यांच्या वडीलांना चाखावे लागले!

श्रेष्ठीवृंद : तुझ्या भविष्य ज्ञानी सूचक शक्तीबद्दल
आम्ही साऱ्यांनी ऐकले होते
पण तू बोलते आहेस ते आम्हाला सांगण्यासाठी
दैवी शक्तीची गरजच नाही.

कॅसॅन्ड्रा : हाय, हाय!
अरेरे! किती लाजिरवाणे कृत्य!
हा कटच आहे नक्की.
द्वेषाने ग्रासलेले एक हृदय -
विश्वासघात करण्यासाठी टपलेले -
ह्या घराला पुन्हा एकदा दूषित करीत आहे,
जिथे प्रगाढ प्रेम करायला हवे
तिथे घातक दुखापत करून!
बेसावध, नि:शस्त्र
आणि मदत तर लांब राहिलेली
अशा स्थितीत दैवाशी लढा कसा देणार तो?

श्रेष्ठीवृंद : तुझे पहिले बोलणे आम्हाला समजले. सारे आरगॉस त्याबद्दल चर्चा करीत आहे.
पण ह्या दुसऱ्या भविष्यवाणीचा मात्र
काही धागादोरा गवसत नाही मला.

कॅसॅन्ड्रा : धिक्कार असो तिला!

ती उभी राहील -
जर शंकेला जागा असती तर बरं झालं असतं!
स्वत:च्या विधीपूर्वक वरलेल्या पतीला
युद्धाच्या कर्दमापासून धुवून काढण्यासाठी
आणि मग -
कसा उच्चारू मी तो शब्द!
हा शुद्धीकरणाचा विधी
त्याच्या दफनविधीला उपयोगी पडेल!
हताश झालेले हात पुढे होतात,
पण जास्त शक्तीशाली हाताने गुंतवले जातात.

श्रेष्ठीवृंद : तिच्या कोड्यांत टाकणाऱ्या उद्‌गारांनी मी अजूनही गोंधळूनच गेलेला आहे. इतक्या भलत्याच भासणाऱ्या भविष्यवाणीचा काय अर्थ लावावा बरं?

कॅसॅन्ड्रा : तिकडे पहा! हाय, काय हे भयानक दृश्य!
हे काय नव्यानेच दिसतय्‌ आणखी?
फासेपारध्याचे जाळे -
मृत्यूचे हल्ला करण्याचे शस्त्रच जणू!
आणि शिकार करणारी ती -
जिने त्याच्याशी सहशयन केले होते.
ह्या कुलाचे रक्त आकंठ पिऊनही
अजून तहानेलेल्याच राहिलेल्या
वखवखलेल्या रक्तपिपासू श्वानांचा जणू थवाच
अशा सूड घेणाऱ्या पिशाच्चिनींनो,
फोडा, फोडा किंचाळ्या
तुमच्या सावजाच्या शरीरातून
रक्त वहात आहे.
या राक्षसिणींनो आणि पोट भरून पिऊन घ्या ते रक्त.

श्रेष्ठीवृंद : मृत्यूवर भुंकण्यासाठी

कोणत्या राक्षसिणींना बोलावीत आहेस तू?
हे भीषण स्तोत्र गातांना
तुझा चेहरा फिक्कट पडला आहे
आणि तुझे फिके झालेले रक्त
तुझ्या हृदयाकडे संथगतीने जात आहे.
माणसे युद्धामध्ये
तलवारीच्या घावाने मृत्यू पावतात तेव्हा असेच होते
नजर आणि नाडी काम देत नाही
आणि चैतन्याचे तजेलदार रंग मावळू लागतात.
बघा तिच्या वक्तव्यामुळे
तिचा कष्टाने चाललेला श्वास
गुदमरून जात आहे.

कॅसॅन्ड्रा : धावा, मदतीला या कुणी!
बघा, बघा, काय भयंकर हे दुःस्वप्न!
काय? गाय बैलाला शिंगांनी भोसकणार?
त्या काळी शिंगे आलेल्या राजाला?
वाचवा हो त्याला कुणीतरी! दूर ओढून न्या!
ते घातकी पाणी ओतले जात आहे.
ते पहा शुद्धीकरण विधीसाठी वापरलेले
स्नानाचे घंगाळ भरले आहे.
ती त्याला झग्यासारख्या बनवलेल्या
सापळ्यात दाबून धरीत आहे-
ती घाव घालते आहे!
कोसळला तो खाली!
ऐका विश्वासघात आहे हा!
विश्वासघात म्हणते आहे मी ह्याला!

श्रेष्ठीवृंद : जरी दैवीवाणीत मला काही विशेष गम्य आहे
असा माझा दावा नाही तरी
तिचे शब्द काही शुभ वर्तवीत नाहीत

असे मला वाटते.
पण शेवटी तसे पाहिले तर
दैवी वाणीतून कोणाला कधी
चांगली बातमी मिळाली आहे?
या भविष्यवाद्यांना वाईट बातमी मोठी उपयुक्त वाटते.
कारण त्यांच्या या शाब्दिक शहाणपणाचा
मुख्य हेतूच मुळी लोकांना भयाने 'आ' वासायला लावणे हा असतो.

कॅसॅन्ड्रा : हाय! भीतीने पुन्हा पुन्हा थरकाप होतो आहे!
हाय, काय ही अनुकंपनीय स्थिती!
पण त्याला काही एकट्यालाच यातना
भोगायला लागत नाहीएत.
त्याच्या व्यथेत मिसळून गेलेल्या माझ्या व्यथांबद्दल
मी शोक करीत आहे.
निर्दय ॲपोलो ! का, का तू मला इथे आणलेस?
एवढ्याचसाठी का
की जे मरण त्याला आले
त्यात मी पण वाटेकरी व्हावे?

श्रेष्ठीवृंद : माथे फिरले आहे तिचे!
बिचारी पोर! किंवा कोणा देवाचा संचार
झाला आहे तिच्या शरीरात
आणि केवळ स्वत:साठीच ती
हे सूरविरहीत गीत न दमता सारखे म्हणत
हा करूण आक्रोश करते आहे.
जशी ती तारस्वराची बुलबुल
आपल्या सैरभैर झालेल्या हृदयाचा भार हलका करण्यासाठी
आपल्यावर झालेले सारे अन्याय स्मरून
"इटिस, इटिस रे" असे स्फुंदत रहाते.

कॅसॅन्ड्रा : कटु होता तिच्यावरचा प्रसंग

पण दयाळू देवांच्या इच्छेने
तिने घातलेला सुंदर झगा
परांच्या पंखांचा आहे
आणि ती स्वर्गस्थांना घालीत असलेले
सुरासुराला अश्रूंची साद देत असलेल गाऱ्हाणे सुद्धा
कानाला गोड लागते.
पण माझ्यावर मात्र धारदार पात्याने
स्वत:चे मांस चिरून घेण्याची पाळी येणार आहे.

श्रेष्ठीवृंद : कुठून स्फुरताहेत ही तीव्र दु:खांची वर्णने?
दैवी स्फूर्तीने केलेली पण तरीही अर्थहीन?
जगबुडीच्या घोषणेसारख्या आवाजात
ह्या भयाण गोष्टीचा
हृदय पोळून टाकणाऱ्या शब्दात का सूर धरला आहेस?
जिच्या अशुभ तपशीलाचा मागोवा घेत
तू चालली आहेस
त्या दैवी वाणीचा मार्ग कुणी रेखाटलेला आहे?

कॅसॅन्ड्रा : (तारस्वरातील दैवी वाणीच्या घोषाचा सूर पालटून आता ती शोकाच्या संथ दु:खित स्वरात बोलत आहे)
हाय रे पॅरिस आणि त्याची ती विषयवासना!
हाय रे ती शृंगाराची विवाहशय्या
जिने त्याचे कुटुंब आणि शहर नष्ट केले!
हाय रे ती स्कॅमॅन्डर नदी
जी आमच्या तहानेल्या वाडवडीलांना परिचित होती-
जिच्या प्रिय तटांवर मी लहानाची मोठी झाले!
पण लवकरच काळ्या रंगाच्या
कॉकीटस आणि अॅचेरॉन या नद्यांवर
माझ्या भविष्यवाणीचे प्रतिध्वनी उमटतील
आणि माझे शब्द खरे आहेत की नाहीत
ह्याचे साक्षीदार त्याच होतील.

श्रेष्ठीवृंद : पॅरिसचे लग्न!
निदान ही गोष्टतरी एकाद्या पोराला सुध्दा स्पष्ट समजेल.
पण तरीसुध्दा तिच्या भयाकुल पुटपुटीत
वरवर दिसतो त्याहून
काहीतरी जास्त अर्थ आहे.
एकाद्या क्रूर सापाच्या दंशाप्रमाणे
बधिर करणाऱ्या यातना देत
तिचा हलक्या आवाजातला आक्रोश
माझ्या कर्णरंध्रावर आदळत आहे.

कॅसॅन्ड्रा : हाय रे इलिअॅन नगरी आणि तिचा कर्मभोग!
हाय रे ती जाळलेली आणि धुळीला मिळवलेली नगरी!
हाय रे ते अग्नि जे माझ्या वडिलांनी
आपले मनोरे शत्रूच्या स्वाऱ्यांना भक्कमपणे तोंड देणारे व्हावे म्हणून पेटवले होते!
हाय! त्याने हवन केलेल्या,
प्रत्येक चरणाऱ्या कळपातून निवडलेल्या पशूंचे रक्त!
पण देवांना प्रसन्न करण्यासाठी
दिलेला कुठलाही बळी
तिच्या पुत्रांना मृत्यूपासून वाचवू शकला नाही
ते असे मृत्यू पावतील असे मी
वर्तवलेच होते
आणि आता मी माझ्या भावांना त्यांच्या मृत्यूत साथ करीन
व लवकरच भूमी माझे वहाते उष्ण रक्त खुषीने प्राशन करील.

श्रेष्ठीवृंद : पुन्हा एकदा तिचे उद्गार
मागच्यांना मिळतेजुळते आहेत
सांग आम्हाला कोण आहे तो देव
इतका दयाहीन
ज्याचा दुःख देणारा हात
तुझ्या शोकमग्न हृदयाच्या तारा छेडून

इतके मृत्यूसदृश संगीत
निर्माण करीत आहे?
जणू भविष्यवाणीचे बाण सुटत आहेत हे
पण ज्यांचा मार्ग आणि लक्ष्य
मी अजूनही शोधतोच आहे
पण त्याचा अंदाज मला लागत नाही.

कॅसॅन्ड्रा : मग ऐका तर
आता माझी भविष्यवाणी,
लाजऱ्या जाळीदार बुरख्याआडून डोकावणाऱ्या नववधूप्रमाणे
हलकेच डोकावणार नाही
तर सूर्याच्या दिशेकडे एक वेगवान वादळ उठवील
आणि त्या वादळाच्या जोरदार लाटांवरून झेपावत
माझ्या हत्येपेक्षाही जास्त भीषण असा एक गुन्हा
तळपत्या प्रकाशात एका झटक्यात उठून दिसेल.
आता जास्त कोड्यात न बोलता
मी तुम्हाला सारे समजावून सांगते
पण प्रथम खात्रीपूर्वक सांगा
किती बारकाव्याने
फार पूर्वी घडून गेलेल्या
रक्तलांछित गुन्ह्यांचा माग मी घेतला आहे ते !
ह्या छपराखाली रहात आहे रात्रंदिवस एक गायकवृंद
जो बीभत्स तालसुरात त्याचे अशुभ ध्रुपद
मुक्तकंठाने गात असतो.
मानवी रक्त पिऊन झिंगलेली
धिटाईने इथे स्थिरावलेली
राजरक्ताची ही पिशाच्चे
ज्यांची हकालपट्टी कोणीही करू शकत नाही–
अखंड आनंदोत्सव चालू असतो त्यांचा.
पीत बसतात ती इथे रक्त
आणि त्यांच्या गीतांनी

मीर्च्याला गुन्ह्याकडे पिटाळतात प्रथम
आणि एकदा गुन्हा घडला की
मग त्या गुन्हेगाराची पाळी-
आपल्या भावाची शय्या विटाळणाऱ्याला
देशोधडीला लावतात ती.
काय? नेम चुकला का माझा?
की माझ्या बाणाने तुम्हाला परिचित असलेल्या लक्ष्याचा
वध केला आहे?
की मी "खोटे बोलणारी भविष्यवेत्ती"
"जिप्सी" "कपोलकल्पित कथांचे चऱ्हाट वळणारी" आहे?
चला शपथ घेऊन साक्ष द्या.
अॅट्रियसच्या राजवाड्याचा कलंकित इतिहास
प्रत्येक पापा - प्रतिपापासकट माहित आहे मला.

श्रेष्ठीवृंद : पवित्रातल्या पवित्र शपथेचाही
फारच थोडा अपयोग होईल.
पण आम्हाला आश्चर्य वाटते की
समुद्रापलीकडल्या, परक्या भाषेच्या प्रदेशात वाढलेली तू
जणू इथेच प्रत्यक्ष होतीस असा
आमच्या शहराचा गत इतिहास
उलगडून दाखवते आहेस!

कॅसॅन्ड्रा : अॅपोलोने भविष्यवाणीच्या अधिष्ठात्या देवाने
मला हे काम सोपवले आहे.

श्रेष्ठीवृंद : काय? अमर देव असूनही
त्याची तुझ्या मर्त्य देहावर वासना गेली का?

कॅसॅन्ड्रा : होय. आतापर्यन्त त्याच्याबद्दल बोलण्याची
मला लाज वाटत होती.

श्रेष्ठीवृंद : उत्कर्षाच्या काळात आपण सगळेच
जरा अलिप्तपणे वागतो.

कॅसॅन्ड्रा : फारच पिच्छा पुरवला त्याने माझा
आपल्या प्रेमाची फार आवेगाने
आणि जोरदारपणे मागणी केली.

श्रेष्ठीवृंद : आणि मग तुम्ही एकत्र शयन केलेत का? मूल झाले तुला त्याच्यापासून?

कॅसॅन्ड्रा : शब्दांच्या त्या ईशाला प्रथम शब्द दिला मी
आणि तो मोडला नंतर.

श्रेष्ठीवृंद : पण भविष्यवेत्तेपणाची विद्या
देवता संचार होऊन आधीच
साध्य झाली होती ना तुला?

कॅसॅन्ड्रा : ट्रॉयचा सर्वनाश मी पूर्णपणे
केव्हाच वर्तवला होता.

श्रेष्ठीवृंद : देव नक्कीच रागावला असेल मग!
त्याने शिक्षा केली का तुला?

कॅसॅन्ड्रा : माझ्या त्या अपराधानंतर
मी उच्चारलेल्या एका शब्दावरसुद्धा कुणीही
विश्वास ठेवीत नाहीसे झाले.

श्रेष्ठीवृंद : आम्हाला मात्र तुझी भविष्यवाणी
अतिशयच विश्वसनीय वाटते आहे, अवास्तव रीत्या.

कॅसॅन्ड्रा : हाय, हाय!
भीषणता आणि पाप!

## ॲगमेमनॉन

पुन्हा सत्यदृश्यदर्शनाच्या यातना-
होय, पाप आणि भीषणता
माझ्या विचारशक्तीला हादरवून उध्वस्त करीत आहेत.
बघा! त्या तिथे बसले आहेत ते.
त्या भिंतीवर
स्वप्नातल्या आकृतींसारखे
त्यांच्या स्वत:च्याच बांधवांनी
कोकरांसारखी कत्तल करून टाकलेली मुले.
पहा, काय धरले आहे त्यांनी आपल्या हातात?
हाय! काय करूणास्पद दृश्य आहे हे!
आपले स्वत:चेच मांस -
स्वत:चेच अवयव फासळ्या आणि काळीज
आहे ते त्यांनी हातात धरलेले
स्पष्ट आणि भयंकर दिसते आहे -
हेच ते त्यांच्या वडीलांनी खाल्लेले अन्न.
मी सांगतेय तुम्हाला—
कारण ह्या गुन्ह्याचा सूड तापून उठत आहे.
या घराच्या गुहेत— राज्याचा पालनकर्ता म्हणून म्हणा -
एक भेकड सिंह आहे बसलेला,
जो घरापासून दूर युद्धावर गेलेल्या
मालकाच्या विरुद्ध कट रचीत आहे.
आणि सेनानी सिंह-
ज्याने ट्रॉय उखडून टाकले
त्याचे स्वागत, ती नीच कट करणारी कुत्री
लाळघोट्या जिभेने
आणि खाली पाडलेल्या तत्पर कानांनी करते आहे.
त्याला माहित नाही की
छुप्या सूडाच्या विषाने माखलेल्या
कसल्या जखमा त्याला करण्याचे मनसुबे
तिने योजले आहेत!
स्त्री— आणि पुरूषाची हत्या करणार!

काय चढेलपणा हा.
कुठल्या किळसवाण्या पशुशी
यथायोग्य तुलना करता येईल हिची?
आपल्या श्वासाने वा नजरेने
विदीर्ण करून टाकणाऱ्या अद्‌भुत सरड्याशी?
का खडकात राहून
माणसांना त्यांच्या जहाजासकट बुडवणाऱ्या स्किलाच्या वंशजांशी–
नरकातल्या त्या खवळलेल्या शार्क माशाशी?
आपल्या पतीच्या नि:शस्त्र शरीरात
तलवार घुसवण्याची स्वप्ने पहात होती ती
ऐकलीत ना तुम्ही तिची अत्युकृष्ट दांभिक बडबड?
ती हर्षभरित आरोळी
जणू काय कठीण अशी लढाई जिकल्यामुळे ठोकलेली?
त्याच्या स्वगृही पुनरागमनाचा आनंद
ह्या नावाखाली खपवून नेत होती
ती आपला हर्षोन्माद!
हरकत नाही - मी म्हणते हरकत नाही मुळीच.
जे होणार असेल ते होईलच.
लवकरच तुम्ही आपल्या स्वत:च्या
डोळ्यांनीच बघाल सारे.
आणि माझी दया येईल तुम्हाला
आणि माझी भविष्यवाणी अर्ध्या हिश्शांनी सुद्धा खरी न ठरती
तर बरे झाले असते
असे वाटेल तुम्हाला.

श्रेष्ठीवृंद : थिएस्टसला त्याच्या मुलांच्या
मांसाची मेजवानी देण्यात आली होती असे म्हटलेस
ते पटले आम्हाला
तुझे अचूक वर्णन ऐकता ऐकता
भयाची जागा नवल घेऊ लागते.
पण बाकीचे मात्र आमच्या

बुद्धीच्या आकलनाच्या पलीकडचे आहे
हरलो आम्ही.

कॅसॅन्ड्रा : मी सांगते की अॅगॅमेमनॉन
तुमच्या नजरेसमोर मृत होऊन पडेल.

श्रेष्ठीवृंद : चूप! स्वदेशातून बहिष्कृत झालेल्या
करंट्या स्त्रिये - गप्प रहा -
बोलायचेच असेल तर शुभ शब्द बोल.

कॅसॅन्ड्रा : कितीही शुभ शब्द उच्चारले
तरी त्या सत्यातले विष काही
निपटले जाणार नाही.

श्रेष्ठीवृंद : जर तसे व्हायचेच असेल
तर शुभशब्दांनी ते टाळता येणार नाही खरेच.
पण देव करो आणि तसे न होवो!

कॅसॅन्ड्रा : करा! तुम्ही करा प्रार्थना!
तोवर इतर मात्र हत्याकांडाची तयारी
करीत आहेत!

श्रेष्ठीवृंद : अशा प्रदूषक पापाचे उगमस्थान
कोणता बरे पुरुष असेल?

कॅसॅन्ड्रा : कोणता पुरुष?
माझ्या भविष्यवाणीतला मुख्य मुद्दाच
तुमच्या लक्षात आलेला नाही.

श्रेष्ठीवृंद : पण अशी हत्या घडवून
तरी कशी आणता येईल?

आपली तर मति कुंठित होते आहे या भविष्य वाणीपुढे!

कॅसॅन्ड्रा : आणि तरीही मी उत्तम ग्रीक भाषेत
सारे बोलते आहे.
अगदी फारच उत्कृष्ट असे ग्रीक.

श्रेष्ठीवृंद : डेल्फीच्या दैवीवाणी
उत्कृष्ट ग्रीकमध्येच असतात
पण अर्थ समजायला मात्र अवघड जाते.

कॅसॅन्ड्रा : हाय, हाय! अॅपोलो, दया कर.
इथून सुटून कुठे जाता येईल मला?
तू मला देत आहेस तो मृत्यू
अधीर वृत्तीचा आहे, दयाहीन आहे.
ही मानवी आकृती असलेली सिंहीण
जी तिचा पती अनुपस्थित असतांना
एका लांडग्याशी रत झाली होती
ती माझा हतभागिनीचा जीव घेईल
आपल्या शत्रूंसाठी घातक पेय तयार करणाऱ्याप्रमाणे
ती एकीकडे आपल्या पतीच्या काळजाचा ठाव घेण्यासाठी
कट्यारीला धार लावीत आहे
आणि दुसरीकडे माझ्या कृतीचे औषध
त्याच्या मृत्यूच्या पेयात मिसळण्याचा
निश्चय करीत आहे.
जणू काय माझा इथला प्रवास संपवून
मी परलोकी सुखरूप पोचावे म्हणून
तो शुभेच्छेचा प्यालाच पीत आहे -
माझ्या रक्ताने भरलेला.
हा झगा -
माझी विडंबना करणारा - हा मी का म्हणून अंगावर बाळगावा?
कशाला ठेवू हा राजदंड अजूनही?

ॲगमेमनॉन

आणि कशाला माझ्या गळ्याभोवतीचे हे भविष्यवेत्तीचे हार?
मी मरण्यापूर्वी तुझा शेवट करीन मी आणि तुझाही -
जा, माझा शाप घेऊन जा.
तुमच्या ऋणातून मी ही अशी मुक्त होत आहे.
(सर्व वस्तू ओरबाडून काढून पायाखाली तुडवते)

जा, कुठल्यातरी दुसऱ्या एखाद्या स्त्रीला
दु:खाची ही बहुमोल देणगी द्या!
आणि बघू दे ॲपोलोला -
साक्षी होऊ दे तो मी काय करते आहे त्याला.
त्याने मला ह्या भविष्यवाद्याच्या अधिकाराच्या खुणांसह
एकदा पाहिले होते.
तिरस्कृत अशी, एखाद्या भोंदू भटक्या वैदूसारखी
टवाळी केली गेलेली
शत्रूंकडून आणि मित्रांकडूनही.
अन्नाला महाग झालेली, भिकारडी,
जादुटोणा करणारी आणि
दयनीय करंटी असे टोमणे खाल्लेली,
हे सारे सहन केले मी
आणि आता ॲपोलो -
ज्याने आपल्या भविष्याच्या ज्ञानाचा
एक अंश मला दिला होता
त्याने मला इलिऑनहून
ह्या मृत्यूचा वास मारणाऱ्या ओवरीत आणले आहे.
इथे आता मला कधीही निखळ अश्रद्धेला
पुन्हा मनावण्याचा प्रसंग येणार नाही.
इथे माझ्या वडीलांच्या गृहाग्नीकुंडापुढचा
पाषाण नाही विसावायला -
तर एका मृत बलीच्या रक्ताने
अगोदरच उष्ण झालेला मारेकऱ्याचा वधस्तंभ
माझी वाट पहातो आहे.

पण तरीही आमचे मरण
देवांकडून दुर्लक्षित रहाणार नाही
आणखी एक तिसरा येईल.
आमचे इच्छित उचलून धरण्यासाठी -
एक पुत्र - वडीलांच्या सांडलेल्या रक्ताचा मान राखण्यासाठी
मातेची हत्या करण्यासाठी येईल.
आता एक हद्दपार भटक्या असलेला तो
ह्या त्याच्या वंशाने रचलेल्या
गुन्ह्यांच्या मनोऱ्यावर कळस चढवण्यासाठी परत येईल.
एक फार मोठी शपथ–
देवांच्या देखत शिक्कामोर्तब झालेली
त्याला आपल्या वडीलांच्या धुळीत पडलेल्या मृत देहासाठी
पूर्ण बदला वसूल करून घ्यायला भाग पाडील.
मग मी कशासाठी शोक करू?
इतकी दयास्पद अवस्था झाली आहे की काय माझी?

नियतीने आपले योजनाबद्ध बेत उलगडतांना
पाहिले आहेत मी.
ट्रॉयने जे सोसायचे ते सोसले.
आता देवाच्या इच्छेने
तिच्या जेत्याचा हा असा शेवट होत आहे.
आता अश्रू गाळून संपले आहेत माझे.
मी माझ्या मृत्यूला तोंड देईन.
हे अधोलोकीच्या प्रवेशद्वारांनो
येतायेता मी तुम्हाला अभिवादन करीत आहे.
माझ्यावर एकच जीवघेणा घाव पडो.
एवढीच माझी प्रार्थना आहे.
तडफड न होता कोसळू दे मला
उष्ण रक्त हळूहळू ओहटीला लागल्याचे जाणवू दे मला.
आराम मिळण्यासाठी
मी मृत्यूला कवटाळीत आहे असे होवो

श्रेष्ठीवृंद : हे अतीव यातना भोगणाऱ्या पण तितक्याच ज्ञानी असणाऱ्या स्त्रिये,
तू आम्हांला खूपच सांगितले आहेस पण जर तुला तुझ्या स्वतःच्या मृत्यू
बद्दलचे इतके सत्य पूर्वज्ञान आहे
तर बळी जाणाऱ्या बैलाप्रमाणे
अशी धीट पावलांनी वधस्थानाकडे का जात आहेस?

कॅसँन्ड्रा : मित्रांनो, आता सुटका नाही.
एकदा ती घडी येऊन ठेपल्यानंतर
सुटका अजिबात होणे नाही.

श्रेष्ठीवृंद : तरीपण शेवटी जाणाऱ्याला
सर्वात जास्त वेळ मिळतो

कॅसँन्ड्रा : हाच तो निश्चित झालेला
दिवस आहे.
मागे फिरण्यात काही लाभ नाही.

श्रेष्ठीवृंद : तुझ्यामधील धैर्य
मोठ्या अभिमानास्पद रीतीने
तोडीस तोड ठरत आहे तुझ्या दैवगतीला !

कॅसँन्ड्रा : सुखी लोकांना असली स्तुती
कधीच एकायला मिळत नाही.

श्रेष्ठीवृंद : पण धैर्याने मृत्युला तोंड दिल्याने
त्या मर्त्यतेवर सुद्धा तेज चढते.

कॅसँन्ड्रा : अहो पिताजी ! अरे माझ्या बंधूंनो !
तुमचे सारे तेज नष्ट झाले रे !
शेवटी आता मी पण चालले
पराजितांच्या प्रदेशात

मी माझ्या आणि ॲगमेमनॉनच्या मृत्यूबद्दल
शोक करीन.
जगून झाले माझे.

(ती दरवाजाकडे जाते. मग एक किंकाळी फोडून परत फिरते. )

श्रेष्ठीवृंद : काय झाले ? काय पाहिलेस तू ?
कशाने भयभीत होऊन तू परत फिरलीस ?

(कॅसॅन्ड्राचा श्वास कोंडतो. गुदमरल्यासारखा आवाज येतो. )

श्रेष्ठीवृंद : धाप लागली आहे तुला.
जणू तुझा अंतरात्मा कशाची तरी किळस येऊन
ढवळून निघत आहे.

कॅसॅन्ड्रा : हत्येची घाण सुटली आहे इथे
भिंतीमधून रक्त ठिबकते आहे.

श्रेष्ठीवृंद : वेदी तयार आहे ना !
हा यज्ञबलीचा वास आहे

कॅसॅन्ड्रा : कबरीतून बाहेर येणाऱ्या
हवेसारखा बऱ्हंशी वाटतो आहे हा वास

श्रेष्ठीवृंद : समाराधनेसाठी शिंपडलेल्या
सिरियातील अत्तरांबद्दल बोलते आहेस तू ?

कॅसॅन्ड्रा : एखादा पक्ष्याने रिकाम्या झुडपाला घाबरावे
आणि उगीचच थरथरत कापत बसावे
तशी नाही मी.
थांबा. तुम्ही जेव्हा माझ्या मृत्युची भरपाई

दुसऱ्या मृत्युने केलेली पहाल –
एका स्त्रीसाठी दुसरी स्त्री–
जेव्हा लग्न हा ज्याच्यासाठी शाप ठरला
त्याच्याजागी दुसरा माणूस पडेल –
तेव्हा तुम्हीच साक्षी व्हा माझे–
की ही आणि माझी
इतर भाकितेही निखळ सत्य होती.
मरण्यापूर्वी एवढी विनंती करते मी.

श्रेष्ठीवृंद : मरण हे दुःखदच असते
पण आपल्या मृत्युचे भविष्य अगोदर कळणे
हे जास्त दुःखद ठरते.

कॅसँड्रा : आणखी एक शब्द– एक भाकित–
अथवा जर हे शोकगीत ठरेल
तर ते केवळ माझ्या एकटीसाठी नव्हे.
माझ्या ह्या शेवटच्या सूर्यप्रकाशात
मी प्रार्थना करते.
जेव्हा तलवारीची धार
मला बंदिवान करणाऱ्याच्या सांडलेल्या रक्ताचा सूड घेईल.
तेव्हा त्याची हत्या करणारे मरता मरता
त्या ऋणाबरोबरच हेही ऋण फेडोत.
तिचे - जिला - विरोध करू न शकणाऱ्या त्या सावजाला
त्यांनी साखळदंडांनी बांधून मारले.
हाय रे मानवी भवितव्य !
माणसाचे सर्वात सुखाचे दिवस
सावटात काढलेल्या चित्रांप्रमाणे असतात.
मग दुर्दैव येते.
आणि ओला कपडा दोन फटक्यात
ते चित्र पुसून टाकते.
आणि मग प्रत्यक्ष दुःखसुद्धा काही पूर्वीच्या आनंदापेक्षा

जास्त अनुकंपास्पद वाटत नाही.

(ती राजवाड्यात जाते )

श्रेष्ठीवृंद : सुखाच्या आस्वादाने
माणसाचे पुरे समाधान कधीच होत नाही.
कारण बोटे दाखवणारा मत्सर
त्याचे सुखभांडार न्याहाळीत असतानाच,
आणि भोवतालच्या जिभा त्याच्या सुखाची
उत्साहाने प्रशंसा करीत असतांना सुद्धा
आकंठ सुखास्वाद घेणाऱ्या माणसाला
अजूनही आणखी सुखाची
आस लागलेली असते.
कारण सारखे यश मिळवण्याचा
कुणाला कंटाळा येणार आहे ?
सद्भाग्याला आपल्या दारापासून परतवून
" मला त्रास देऊ नकोस " असे कोणी म्हणेल काय ?
सुदैवाला ज्याच्यावर कृपा करायला आवडते.
त्या आमच्या राजाने
देवांच्या इच्छेने ट्रॉय घेतले.
आणि त्याच्या सुखरूप पुनरागमनाने
त्याला मोठा सन्मान लाभला
आणि आता फार पूर्वी सांडलेल्या रक्ताचे
यथायोग्य प्रायश्चित्त म्हणून,
जर त्याचे रक्त वहायला हवे असेल
आणि जर त्याच्या मारेकऱ्यांच्या हातून
मृत्यूवर मृत्यू व्हायचा असेल
आणि जर कर्मगती अशीच असेल
तर मी विचारतो की
" मी एकटाच काय तो शांत जीवन
आणि अकलंकित कीर्ती भोगण्यासाठी जन्मलो आहे "

ॲगमेमनॉन

असा दावा कोणता मर्त्य मानव करू शकेल ?

( राजवाड्यातून ॲगमेमनॉनचा आवाज ऐकू येतो.)

ॲगमेमनॉन : धावा, धावा, मदतीला धावा.
मी जखमी झालो आहे.
माझी हत्या होते आहे
ह्या आतल्या खोलीत

श्रेष्ठीवृंद : शू ऽऽ थांबा, ऐका!
" हत्या" म्हणून कोण ओरडले ?
तुम्हाला ओळखू येतो आहे का तो आवाज ?

ॲगमेमनॉन : मदतीला धावा. पुन्हा सांगतो,
मदतीला या माझ्या.
अहो खून! हा दुसरा प्राणांतिक घाव !

एक श्रेष्ठी : त्या विवळण्यानेच सांगितले
की ते कृत्य होऊन गेले आहे
राजाचाच आवाज होता तो.
चला, आता काम केले म्हणजे धोक्यापासून बचावू,
याची सगळे मिळून योजना करू या.

दुसरा श्रेष्ठी : मी हा असा सल्ला देतोय–
एका निरोप्याला सगळीकडे पाठवून
सर्व नागरिकांना
सशस्त्र होऊन इथे जमायला सांगू या.

तिसरा श्रेष्ठी : फार वेळ लागेल अशाने
मला वाटते आपण एकदम
आत घुसू या

आणि खून होतानाच—
तलवारीवरचे रक्त वाळण्यापूर्वीच
तो पकडू या .

**चौथा श्रेष्ठी :** मलाही तुझ्या सारखेच वाटते
तसेच करायला हवे आपण
किंवा तसेच काहीतरी दुसरे.
काहीतरी करण्याची हीच वेळ आहे.

**पाचवा श्रेष्ठी :** ही सुरवात
पुढे काय होणार
याची स्पष्ट निदर्शक आहे.
मारेकऱ्यांना जुलमी राजवट स्थापन
करायची आहे.

**साहवा श्रेष्ठी :** होय. आणि आपण मात्र
इकडे बोल-बोल बोलत बसलो आहोत.
पण काहीतरी करण्याची इच्छा
झोपेला डावलून सावधगिरीचा सौम्य चेहरा
मातीत तुडवते.

**सातवा श्रेष्ठी :** व्यवहार्य ठरेल
असा कोणताच मार्ग मला तर सुचत नाही.
मी म्हणतो ज्यांनी हे आताचे पाऊल टाकले
तेच पुढचे पाऊल कुठे टाकायचे
ते ठरवू देत.

**आठवा श्रेष्ठी :** माझेही तेच मत आहे.
जर राजा मृत्यु पावला असेल
तर केवळ वादविवाद करून
त्याला जिवंत करण्याचा

कोणताच मार्ग मला तरी माहित नाही.

नववा श्रेष्ठी : मग काय या आपल्या राजघराण्यावरच्या कलंकभूत व्यक्ती आपल्यावर राज्य करीत असतांना, आपण आपली सारी वर्षे गुलामगिरीत रखडत घालवायची सारे सहन करीत ?

दहावा श्रेष्ठी : छे ! छे ! असह्य होईल ते ! त्यापेक्षा मरण कोण पत्करणार नाही ? जुलमी राजसत्तेखाली जगण्यापेक्षा मरण कितीतरी सुसह्य!

अकरावा श्रेष्ठी : थांबा, इतकी घाई नको. आपल्याजवळ काय पुरावा आहे ? ही विवळणी ? त्यांच्यावरून राजा मरण पावला आहे असे भविष्य वर्तवायचे आम्ही ?

बारावा श्रेष्ठी : आपली खात्री झाली पाहिजे. आपण असे गडबडून जाणे अकाली आहे. अंदाज करणे आणि खात्री लायक ज्ञान ह्यात खूप फरक आहे.

श्रेष्ठीवृंद : राजाला काय झाले आहे ह्याची आपण पूर्ण चौकशी करावी ह्याच मताला सगळ्या बाजूंनी पाठिंबा मिळतो आहे.

(राजवाड्याचे दरवाजे उघडतात आणि क्लायटेमनेस्ट्रा दिसते. तिच्या पायापाशी एका चांदीच्या स्नानपात्रात एका प्रचंड जांभळ्या झग्यात गुंडाळलेला अँगमेमनॉन मृतावस्थेत पडलेला दिसतो. त्याच्या अंगावर मृत कॅसॅन्ड्रा पडलेली आहे.)

क्लायटेमनेस्ट्रा : त्या क्षणाला साजेशा अशा पुष्कळ गोष्टी मी म्हटल्या त्याला काही फार वेळ झाला नाही. आता ती वेळ निघून गेली आहे तेव्हा ते सारे बोलणे मी कोणतीही लाज न बाळगता मागे घेते. जेव्हा माणूस मित्र भासणाऱ्या शत्रूच्या मृत्युची तयारी करतो तेव्हा त्या बळीच्या उंचातल्या उंच उडीपलीकडे घातक सापळा भोवताली उभारणे दुसऱ्या कोठल्या मार्गाने शक्य होणार असते. अगदी खूप वेळ मी ह्या शक्तींच्या मुकाबल्याच्या विचार केलेला आहे. अखेर शेवटी समोरासमोर लढाई

झुंपण्याचा प्रसंग आला आणि त्याबरोबर जय पण मिळाला.

इथे जिथे उभे राहून मी वार केला
तिथेच उभी राहून
मी माझे कार्य पार पडलेले पहात आहे.
होय ही सगळी माझीच कामगिरी आहे.
आणि मी तिच्यावर हक्क सांगते आहे.
एकाद्याने मासे पकडण्यासाठी टाकावे
तसे मी हे प्रचंड विस्तृत जाळे त्याच्यावर टाकले
त्या जाळ्याने आपल्या अगणित एकांत एक गुंफलेल्या घड्यांनी
त्याला चारी बाजूंनी गुरफटून टाकले
त्यामुळे तो निसटू शकला नाही.
किंवा मृत्युविरुद्ध झगडूही शकला नाही
आणि मग मी दोनदा त्याच्यावर वार केले
दोनदा तो किंचाळला आणि विवळला
आणि मग मरगळून पडला
आणि असा तो पडला असतांना
मी तिसरा आणि अखेरचा घाव घातला.
माझी प्रार्थना सफल केल्याबद्दल
मी आभार मानते झ्यूसचे
जो ईश आहे अधोलोकोचा.
आणि तारक – मृत मानवांचा.
मग असा पडता पडता त्याने ढेकर दिल्यासारखा
आपला जीव बाहेर टाकला.
आणि खोकला आणि वांती यांच्या बरोबर
रक्ताळलेला फेस त्याच्या मुखातून बाहेर उसळला.
एकाद्या जोरदार कारंज्यासारखा,
आणि इकडेतिकडे पसरतांना
त्याने माझ्यावर जणू लाल पावसाचे शिंतोडे उडवले.
दरम्यान मी आनंदाने फुलून उठले होते
जसे वसंतऋतूत कळ्या उसळी घेऊन बाहेर पडल्यावर

आकाशातून दैवाचा शिडकावा झाला
की पेरलेले मक्याचे शेत उल्हसून जाते तशीच

आरगॉसच्या वडीलधाऱ्यांनो,
अशी आहे ही सारी घटना.
तुम्ही तुमच्या इच्छेनुसार
याबद्दल आनंद माना नाहीतर दुःखी व्हा.
मी मात्र हर्षाने डवरून गेले आहे.
आणि जर माणूस मृत झाल्यावरसुद्धा
त्याच्या सुखरूप प्रवासासाठी धन्यवादाचे
अर्घ्य देणे शोभत असेल
तर ह्या ठिकाणी न्यायदेवता
नुसती त्याबद्दल परवानगीच देत नाही
तर तशी मागणी करीत आहे.
इतकी पूर्ण मुरलेली दुष्टपणाची मदिरा
ह्या माणसाने आपल्या घरात साठवली होती !
आणि आता परतल्यावर
स्वतःचा शापित पेला तो अखेरच्या
घोटापर्यन्त पीत आहे.

श्रेष्ठीवृंद : तुझ्या भाषणातला पाशवी निर्लज्ज
उद्धटपणा आम्हाला चकित करतो आहे.
स्वतःच्या पतीच्या मृतदेहासमोर
निलाजरेपणाने प्रौढी मिरवीत आहेस तू !
एखाद्या अविवेकी स्त्रीला
उद्देशून बोलावे
तसे तुम्ही बोलत आहात.
पण तुमची चूक होत आहे.
माझी नाडी अगदी स्थिर गतीने चालली आहे
तुम्हाला जे अगोदरच माहित आहे
तेच मी सांगते आहे.

तुम्ही मान्य करा वा अधिक्षेप करा –
तुमच्या इच्छेप्रमाणे.
माझ्या दृष्टीने सारे सारखेच आहे.
हा माझा पती आहे– अ‍ॅगमेमनॉन.
आता ठार मेला आहे.
त्याचा मृत्यू माझ्या उजव्या हाताने
घडवून आणला आहे.
त्या हाताचे कौशल्य न्याय मान्य करतो.
हे आहे साधेसुधे सत्य.

श्रेष्ठीवृंद : अधम स्त्रिये ! कोणते अनैसर्गिक अन्न वा पेय सेवन केल्याने एख विषारी मूळ– अथवा खवळलेल्या सागरातले क्षारजल– इतकी प बदलून गेली आहेस तू की हीनाहून हीन असा हा गुन्हा करतांना तु सहजप्रवृत्ती कचरली नाही ? आरगॉस तुझ्या या – नाव सुद्धा उच्च नये अशा हत्येची एकमताने तिरस्काराच्या सुरात निर्भत्सना करी न्यायी आणि स्वतंत्र नागरिकांच्या बरोबरचा तुझा हिस्सा काढून घेई आणि आमच्या आरगॉसच्या महाद्वारातून बहिष्कृत म्हणून तुला हद्दपार करील.

क्लायटेमनेस्ट्रा : असं होय !
आता तुम्ही न्यायीपणाचा आव आणून
मला हद्दपारीचा दंड देता आहात.
मला जाहीररीत्या शिव्याशाप प्रदान करीत आहात.
नागरी तिरस्काराच्या आरोळ्या देत आहात
पण ह्यापूर्वीच्या एका प्रसंगी
तुम्ही ह्या माणसाला विरोध करण्याचा
धीर का केला नव्हतात ?
याने, माणसे जितक्या सहजतेने
सदसद्विवेक बुद्धीची टोचणी जराही न लागता
मेंढ्यांची कत्तल करतात तसा–
त्याच्या माळ जमिनी मेंढ्यांच्या कळपांनी

भरलेल्या असताना –
आपल्या अपत्याचा बळी दिला.
माझी स्वत:ची लाडकी बाळी
जिला जन्म देण्यासाठी मला कळा सोसाव्या लागल्या–
तिला याने थ्रेसच्या वाऱ्यांना थांबवण्यासाठी
एक तोडगा म्हणून मारून टाकली.
आरगॉसमधून जर कोणाला घालवून द्यायला
हवे असले तर
त्यालाच तुम्ही घालवायचा हवे होते.
आपल्या मुलीच्या रक्ताने डागाळलेला
तोच शिक्षेला पात्र होता.
पण माझ्या कृत्याचा तेवढा
तुमच्या कानांना धक्का बसतो
तुमच्या न्यायी त्वेषाला धार चढते.
तुमच्या धमक्या नि:संकोच बळावर आधारलेल्या आहेत.
तुमच्याजवळ माणसे आहेत, शस्त्रे आहेत
तर मग न्याय्य युद्धात तुमच्या बळाची परीक्षा
माझ्या विरूद्धच्या लढ्यात होऊ दे.
जर तुम्ही जिंकलात तर तुम्ही मला हुकूम देऊ शकता.
पण जर देवाच्या कृपेने तुम्ही हरलात
तर, तुम्ही वृद्ध असलात तरी
काही थोडा शहाणपणा अजूनही
तुम्हाला शिकवण्यात येईल.

श्रेष्ठीवृंद : अशा बढाया केवळ लुच्च्या
मनातील मूर्खपणाच दर्शवतात.
तुझा झगा जितक्या निश्चितपणे
ह्या लाल ठिपक्यांतून तुझा गुन्हा उठावाने फडकावतो आहे.
तितकेच हे ही निश्चित आहे की
प्राणघातक घावाखाली
तुझे स्वत:चे मस्तकही नत होईल.

ती वेळी येण्याचाच काय तो अवकाश आहे.
मग मित्रहीन, अवमानित, बहिष्कृत अशा तुला
कळून येईल
की तुझे देणे देण्याची वेळ आली आहे.
आणि प्रत्येक प्रहाराला प्रतिप्रहार
सोसावा लागेल तुला.

क्लायटेमनेस्ट्रा : असे आहे काय ?
तर मग मी घेणार असलेली न्याय्य शपथ
तुम्हाला ऐकवते.
न्यायदेवता – माझ्या अपत्याची रक्षणकर्ती
जिने आता आपले काम पूर्ण केले आहे
तिला स्मरून –
जिच्या पायाशी मी त्याच्या रक्ताचे
अर्घ्य प्रदान केले
त्या सूड घेणाऱ्या क्रोध्र देवतेला स्मरून सांगते–
त्याच्या मृत्यूचा सूड उगवणाऱ्यांच्या पावलांनी
हे घर हादरेल
ही भीति मला नाही.
जोपर्यन्त माझा तेव्हाचा आणि आताचाही
एकनिष्ठ सहाय्यकर्ता ईजिस्थस
माझ्या गृहाग्नी कुंडामध्ये पूर्वापार असलेला
अग्नी प्रदीप्त करीत आहे,
तोपर्यन्त मला ती भीती नाही.
अशी ढाल हातात असतांना
सामर्थ्य धिटाईने पुढेच जाणार.
पण सध्या तरी ट्रॉयमधल्या प्रत्येक क्रायसिसचे
गोड गोड प्रणयाराधन करणारा
व माझे जीवन कडवट करून टाकणारा
हा इथे पडला आहे.
आणि त्याच्याबरोबरच त्याची ही बंदिवान

त्याची निष्ठावंत भविष्यवेत्ती
जिने त्याला शय्यासोबत केली
आणि नाविकांच्या वासनातुरतेचा अनुभव घेतला.
दोघांचाही शेवट अगदी यथायोग्य असाच झाला आहे.
तो– त्याला तुम्ही पहातच आहात
ती– प्रथम मरणोन्मुख हंसाप्रमाणे
आपले मृत्यूगीत गायली ती
आणि आता आपल्या प्रियकराच्या बाहुपाशात पडली आहे.
शय्येत मी देत असलेल्या रतिसुखात
सुखद बदल म्हणून आणली गेलेली ती
आता त्याच्या विजयाला अधिक स्वाद आणते आहे.

श्रेष्ठीवृंद : या बघा त्याच्याकडे आणि अश्रू ढाळा.
अरेरे ! एखादी दयाळू, एकदम झडप घालणारी दैवगती –
झिजत ठेवणाऱ्या दुखण्याशिवाय
मला त्याच्या अखंड निद्रेचा भागीदार होण्याची
परवानगी देईल तर किती बरे होईल !
आमच्या देशाचा प्रेमळ रक्षणकर्ता
विपन्नावस्थेत पडला आहे.
ज्याने एका स्त्रीच्या पातकाच्या निवारणासाठी
दहा वर्षे युद्ध केले
तो आज एका स्त्रीकडून मारला गेला आहे

हेलन ! वासनेचे भक्ष्य झालेल्या हेलन!
तू ट्रॉयच्या तटांखाली अगणित जीवितांचा बळी दिलास !
आता तुझ्या घराण्याच्या माथी तू मारले आहेस.
कधी धुवून न जाणारे पाप.
या पापाची उजळणी युगायुगात होत राहील.
निश्चितच, ज्या दिवशी तू कधी परत न येण्यासाठी पलायन केलेस
त्याच दिवशी शोकाच्या शापाचे मूळ
ह्या राजवाड्यात खोलवर रूजले

आणि तो शाप वाढतच राहिला.

क्लायटेमनेस्ट्रा : वस्तुस्थितीचा बोजा
तुम्हाला इतका अवजड वाटतो आहे का?
आता आणखी मृत्यु धडून यावे
म्हणून प्रार्थना करू नका.
किंवा तुमचा राग हेलनवरही काढू नका.
जणू काही तिच्या कृत्यानेच
हजारो योद्ध्यांचे भवितव्य निश्चित झाले
आणि त्यांच्या जीवापासून श्वास हिरावून घेतले गेले.
किंवा जसा काही केवळ तिच्या चुकीमुळेच
हा असा ज्याला उपाय नाही असा, शोक उत्पन्न झाला!

श्रेष्ठीवृंद : हे द्वेषाच्या पिशाच्चा,
तुझ्या कडक शापाचा निर्घृण प्रभाव
टँटलसच्या घराला व त्याच्या वंशजांना
भारभूत होऊन राहिला आहे.
तुझ्या प्रेरणेनेच या स्त्रीच्या मेंदूत
या अशा पापी कुटिलतेचा उद्भव झाला
आणि त्यामुळे माझे सारे दुःखाकुल दिवस
झाकळून गेले आहेत.
तुझीच निंद्य आकृती मृतापाशी आनंदोत्सव
करताना दिसते आहे.
मला राणीच्या स्वरूपात—
प्रेतावर कावळ्याने चढून बसावे तशी.
तुझाच आवाज ऐकू येतो आहे मला
जो घृणास्पद गाणे गात कान व हृदय
या दोहींना अपमानास्पद धक्का देत आहे.

क्लायटेमनेस्ट्रा : आमच्या वंशाचा द्वेष करणाऱ्या
व तिचा पिच्छा पुरवणाऱ्या

तीनदा आकंठ भक्षण करून तृप्त झालेल्या
भयानक पिशाच्चिनीचे नाव तुम्ही घेतलेत,
तेव्हा मात्र तुम्ही जास्त शहाणपणाने बोललात.
तिला लागलेली असते तहान वधाची
कलह व सूड ह्यांनी नेहमीच तृप्त होत असलेली.
पण प्रत्येक अन्याय्य सूडाने निवारण
झाला रे झाला
की एक नवीनच तृष्णा
जागा घेते पूर्वीच्या तृष्णेची.

श्रेष्ठीवृंद : ही अरिष्टकारक शक्ती–
जिच्या कोपाचे तू उत्साहाने वर्णन करीत आहेस
तद्भव अभद्र वस्तुस्थिती कथन करून
तिला कोठल्याही राजवंशाचे पतन
वा कुठलाही विलक्षण घातपात पूर्णपणे
तृप्त करू शकणार नाही.
हाय रे ! हे दयनीय अगम्य रहस्य !
झ्यूसच सर्वसत्ताधीश नाही का ?
हाय झ्यूस, झ्यूस !
साऱ्या घटनांचे उगमस्थान आणि
साऱ्यांचा कर्ता !
त्याच्या सर्वोच्च सत्ता गाजवणाऱ्या शब्दांवाचून
हे भीषण कृत्य घडू शकले असेल का ?
दु:खी, मूक झालेल्या राजा !
तुझ्या मृत्युचा शोक कोणत्या प्रकारे करू मी ?
मी तुझा जिवलग मित्र आहे हे स्पष्ट करणारा,
अन्त:करणापासून निघणारा सच्चा शब्द
कसा शोधून काढू ?
पत्नीच्या निर्घृण फसवणुकीत पकडला जाऊन
तू तुझा अखेरचा श्वास सोडलास –
त्याच जागी एका हिडीस कोळ्याच्या जाळ्यात घट्ट

गुरफटलेला असा
तू पडला आहेस.
कसली ही ओंगळ विश्रांती
आणि कसला हा अति हीन शेवट ! की
दुधारी सुरीने भोसकला जाऊन
मानवाने एखाद्या श्वापदासारखेच मरावे !

क्लायटेमनेस्ट्रा : हा खून मी एका पत्नीने केला
असा आरडाओरडा तुम्ही करता आहा.
मी त्याची पत्नी होते,
पण आता ह्यापुढे माझे नाव
त्याच्या नावाशी जोडले जाऊ नये.
माझा देह धारण करून
जुन्या तीव्र सूडाच्या एका पिशाच्चाने
ॲट्रियसवर - त्या किळसवाण्या यजमानावर
त्याच्या निषिद्ध कृत्याची परतफेड म्हणून
या रक्ताचा अभिषेक केला आहे.
अशासाठी की इथे न्यायदेवतेच्या वेदीवर
बालहत्येसाठी एका माणसाचे रक्त सांडले पाहिजे.

श्रेष्ठीवृंद : आणि तू स्वतःला निर्दोष धरते आहेस?
कदाचित कोणी सूड घेणारी शक्ती
तुझ्या शेजारी उभी असेलही
पण ह्या रक्तपाताच्या पापापासून
कोण मुक्त करू शकेल तुला?
दर एका तासाला त्याच्या अनिवार्य मार्गावरून
काळा झगा घातलेला राजा
हत्येसाठी अधीर होऊन
भाऊबंदांच्या नसातून अहंकार व द्वेष
याच्या पायी वाहवण्यात येणारा
लाल जीवनरक्ताचा अखंड प्रवाह

फुगवीत जात आहे,
हिशेब चुकता होण्याची योग्य वेळ येईपर्यंत
मग ते वाळलेले रक्त वितळेल
आणि अॅरिस अखेरीस त्या अनैसर्गिक
मेजवानीबद्दलचा न्याय करील.

दु:खी, मूक झालेल्या राजा!
तुझ्या मृत्यूचा शोक कोणत्या प्रकारे करू मी?
मी तुझा जिवलग मित्र आहे हे स्पष्ट करणारा
अन्त:करणापासून निघणारा सच्चा शब्द
कसा शोधून काढू?
जिथे पत्नीच्या निर्घृण
फसवणुकीत पकडला जाऊन
तू तुझा अखेरचा श्वास सोडलास
त्या या जागी एका हिडीस कोळयाच्या जाळयात घट्ट
गुरफटलेला असा
तू पडला आहेस. कसली ही ओंगळ विश्रांती
आणि कसला हा अति हीन शेवट!कीं
दुधारी सुरीने भोसकला जाऊन
मानवाने एकाद्या श्वापदासारखेच मरावे!

क्लायटेमनेस्ट्रा : त्याला मारण्यासाठी मी जे कपट केले
ते त्यानेच प्रथम आचरले होते—
जेव्हा त्याने कपटाने
स्वत: मला दिलेले कोवळे रोपटे उपटून टाकले,
आणि या घरावर शाप ओढवून घेतला
जेव्हा त्याची क्रूर तलवार
माझ्या कुंवार कन्येवर पडली
तेव्हा माझ्या अश्रूंच्या नद्या वाहल्या
जर आता क्रूर तलवारीच्या वाराने
त्याचे वार्धक्याकडे झुकलेले जीवन संपले असेल

तर शरम आणि सद्सद्विवेकबुद्धी
त्याच्या बढायांनी प्रतिबंध करू देत
कारण त्याच्या कपटाने
प्रथम घडून गेलेल्या अपकृत्यासाठीच
तो आता दंड भरतो आहे.

श्रेष्ठीवृंद : कुठे? सत्य कोठे आहे ते कसे शोधावे?
मन बधिरपणे चाचपडत आहे.
त्याच्या चटकन मदतीला येणारी साधनासामुग्री सरली आहे.
आमचे राजसिंहासन संकटात आहे
आपत्ती नजीक येऊन ठेपली आहे.
सहाय्यार्थ कुठे वळू मी आता?
वास्तूच्या पायाला फटी पाडणाऱ्या
अशनीपाताची मला धास्ती वाटते आहे.
रक्तासारखा लाल वर्षाव होईलसे वाटते.
शिमशिम पाऊस थांबला आहे.
महापूर फार दूर नाही.
न्यायदेवता दैवगतीच्या मनोगताशी सूर जुळवून
पृथ्वीला पुन्हा एकवार हादरा देण्यासाठी आपली तिच्यावरील पकड घट्ट करीत आहे.
हे भूमी, भूमी ग!
माझ्या डोळ्यांनी त्याची–
ह्या चांदीच्या
वेष्टिलेल्या वतनाच्या स्वामीची–
ही अवनती पाहण्यापूर्वी
काही समयोचित योगायोगाने
मला तुझ्या मांडीवर शयन करता आले असते
तर किती बरे झाले असते!
कोण त्याचे दफन करील?
कोण मृताबद्दल शोक करील?
तू - तू अपले खरे रूप लपवण्यासाठी

शोकवस्त्र परिधान करशील?
स्वतःच्या हाताने ज्याचा मृत्यू घडला
त्या पतीसाठी आक्रोश करशील?
त्याच्या थोर यशाला असत्याचे नजराणे देशील?
ज्या अर्थी न्यायदेवता उत्तरते, "नाही"
म्हणून
त्याअर्थी मग कोण खऱ्या प्रेमाचे अश्रू ढाळील?
कबरी शेजारी करण्याचा
स्तुतीपाठाचा विधी कोण पार पाडील?

क्लायटेमनेस्ट्रा : तो प्रश्न सोडवणे हे काही तुमचे काम नाही
मी त्याला घाव मारून खाली पाडले
मी त्याला परलोकी धाडले
आणि मीच त्याच्या अस्थी मातीत पोचवीन.
या घरातून किंवा या शहरातून
माणसांचे जमाव
त्याच्यासाठी छाती पिटून शोक करणार नाहीत,
किंवा काशाच्या आणि संगमरवराच्या
छत्र्या उभारून त्यात त्याला
नागरिकांना साजून दिसणारे
सुस्कारे टाकीत ठेवणार नाहीत.
पण जे योग्य आहे तेच होईल.
म्हणजे त्याची मुलगी
अधोलोकी ओवरीजवळ त्याला सामोरी जाईल
लहान वयात मृत्यू पावलेल्यांच्या निवासस्थाना नजीक
त्याची लाडकी इफिजिनिया
प्रेमळ बाहूंनी आणि मुस्कटदाबीमुळे
मूक झालेल्या जिभेने
त्याचे स्वागत करील.

श्रेष्ठीवृंद : दोषारोपानीच दोषारोपाला उत्तर मिळते.

व सत्य जास्तच अधुक होत जाते.
घाव घालणाऱ्यावरच ती घाव घालते आहे
ज्याने हत्या करण्याचे साहस केले
तो त्याची पूरेपूर परतफेड करीत आहे.
जोपर्यन्त झ्यूस सिंहासनावर अधिष्ठित आहे
तोपर्यन्त हेच सुभाषित
पृथ्वीवर जारी रहाणार आहे—
"पापी असेल तो मरतो"
हाच आहे देवाचा कायदा
हाय! शापालाच पुन्हा पुन्हा जन्म देणाऱ्या
ह्या शापाला कोण पिटाळू शकेल?
या भिंतिशीच एक जीव होऊन वाढणारी व
या भिंतींनाच मनगुराद छळणारी ही कीड
कोण हाकून काढील?

क्लायटेमनेस्ट्रा : "पापी असेल तो मरतो"
अखेर तुम्ही सत्यापर्यन्त पोचलात.
आता ज्या शक्ती आमच्या वंशाचा
छळ करीत आहेत
त्यांच्याशी मी शपथपूर्वक एक करार करते.
ह्या कठोर कृत्याने आणि दुःखद वस्तुस्थितीने
मी समाधान पावले आहे.
त्यांनाही आता भूतकाळ विसरू दे
आम्हाला कायमचे मुक्त करू दे
आणि खुनशी दुष्टपणाने
दुसऱ्या कोठल्यातरी घराला ग्रासू दे.
मला भारंभार वित्त नको आहे
ही किंमत देऊन
आमच्या इतक्या दीर्घकाळच्या दुखण्यासाठी
आरोग्य खरेदी करणे
हे मला पुरेसे आहे.

(इजिस्थस येतो.)

इजिस्थस : वहाव्वा! काय हा आनंदाचा दिवस!
आज न्यायदेवतेने आपले साम्राज्य पुन्हा प्रस्थापित केले.
आता मला असे खात्रीपूर्वक वाटते आहे की
पृथ्वीच्या वर रहाणारे देव
माणसांच्या यातना बघतात
आणि त्याबद्दल योग्य अशी भरपाई करून देतात.
या इथे सूडदेवतांनी विणलेल्या जाळ्यात
गुरफटून पडला आहे तो
माझे हृदय फुलून उठते आहे ह्या दृश्याने
त्याच्या वडिलांच्या विश्वासघातकी गुन्हयाचे
पुरेपूर प्रायश्चित म्हणून
त्याने आपल्या रक्ताचे दान केले आहे.
त्याची कथाही अशी अगदी साधी व सरळ आहे.
ॲट्रियस ॲगमेमनॉनचा पिता
जो तेव्हा आरगॉसवर राज्य करीत होता
त्याच्यात आणि त्याचा बंधू माझा पिता थिएस्टिस
ह्यांच्यात झगडा झाला
ॲट्रियसने आपल्या बंधूला
घरातून आणि शहरातून
घालवून दिले.
नंतर तो परत आला
आणि ॲट्रियसच्या गृहाग्नीकुंडाजवळ
एक केविलवाणा याचक म्हणून बसला.
त्याची याचना पूर्ण झाली– अंशतः –
त्याच्या स्वतःच्या रक्ताने काही
त्याचे बालपणचे घर कलंकित झाले नाही
पण ॲट्रियसने ह्या माणसाच्या पित्याने
त्याचा पाहुणा म्हणजे माझा पिता
ह्याला यजमानाकडून म्हणून एक भेट दिली.

ग्रीक शोकनाट्ये

प्रेमापेक्षा आतुरतेनेच ती भेट भरलेली होती
त्याने ती मेजवानीचा दिवस असल्याचा आव आणला
आणि उत्तमोत्तम मांसान्नांच्या मध्ये
त्याला त्याच्या स्वतःच्या दोन पुत्रांचे मांस वाढले.
पाय व पसरलेली बोटे–
ज्यांच्यावर ओळखता येणार नाही
इतके बारीक चिरलेले इतर भाग ठेवून
त्याने लपवली.
प्रत्येक पाहुण्यापुढे भोजनाचा होते
आणि हे खाद्यपदार्थ फक्त माझ्या पित्यापुढे ठेवण्यात आले.
त्याने अजाणतेपणे,
निरखून बघण्याचे कारणच नसल्याने,
तो पदार्थ घेतला व चाखला –
त्या घटनेपासून,
तुम्ही [illegible],
आमचे घर अजून सावरलेले नाही
नंतर त्याच्या लक्षात आले
कोणते भयंकर बीभत्स कृत्य करण्यात आले होते ते.
एक तीव्र विव्हल स्वर काढून
हत्या केलेले मांस ओकत
तो खुर्चीवरून खाली पडला.
पेलॉपच्या वंशाला त्याने एक अनिवार्य शाप दिला
लाथेने त्याने मेज दूर उडवले
आणि किंचाळून तो म्हणाला,
"अशेच टँटलसचे सारे घराणे
कोसळून नष्ट होवो"
त्या कृत्यातून आता तुम्ही जे पहात आहा
त्याचा जन्म झाला–
ह्या मृत्यूचा–
याच्या मृत्यूची योजना मी केली
न्याय्यच होते ते.

मी थिएस्टीसचा तिसरा पुत्र होतो
तेव्हा बाळंत्यात असलेले अर्भक –
म्हणून वाचलो
आणि सैरभैर झालेल्या पित्याबरोबर
मला दूरदेशी धाडण्यात आले.
पुढे मोठा झाल्यावर
न्यायदेवतेने मला मायदेशी स्थान प्राप्त करून दिले
दूर राहून मी
सारा घातक सापळा रचला.
आणि माझे सावज पकडले.
आता ॲगमेमनॉनला
न्यायाच्या सापळ्यात सापडून
मृत झालेला पाहून
मी खुषीने प्राणत्याग करू शकेन.

श्रेष्ठीवृंद : इजिस्थस, मृताचा अपमान करण्याच्या अपराधातून
आम्ही तुला मुक्त करतो
पण ज्याअर्थी तुझा असा दावा आहे
की तू एकट्याने हा सारा कट रचलास
आणि त्यामुळे प्रत्यक्ष उपस्थित नसूनही
त्याच्या रक्तपाताचा दोष आपल्या अंगावर घेतलास
त्याअर्थी मी स्पष्ट सांगतो की
तू तुझ्या स्वतःच्या जीवनावरचा हक्क गमावला आहेस.
न्यायदेवता तुला शाप देईल.
आरगॉसच्या रहिवाशांचे हात
तुला दगडांनी ठेचून मारतील.

इजिस्थस : अस्से! एकूण अशी तुम्ही
भाषणे देता तर! –
नौकेच्या वरच्या माळ्यावरच्या मुखाला
तळमजल्यावरच्या खलाशाने द्यावी तशी

तर मग म्हातारे झालेले असलात तरी
तुम्हाला कळून येईल
की जेव्हा सन्मानार्ह वयात ज्ञान लोकडे पडते
तेव्हा शिस्तपालन किती कठीण जाते ते.
गुलामगिरीच्या बेड्या आणि भुकेची आच
ही जादूसारखी परिणामकारक औषधे आहेत!
त्यांच्यात मनाला शिस्त लावण्याची
फार मोठी शक्ती असते.
हे इथले दृश्य तुम्हाला विचार करायला लावीत नाही का?
तर मग पाठीला टोचणाऱ्या अंकुशाला
लाथा झाडून विरोध करू नका.
नाहीतर ठेचाळाल आणि दुखापत पावाल.

श्रेष्ठीवृंद : अरे बायल्या
तो लढायला गेला तेव्हा
तू घरी राहिलास!
तेवढ्या काळात त्याच्या बायकोला भ्रष्ट केलेस
आणि मग
ज्या माणसाने सैन्याचे नेतृत्व केले
त्याच्याविरुद्ध तू हा खुनाचा कट निर्लज्जपणे रचलास!
शी!

इजिस्थस : ज्यात भावी अश्रूंची बीजे आहेत
असे शब्द तुम्ही अजूनही वापरता आहा!
अगदीच निराळा आहे!
जो जो त्याचा आवाज ऐकत असे
त्याला तो आनंदाने भारून टाकीत असे.
तुमचे बालिश केकाटणे
आम्हाला त्रासदायक वाटते आहे
आणि ते स्वतः तुम्हालाच
बंधनात मात्र अडकवून टाकील.

तुमच्यावर कडक नियंत्रण घातले तरच
तुम्ही जरा वळणावर याल.

श्रेष्ठीवृंद : कडक नियंत्रण!
आमच्यावर आरगॉसचा राजा म्हणून
तुला बघण्याची वेळ येणार आहे की काय?
राजाच्या खुनाचा कट तेवढा तू रचलास
पण त्याच्यावर तलवार उचलण्याचे धाडस
काही तुला झाले नाही.

इजिस्थस : त्याला भुलवून
मी लावलेल्या सापळ्यात आणून सोडणे
हे उघडच स्त्रीचे काम होते
मी जुना वैरी असल्यामुळे
माझ्याबद्दल त्याच्या मनात संशय निर्माण झाला असता.
आता त्याच्या संपत्तीची मदत घेऊन
आरगॉसवर राज्य करण्याची
मी खटपट करणार आहे.
जे विरोध करतील
ते प्रदर्शनीय घोड्यासारखे
नुसते खायला घालून गलेलठ्ठ केले जाणार नाहीत
तर त्यांना मानेवर जू वागवावे लागेल
चांगलेच जड असे. –
उपासमार, आणि अंधारकोठडी दोन्ही मिळून
लवकरच विरोध नरम पाडतील त्यांचा.

श्रेष्ठीवृंद : एवढा जर तू धीट आहेस
तर मग तुझ्याच हातांनी
शत्रूला का लुबाडले नाहीस?
त्याऐवजी जिच्या जीवनक्रमामुळे ही पृथ्वी मलीन झाली आहे
व आरगॉसचे देव अव्हेरले गेले आहेत

अशा स्त्रीने त्याची हत्या करायला
तुला मदत केली!
हाय, ऑरिस्टिस जिवंत आहे का?
दयाळू देवा त्याला घरी आण
आणि त्याची अजिंक्य तलवार
ह्या दोघांविरूद्ध सामन्यास खडी होऊ दे.

इजिस्थस : मग, ज्याअर्थी तुमचा द्रोह लढाऊ धोरण स्वीकारीत आहे
त्याअर्थी तुम्हाला लवकरच कळायला हवे
की अधिकारारूढ असणारांचा अपमान करणे
मूर्खपणाचे आहे.
तयार रहारे त्या तिकडे!
रक्षकांनो व्हा पुढे.
(सशस्त्र सैनिक आत घुसतात.)
काम निघाले आहे इथे तुमच्यासाठी
प्रत्येकाने आपली तलवार उपसावी.

श्रेष्ठीवृंद : आमच्याही तरवारी तयारच आहेत.
आम्ही मरायला सिद्ध आहोत.

इजिस्थस : मरायला!
ह्या शब्दाचा शकुन
आम्ही स्विकारतो
अर्थात दैवाच्या हातात हारजीतीचा निर्णय राहील.

क्लायटेमनेस्ट्रा : थांब, थांब! प्रियतम इजिस्थस!
आता जास्त मारामारी नको.
जेव्हा हे पहिले पीक कापणीला येईल
तेव्हा भरपूर शोक पदरात पडेल आमच्या.
गुन्हा आणि नैराश्य
यांचे पोट फुटेपर्यन्त भरले आहे.

आता रक्तांत आणखी खोलवर बुडणे नको.
श्रेष्ठींनो, मी तुमची विनवणी करते.
दैवाला वेळीच शरण जा.
तुम्हाला काही अपाय होण्यापूर्वी घरी जा.
आम्ही जे केले ते नियतीने पूर्वीच निश्चित केले होते.
जर आमच्या दीर्घ काळच्या
यातनांचा इथे शेवट होणार असेल
तर दैवाच्या लांब नख्यांनी
दोनदा भोसकले गेलेले आम्ही
त्याचे स्वागतच करू.
मी स्त्रीजातीच्या उपजत शहाणपणाचे बोल बोलत आहे.
मनावर घेतलेत तर त्याचा आशय
लक्षात येईल तुमच्या.

इजिस्थस : मग काय ह्या असंस्कृत जिभेच्या लोकांनी
त्यांचे मर्मभेदी टोमणे
हवे तसे भिरकवावेत
आणि ज्याला ते सर्वस्वी पात्र आहेस
तो त्यांच्या वाटचा कर्मभोग टाळून टाकावा?

श्रेष्ठीवृंद : अशा बदमाशाच्या पायाशी
कुणी आरगॉसचा नागरीक लोळण घेतांना
दिसणार नाही तुला.

इजिस्थस : बस्स, बस्स.
नंतर केव्हातरी मी तुमच्याबरोबरचे
सारे हिशेब चुकते करीन.

श्रेष्ठीवृंद : जर देवाने ऑरिस्टिसला
आरगॉसच्या मार्गाला लावले
तर तसे होणार नाही.

इजिस्थस : निर्वासित माणसांना
आशा म्हणजे जीविताधार असे
अन्न आणि पाणीच.
ठाऊक आहे मला हे.

श्रेष्ठीवृंद : आ! राज्य करीत रहा!
न्याय कलंकित करीत पुष्ट हो
जोवर संधी आहे तोवर!

इजिस्थस : मूर्ख आहेस तू
केव्हातरी एक दिवस ह्या शब्दांची
भारी किंमत मोजावी लागेल तुला माझ्याजवळ.

श्रेष्ठीवृंद : आंधळेपणाने बढाया मिरवीत रहा.
आपल्या कोंबडीसमोर डौलाने मिरवणाऱ्या कोंबड्यासारखा.

(ह्या शेवटच्या ओळी म्हणतांना श्रेष्ठीवृंद दोघादोघांची जोडी करून निघून जातो. शेवटचा माणूस शेवटचे अपमानकारक वाक्य म्हणून निघून जातो. आता क्लायटेमनेस्ट्रा आणि इजिस्थस दोघेच रंगमंचावर रहातात.)

क्लायटेमनेस्ट्रा : ह्या कुत्र्यासारख्या केकाटण्याकडे लक्ष देऊ नकोस
तू आणि मी –
जोडीने राज्य करून
आपल्या सिंहासनाला योग्य तो मान
जबरदस्तीने मिळवू.

## संदर्भांच्या स्पष्टीकरणार्थ टीपा :

**ॲगमेमनॉन** : ॲरिस्टीसवर लिहिलेल्या तीन नाटकांपैकी पहिले शोकनाट्य. यांतील संदर्भ.

**आरगॉस** : ग्रीसमधले एक महत्वाचे शहर, तसेच या नावाचे नगरराज्यही. याचा राजा ॲगमेमनॉन होता व मिसिनी ही राजधानी होती.

**इलिऑन** : ट्रॉयचे एक नाव.

**ट्रॉय** : डारडानेलेसच्या पूर्वेकडचे भोवती तटबंदी असलेले एक महत्वाचे शहर.

**ॲट्रियस** : आरगॉसचा एक राजा. टॅन्टलसचा नातू. ॲगमेमनॉनचा पिता.

**झ्यूस** : क्रोनस व -हीया हयांचा पुत्र. आकाशाचा ईश, देवांचा राजा, दैवाचा अधीश. वीज हे त्यांचे शस्त्र.

**हेलास** : ग्रीसचे एक नाव.

**प्राॲम** : पहिले नाव पोडारसिस. हया लॅओमेडानच्या मुलाला त्याच्या बहिणीने हर्क्युलिसपासून वाचवले व त्यामुळे त्याचे नाव बदलून प्राॲम म्हणजे वाचवलेला असे ( redeemed ) ठेवले. पॅरिसचा पिता. ट्रॉयचा राजा.

**पॅन** : धनगरांचा व मेंढयांच्या कळपांचा ईश. हर्मिसचा मुलगा. त्याला बकऱ्यासारखे पाय, शिंगे व शेपटी असते.

**लॉक्सिअस** : ॲपोलोचे एक नाव. ॲपोलोला पिथियन असेही म्हणतात पिथियन म्हणजे पिथियाचा, डेल्फीचा देव ॲपोलो हा भविष्यवाणीचा

ईश व गायनाचा व संगीताचा अधीश सूर्यदेव.

पॅरिस : प्रामॅमचा मुलगा. राजा मेनेलॉसची पत्नी हेलन हिच्यावर प्रेम असून तिला घेऊन ट्रॉयला पळाला होता.

हेलन : झ्यूस व लेडा ह्यांची मुलगी. ही अतिशय सुंदर होती व तिच्यासाठी अनेकजण झुरत होते. तिने राजा मेनेलॉस— स्पार्टाचा राजा – ह्याच्याशी लग्न केले.

टिंडरिअस : स्पार्टाचा राजा. त्याची पत्नी लेडा हिची हेलन ही झ्यूसपासून झालेली मुलगी होती. क्लायटेमनेस्ट्राचा पिता.

आरटेमिस : ॲपोलोची बहीण. ही पशूंची आणि शिकारीची देवता आहे. ती मुलांची व पशूंच्या पिल्लांची रक्षणकर्ती आहे. ती अविवाहित आहे. तिला चंद्रदेवता मानतात, जसे ॲपोलोला सूर्यदेव मानतात.

कॉलकास : • ट्रॉयचा भविष्यवेत्ता. इफिजिनीयाचे बलिदान करण्याबद्दलची भविष्यवाणी ह्याने सांगितली.

युरॅनस : गीआ अगर पृथ्वी हिचा पती. देवांचा जुना राजा. पृथ्वीला त्याच्यापासून अनेक अपत्ये झाली.

क्रॉनॉस : युरेनस व गे ह्यांचा पुत्र झ्यूसचा पिता.

चाल्किस : युबोईआचे मुख्य शहर.

ऑलिसची खाडी : जिथून ट्रॉयवर हल्ला करण्यासाठी जहाजे निघाली ती खाडी ऑलिस हे तिच्यावरील बंदर.

स्ट्रायमोन : मॅसिडोनियातील एक महत्वाची नदी.

**हर्मिस :** झ्यूस व माईआचा पुत्र. रोमन लोक ह्याला मर्क्युरी म्हणतात. पशूंचा ईश. त्याच्याजवळ पंख असलेली टोपी व जोडे असतात.

**लेम्नॉस :** इजिअन समुद्रातील एक बेट.

**ॲथॉस :** मॅसिडोनियातले एक डोंगराळ द्वीपकल्प.

**इजियन समुद्र :** अथेन्सचा राजा इजिअस, थीसीयसचा पिता, याने ॲटिका जवळच्या ज्या समुद्रात उडी टाकून जीव दिला त्या समुद्राचे नाव त्याच्यावरून इजियन समुद्र असे पडले.

**मॅकिसटास :** एक पर्वत.

**युरीपस :** सामुद्रधुनीचे नाव

**मेसापियन :** मेसॅपिॲमधील मेसॅपिॲ हे इटलीतील एका द्वीपकल्पाचे ग्रीक नाव होते.

**ॲसोपस :** एका नदीचे नाव. तिच्या अधिष्ठात्या देवालाही ॲसोपसच म्हणतात.

**सिथिरॉन :** बिओशिआ आणि ॲटिकामधील एक उंच पर्वत श्रेणी डिल्यो नायसस् व कला देवता ह्यांच्या निवासाने पवित्र झालेली.

**इजिप्लॅनक्टस :** मेगॅरिसमधला एक पर्वत. मेगॅरिस हे एदुरिआजवळच्या समुद्रातील एका बेटाचे नाव.

**सॅरॉनिक आखात :** इजिअन समुद्रातली एक सुंदर खाडी.

**अरॅचनियस :** बिओशिया व ॲटिका यांच्या मधील पर्वत.

इडा : ट्रॉयजवळचा एक डोंगर. प्रायॅमची पत्नी हेक्युबा हिला आपल्या दुसऱ्या पुत्राच्या जन्माआधी असे स्वप्न पडले की आपण एका जळत्या ज्योतीला जन्म दिला. त्यामुळे तो मुलगा जन्माला आल्यावर माऊंट इडावर ठेवण्यात आला, व त्याला एका धनगराने वाढवले. त्याचे नाव पॅरिस ठेवले.
(ही सारी ठिकाणे एशिया मायनरच्या तीरावर असलेल्या, ट्रॉयला निघालेल्या जहाजांच्या ताफ्याला इजियन समुद्र ओलांडतांना लागलेली ठिकाणे आहेत. विजयाची खूण असलेल्या ज्वाला या सर्व ठिकाणांवर पेटवल्या होत्या.)

फ्युरीज् : क्रोधदेवता गीआ किंवा पृथ्वीने आपला सर्वांत धाकटा मुलगा क्रोनस ह्याला दिलेल्या विळ्याने त्याने आपला पिता युरेनस ह्याचे पुरुषत्व नष्ट केले तेव्हा पृथ्वीवर पडलेल्या थेंबातून ॲलेक्टो, टिसीफोनी व मेगारा ह्या तीन कोपिष्ट सूडदेवतांचा जन्म झाला. निसर्गाविरुद्ध केलेल्या गुन्ह्यांना त्या शिक्षा करतात. त्यांच्या मस्तकाभोवती सर्प असतात. व त्यांच्या डोळ्यांतून रक्त ठिपकते त्यांना युमेनिडिज् : शांत झालेल्या देवता असेही म्हणतात. फ्यूरी म्हणजे सूड उगवणारी क्रोध देवता ह्या शब्दावर श्लेष आहे. सूड घेणारी क्रोधदेवता क्लायटेमनेस्ट्रा हीपण आहे.

मेनेलॉस: स्पार्टाचा राजा. हेलनचा नवरा. ॲगमेमनॉनचा भाऊ.

थ्रेस : ग्रीसमधील एक स्थळ.

स्कॅमॅन्डर : एक नदी. क्रीटच्या स्कॅमॅन्डरने झांथस नदीत उडी घातल्यावर तिचे नाव स्कॅमॅन्डर ठेवले गेले.

झेफिर : ॲसट्रियस व इऑसचा मुलगा. पश्चिम वारा.

सिमॉइस : नदीचे व तिच्या अधिष्ठात्या देवाचे नाव.

**ओडिसीयस :** ॲगमेमनॉनच्या मदतीला बोलावलेला एक वीर. ट्रोजन घोड्याची कल्पना त्याची होती असे म्हणतात. या वीराच्या समुद्रावरील प्रवासांवर होमरने ओडिसी हे महाकाव्य लिहिले.

**थिएस्टीस :** पूलॉप्सचा मुलगा. इजिस्थसचा पिता. त्याला ॲट्रियसने त्याच्या मुलांचे मांस खाऊ घातल्याने त्याने ॲट्रियसच्या घराण्याला शाप दिला होता.

**प्रायसिस :** ट्रॉयमधल्या ॲपोलो देवाच्या पुजाऱ्याची मुलगी – जी ॲगमेमनॉनला लुटीचा भाग म्हणून देण्यात आली होती. पण नंतर ॲपोलो क्रुद्ध झाल्यामुळे त्याला ती तिच्या पित्याला परत द्यावी लागली.

**टँटलस :** झ्यूस आणि प्लुटो ह्या अप्सरेचा मुलगा. पेलॉप्सचा पिता. आरगॉसचा राजा. त्याला काही अपराधावरून अधोलोकी अशी शिक्षा झाली होती की हाताच्या अंतरावर पाणी व फळे असली तरी ती त्याच्या मुखी पडू नयेत. यावरून 'टँटालाईझ'
(tantalise) हे क्रियापद झाले आहे.

**ऑरफियस :** ॲपोलोकडून मिळालेल्या लायर (वीणा) ह्या मधुर वाद्याने ऑरफियस पशू, वृक्ष, दगड–धोंडे ह्यांना आपल्या मागोमाग यायला लावू शकत असे.

**इट्रून, इट्रून :** इटस् हा प्रॉक्ने हिचा मुलगा. तिने आपला पती टेरीअस ह्याला तिची बहीण फिलोमेला हिच्यावर बलात्कार केल्याबद्दल शिक्षा म्हणून आपला पुत्र इटस् ह्याला मारले. फिलोमेला नंतर नाइटिंगेल (बुलबुल) पक्षी बनली. व "इट्रून, इट्रून" असा स्वर गाण्यात काढून इटसला साद घालू लागली.
**आपल्या बंधूची शय्या विटाळणारा :** हा उल्लेख थिएस्टीसबद्दलचा आहे, त्याने आपली भावजय, ॲगमेमनॉनची माता, ॲट्रियसची पत्नी इरोपे हिच्याशी व्यभिचार केला होता.

# कोओीफोरी

अथवा

# अर्घ्यधारिका

लेखक

इस्किलस

अनुवादिका

सौ. माधुरी भिडे

# कोओीफोरी अथवा अर्घ्यधारिका

पात्रे

**ऑरिस्टिस** – ॲगमेमनॉनचा मुलगा. आरगॉसचा राजा

**पायलॅडिस** – त्याचा मित्र.

**गायकवृंद** – ( कोरस ) क्लायटेमनेस्ट्राच्या सेविका

**इलेक्ट्रा** – ॲगमेमनॉनची मुलगी.

क्लायटेमनेस्ट्राचा एक सेवक

**क्लायटेमनेस्ट्रा** – ॲगमेमनॉनची विधवा

ऑरिस्टिसची दाई

**इजिस्थस** – क्लायटेमनेस्ट्राचा जार

इजिस्थसचा सेवक.

(दृश्य – आरगॉसच्या तटाबाहेरची ॲगमेमनॉनची समाधी – म्हणजे मातीचा एक ठेंगणासा उंचवटा आहे. जवळच हर्मिसची एक ओबडधोबड प्रतिकृती आहे. उंचवट्याजवळ ऑरिस्टिस उभा आहे. थोड्या अंतरावर पायलॅडिस उभा आहे. वेळ पहाटेची. )

ऑरिस्टिस : हे हर्मिस,
मृत मानवांच्या आत्म्यांच्या
पाताळ लोकातील मार्गदर्शका,
तारण हार झ्यूसच्या पुत्रा,
आपले नित्याचे स्थान भूषित कर
आणि माझा मुक्तीदाता हो.
माझ्या प्रार्थनेचा स्वीकार कर.
माझ्या उद्दिष्टसिद्धीसाठी झुंज दे माझ्या बाजूने
माझ्या भूमीत,.माझ्या घरी
नुकताच परतलेला एक निर्वासित असा मी
माझ्या जन्मसिद्ध हक्कासाठी झगडतो आहे.
मी जे कार्य करणार आहे.
ते हाती घेण्यापूर्वी

## ग्रीक शोकनाट्ये

मी माझ्या मृत वडिलांना
त्यांची समाधी असलेल्या या उंचवट्यावरून
साद घालतो आहे.
अशासाठी की त्यांनी ऐकावे आणि अनुमती द्यावी.
( केसांच्या दोन बटा पुढे करतो )
माझ्या माथ्यावरच्या केसांच्या ह्या दोन बटा
मी अर्पण करतो आहे.
एक आयनॅकसला–'
माझ्या मायभूमीतील सरितेला –
जिने माझे बालपण जोपासले;
आता मी मोठा झालो आहे.
म्हणून माझी कृतज्ञता दर्शविण्यासाठी
ही पहिली बट
– ही दुसरी, माझे दुःख, माझी हानी
आणि माझे फार उशीरा ढाळलेले अश्रू ह्यासाठी.
प्रिय पिताजी, मी नव्हतो तिथे
तुमच्या हत्या झालेल्या देहाजवळ शोक करण्यासाठी
आणि प्राण सोडून तुम्ही निघून गेलात
तेव्हा निरोपाचा हात पुढे करण्यासाठी.
कोण येते आहे बरे? हे काय?
लांब काळे झगे घातलेल्या स्त्रिया?
काय बरे ह्याचा अर्थ असेल?
आणखी एखादा मृत्यू की काय?
आमच्या घराला व्यथित करण्यासाठी आणखी अश्रू?
का माझी पहिलीच कल्पना खरी आहे?
की माझ्या पिताजींच्या समाधीला अर्पण करण्यासाठी
अर्घ्ये घेऊन येतो आहे हा नारीसमूह?
पृथ्वीवरील शक्तींना शांतवण्यासाठी?
होय. असेच आहे. दुसरे काहीही नाही.
आणि हो – मला दिसते आहे ही माझी
बहीणच नव्हे का?

इलेक्ट्राच आहे ती!

इलेक्ट्रा : इतरांपेक्षा दुःखाच्या आवरणात
आस्ताच गुरफटून गेलेली.
हे श्रेष्ठ झ्यूसदेवा,
माझ्या पित्याच्या मृत्यूचा सूड घेईन
असे वरदान मला दे
कृपा कर माझ्यावर
तुझी शक्ती ह्या लढ्यात माझ्या बाजूला असू दे.
— चल पायलॅडिस,
मला ऐकायचे आहे ह्या स्त्रियांचे बोलणे
आणि त्या हा प्रार्थना करण्याचा विधी का करीत आहेत
हे समजावून घ्यायचे आहे मला
ये, आपण जरा एका बाजूला होऊ या.

( ऑरेस्टिस आणि पायलॅडिस रंगमंचाच्या एका बाजूला आडोशाला जातात. तेवढ्यात इलेक्ट्रा व सेविकावृंद हातात सुरया व पात्रे घेऊन येतात व ती सर्व समाधी पुढे ठेवतात. )

सेविका वृंद : आज्ञेप्रमाणे मृतांसाठी अर्घ्ये
घेऊन आलो आहोत आम्ही
शोकाकुल, जड पावले टाकीत,
पण तरीही वरवर दुःख दाखवीत
काही आम्ही कपाळ पिटून घेत नाही
किंवा ढोंगी दुःखावेगाने काही
आम्ही आमचे गाल नखांनी वरचेवर ओरबाडून
रक्ताळून टाकलेले नाहीत.

( ज्याने माझ्या व्यथित मेंदूला
वर्षानुवर्षे खाद्य पुरवले त्या जुन्या दुःखाच्या
ताज्या खुणा आहेत ह्या )

## ग्रीक शोकनाट्ये

भावना हीन, बेफिकिर, दिखाऊ वृत्तीने
फाडलेला नाही हा विणलेला झगा
उघड्या पडलेल्या हया छातीतल्या यातनेचे
केवळ प्रदर्शन करण्यासाठी.
माझे काळीज अशा एका हानीने जखमी झाले आहे की
जिच्या आघाताने
जीवनात नाही उरले हास्य
ना उरला यातनांना विसावा.
मध्यरात्रीच्या वेळी
नि:शब्द झालेल्या घरातून
एक आवाज स्पष्ट निनादला
आणि भयाने केस उभे राहिले ताठ
जेव्हा क्रोध जागृत होऊन खवळून उठला
आणि प्रत्येक कर्णरंध्राने ओळखला तो
भविष्य वर्तवणारा सूर
जो स्वप्नातून सावधानतेच्या सूचना देतो
आणि हया घराला अवधान देण्यासाठी
साद घालतो.
आतल्या बाजूला असलेल्या
स्त्रियांच्या शयनमंदिरातून
तो विवळणारा सूर
अटळ नियतीसारखे बरेच काही सांगून गेला
आणि स्वप्नांचे गूढ अर्थ – उलगडून सांगण्यासाठी
आपले कौशल्य पणाला लावणारे म्हणाले.
( स्वर्गस्थांच्या संकल्पानेच दिली त्यांना स्फूर्ती )
"मृतांमध्ये ज्वलंत प्रकोप उफाळून उठला आहे.
आणि हत्या करणाऱ्यांसाठी
सूड टपून बसला आहे."
म्हणून पाठवले आहे आम्हाला तिने
– तिचा देव तिरस्कार करतात
शांतवण्यासाठी तुला

## कोऑीफोरी अथवा अर्घ्यधारिका

– हे माते, धरित्री!
आलो आहो आम्ही दैवाचा आघात चुकवण्यासाठी
क्लायटेमनेस्ट्राच्या प्रार्थनेसह –
अश्रद्ध मनाच्या पण श्रद्धायुक्त शब्दांच्या अवडंबरासह
ह्या इथल्या हवेत प्रार्थनेचे पवित्र
उच्छ्वास टाकायला सुद्धा
भीती वाटते आहे मला
ज्या भूमीवर रक्त सांडले आहे
तिला कोणत्या पवित्र विधीने पावित्र्य
मिळणार आहे?
हाय रे, यातना परिपूर्ण धरा!
काय हा लाजिरवाणा चमत्कारीक अध:पात
अंधाराच्या दरीत – जिथे सूर्याला थारा मिळत नाही!
हे काळेकुट्ट अपराधित्व –
ज्याची मानवाला घृणा वाटते –
स्मरण आहे त्याला
किती हत्यांनी
तुमच्या राजघराण्यावर खुणा ठेवल्या आहेत ते.
असा एक काळ होता
की जेव्हा एक श्रद्धा
लोकांच्या मनावर सत्ता गाजवीत होती –
राजसत्तेबद्दल संशयातीत आदर
प्रेमाच्या बंधनाने अति-दृढ केलेला.
आता आदराने आपली निष्ठा त्यजिली आहे
भीतीचे साम्राज्य आहे आता.
अंगीकृत कार्यात जय – हाच आता माणसांचा देव आहे –
देवच का – देवाधिदेव आहे.
पण जरी अंधुक प्रकाशात
वर्षानुवर्ष पापी भीतीने छपून राहिला
किंवा रात्रीच्या अंध:कारात
सुरक्षित राहून काळाच्या सूडाला

## ग्रीक शोकनाट्ये

वाकुल्या दाखवीत राहिला
तरी जेव्हा पारडे फिरते
तेव्हा न्यायाच्या हातातच
तराजूची दांडी असते
आणि नियती वेगाने झेप घेते
सत्पक्षाशी उघडउघड शत्रुत्व करणाऱ्यांना
शोधून काढून
चिरडून टाकण्यासाठी.
जेव्हा माणसाची सोशिक धात्री असलेल्या पृथ्वीला
मानवाचे रक्त वारंवार प्राशन करण्याचा प्रसंग येतो
आणि दु:खित अन्त:करणाने पहावा लागतो
तो गडद, कधी न पुसला जाणारा,
सूडाची मागणी अजीजीने करणारा डाग
तेव्हा तो दया क्षमा न करणारा शाप
डूक धरून अपराधी आत्मा
असाध्य घृणास्पद व्याधीने ग्रासलेला पहाण्यासाठी
प्रतीक्षा करीत रहातो.
ज्याप्रमाणे सद्गुणावरची मोहर
एकदा भंगली की
ती कधीच पुन्हा सांधली जात नाही.
त्याप्रमाणे जरी साऱ्या निर्झरांनी
ओतले आपले पावित्र्य
एक कलंक धुवून काढणारा लोंढा
फोफावून उठवण्यासाठी
तरी त्यांचा जोर अपुरा पडेल
कलंक नष्ट करण्याची त्यांची शक्ती
व्यर्थ ठरेल,
त्या हातांसाठी — की ज्यांच्यावर
बदला न घेतलेल्या रक्ताचे डाग आहेत.
पण मी मात्र
स्वर्गस्थशक्तींच्या इच्छेने माझी नगरी लुटली गेल्यापासून

आणि माझे जीवन शृंखलाबद्ध झाल्यापासून
माझ्या पित्याच्या घरापासून दूर
गुलाम म्हणून ठेवली गेले आहे
म्हणून, गरजेने निश्चित केल्याप्रमाणे
कर्तव्य म्हणून मी न्याय्य आणि अन्याय्य –
दोन्ही सारखेच संमत करते,
इलाज नाही म्हणून
आज्ञापालन करते
आणि जमेल तसा
माझ्या हृदयातला कडवट द्वेष
आटोक्यात ठेवण्याचा प्रयत्न करते आहे.
एकीकडे माझ्या झग्याखाली
ढाळते आहे मी माझे अश्रू
अन्याय सत्ता गाजवीत आहे म्हणून,
समर्थन केले जाते आहे पापाचे म्हणून.
ज्याला वाचा फुटू शकत नाही अशा वेदनांनी
माझे हृदय आतल्या आत ताठरले आहे.

इलेक्ट्रा : बायांनो,
तुम्ही राजगृहाची सेवाही करता
आणि त्याच्या व्यवस्थापनाकडे ही बघता
तुम्ही मज बरोबर या प्रार्थनेचा विधी पार पाडण्यासाठीच
आला आहात
तेव्हा मला मार्गदर्शन करा.
कोणते शब्द उच्चारू मी?
ह्या पवित्र समर्पण द्रव्यांकडे पहा
ही भेट अर्पण करताना
कोणती बरे प्रार्थना संतोषदायी ठरेल?
कोणती वाक्ये किंवा शब्द रचना
माझ्या पित्याच्या समाधीचा मान राखतील?
मी असे म्हणावे का की

"ही वाहून आणली आहे मी
तुमची पत्नी — माझी माता
हिच्याकडून भेट म्हणून —
तुमच्या परस्पर विषयक प्रेमाची साक्ष म्हणून?"
असे शब्द उच्चारण्याइतकी निगरगट्ट
नाही मी.
तसेच माझ्या पिताश्रींना आच्छादणाऱ्या
मृत्तिकेवर पवित्रतेत ओततांना
उचित आशीर्वचन उच्चारण्यासाठीही
योग्य शब्द सापडत नाहीत मला
का म्हणून नेहमीचे ठराविक शब्द
"ज्यांनी ह्या माला पाठवल्या
त्यांना तुमचा आशीर्वाद लाभो." असे?
— म्हणजे मग अपराध्यांना
पुरेपूर मोलच मिळाले म्हणायचे!
का असे मानहीन शांततेत
त्यांचे रक्त वाहिले तसे हे अर्घ्यही
मी तहानेल्या भूमीवर निःशब्दपणे फेकू
आणि निघून जाऊ झुगारून वळूनही न पहाता.
एखादी घृणास्पद वस्तू भिरकावून दिल्यानंतर
एखाद्याने निघून जावे तसे,
हे पात्रे फेकून देऊन?
सख्यांनो, सहभागी व्हा माझ्या निर्णयात
जशा तुम्ही घरी आपल्या उभयतांच्या जीवनाची पकड
घेतलेल्या द्वेषात
वाटेकरी होता तशाच.
काही मनात लपवून ठेवू नका.
स्पष्ट बोलून दाखवा तुमच्या अंतरंगातले
ज्यांना आपण सध्या भितो त्यांची
भीती न बाळगता.
आपल्या नशिबी काय लिहिले आहे ते

फक्त देवांनाच माहित.
आणि गुलाम वा स्वतंत्र
तुम्हाला किंवा मला
त्या भवितव्याबद्दल पसंती नापसंती दाखवता
येणार नाही.
किंवा ते चुकवताही येणार नाही
तुम्हाला जर याबाबतीत काही अधिक चांगला
सल्ला द्यायचा असेल
तर तो मला आताच ऐकवा.

सेविकावृंद : जी मला देवांच्या यज्ञवेदीप्रमाणे
पवित्र वाटते
त्या तुमच्या पिताश्रींच्या समाधीची शपथ,
ज्याअर्थी तुम्ही आज्ञाच करीत आहा
त्याअर्थी मी माझ्या हृदयाच्या अगदी गाभ्यातले विचार सांगते.

इलेक्ट्रा : बोलाच तर.
आणि ही समाधी आहे साक्षीला.

सेविकावृंद : मग वारूणी ओततांना
जे एकनिष्ठ आहेत
त्यांच्यासाठी एक गांभीर्यपूर्ण प्रार्थना करा.

इलेक्ट्रा : कोणाबद्दल बोलता आहात तुम्ही?
एकनिष्ठ आहेत का कुणी?

सेविकावृंद : तुम्ही स्वतः आहात ना?
आणि इजिस्थसचे सर्व द्वेष्टे पण.

इलेक्ट्रा : तर मग माझ्यासाठी आणि तुमच्यासाठी
करू मी प्रार्थना?

सेविकावृंद : तुम्हाला सत्य माहित आहे
आणि तुम्ही कुठला मार्ग स्वीकारावा
हे ठरवू शकता स्वत:च.

इलेक्ट्रा : दोस्त म्हणून दुसरा कोण
आपल्या बाजूने उभा आहे?

सेविकावृंद : तो दूर आहे खरा तरी पण
तुमच्या प्रार्थनेत ऑरेस्टिसचाही उल्लेख करा.

इलेक्ट्रा : होय. चांगली कल्पना आहे.
अवश्य करीन तसे.

सेविकावृंद : नंतर
करा प्रार्थना त्या खुन्यांसाठी की.

इलेक्ट्रा : काय प्रार्थना करू मी त्यांच्यासाठी?
तुम्हीच सांगा मला.
मला तरी सुचत नाही काही.

सेविकावृंद : अशी की देवाच्या किंवा मानवाच्या
कोणत्या तरी न्यायाच्या कक्षेत येवोत ते.

इलेक्ट्रा : आणि त्यांचा.न्याय होवो,
धिक्कार होवो का

सेविकावृंद : फक्त अशी साधी प्रार्थना
करा की
"जे रक्त सांडले गेले आहे
त्यासाठी रक्त सांडणारा येवो."

इलेक्ट्रा : देवांच्या दृष्टीने अशी प्रार्थना
अपवित्र ठरणार नाही का?

सेविकावृंद : का?
दुरिताला दुरिताने उत्तर देणे
म्हणजे काही अपवित्र कृत्य करणे नव्हे.

इलेक्ट्रा : हर्मिस – देवांच्या अग्रदूता
अधोलोकीच्या मार्गदर्शका,
श्रेष्ठतम मध्यस्था, मदतीस धावून ये.
माझी बाजू मांड आणि
पृथ्वीच्या पोटातील शक्ती
ज्या जतन करतात आमचा वारसा,
त्यांना आणि स्वतः धरित्रीला
जी साऱ्या सजीव वस्तूंना
आधारभूत होते, जोपासते त्यांना
आणि आपले बीज पुन्हा पुन्हा फलित व्हावे
म्हणून मानवांकडून अर्घ्य स्वीकारते.
तिला सांग की माझ्या प्रार्थना त्यांनी स्वीकाराव्या!
आता मृतात्म्यासाठी अर्घ्य प्रदान करते
मी या पवित्र करणाऱ्या जलाचे
आणि आवाहन करते त्याच्या आत्म्याला,
पिताजी! माझ्यावर आणि तुमचा पुत्र ऑरेस्टिस
ह्याच्यावर दया करा. आम्हा दोघांचे आपल्या घरावर
कसे प्रस्थापित होईल स्वामित्व?
आम्ही दोघे गृहहीन झालो आहोत
आमच्या आईने विकले आहे आम्हाला.
तिला मिळालेले मोल आहे इजिस्थिस
ज्याने तुमची हत्या केली.
मी गुलामासारखी जीवन कंठीत आहे.
ऑरेस्टिस आहे हद्दपार झालेला,

त्याचा वारसा हिरावून घेतलेला आहे त्याच्यापासून
आणि ते उद्दाम, नीच,
झळकताहेत तुम्ही जिंकून आणलेल्या
संपत्तीच्या पसाऱ्यात.
पिताजी,
कोणता तरी सुयोग ऑरिस्टीसला इथे आणो!
ऐका हो ऐका!
प्रत्युत्तर द्या माझ्या प्रार्थनेला माझ्यासाठी
निष्पाप हृदय व निष्कलंक हात
आणि माझ्या जन्मदात्रीच्या अगदी उलट
असे विचार आणि वर्तन –
एवढे लाभो आम्हाला ही माझी प्रार्थना आहे.
हे एवढे झाले आमच्याबद्दल.
आता, आपल्या शत्रूंबद्दल बोलायचे तर,
– पिताजी, तुमच्या मृत्यूसाठी बदला घेणारा प्रगट होवो.
ज्यांनी हत्या केली त्यांना
मृत्यूचे उत्तर म्हणून मृत्यूचाच
अनुभव येवो.
न्यायाचेच होईल ते!
माझ्या शत्रूंच्या आकांक्षांविरूद्ध
माझी ही आकांक्षा
मी अटीतटीने उभी करते आहे
माझा हा शाप त्यांच्या शापाच्या तोडीस तोड म्हणून
उच्चारते आहे.
त्यांच्या दुष्टाव्या विरूद्ध
माझा दुष्टावा योजते आहे.
पण आमच्यावर मात्र
कृपावंत व्हा.
आम्ही मागत आहोत ते आशीर्वाद
अधोलोकातून पाठवून द्या.
देवांच्या नावाने, पृथ्वीच्या नावाने

आणि सत्याचा जयच होईल या विश्वासाने
ही मागणी आम्ही करीत आहोत.
ही अर्घ्ये देतांना
ह्या अशा प्रार्थना करीत आहे मी.
आता यथाविधी खणखणीत स्वरात
गायलेल्या शोक गीताची माला त्यांच्या भोवती गुंफा
मृतासाठी गावयाचे जयघोषगीत होईल ते!

सेविकावृंद : मृतासाठी ठिपकणारे अश्रू घंटानाद करोत.
व्यर्थासाठी व्यर्थ, हानीसाठी हानी
अशुभ दिवस टळावा म्हणून,
निष्ठावंत मस्तकाचे रक्षण व्हावे म्हणून
आणि रक्तपातजन्य शाप थोपवून धरला
जावा म्हणून.
आता वारुणीचे अर्घ्य दिले जात असतांना
मृतासाठी ठिपकणारे अश्रू घंटानाद करोत
आणि त्याला उच्च स्वरातील रुदनाने
प्रतिसाद मिळो.
आमच्या हरपलेल्या राजासाठी हे अश्रू.
हे अँगमेमनॉन, पूज्य राजा,
आम्ही सादर करीत असलेल्या ह्या प्रार्थनेला
प्रतिसाद दे.
आमच्या बावरलेल्या हृदयातून फुटलेला
आमचा हा आक्रोश ऐक.
येईल का कोणी बलशाली पुरुष
युद्धातील वीर कृत्यांची आवड असणारा,
जो सूड घेणाऱ्या भाल्याने
किंवा मनुष्य देहाच्या लांबी इतक्या अंतरावर
खेचलेल्या चापाने
शस्त्रसज्ज होईल
आणि अवतीर्ण होईल

एक तारक म्हणून
अपराधित्वाच्या खिळवून ठेवणाऱ्या
पाशातून मुक्त करण्यासाठी,
जुने पुराणे हिशेब चुकवण्यासाठी
ह्या घराण्याचा उद्धार करण्यासाठी,
नामोहरम करीत त्या मारेकऱ्यांना
तलवारीच्या पात्याशी पाते
मुठीशी मूठ भिडवून.

इलेक्ट्रा: भूमीने वारुणीचे अर्घ्य प्राशन केले आहे.
पिताजींना आपली समर्पित द्रव्ये पोचली आहेत
पण थांबा काहीतरी नवल वर्तमान आहे
( अतिशय उत्तेजित होऊन ती ऑरेस्टीसच्या केसांची बट उचलते. )

सेविकावृंद : काय आहे ते?
भीतीने धडधडते आहे आमचे हृदय.

इलेक्ट्रा : एक केसांची बट
कापून काढून इथे समर्पण केलेली.

सेविकावृंद : कोणाचे आहेत केस?
पुरुषाचे? एखाद्या पूर्ण-विकसित युवतीचे?

इलेक्ट्रा : ओळखता नाही येत तुम्हाला?
बघा अगदी स्पष्ट आहे सारे!

सेविकावृंद : तुम्ही तरूण आहात
पण आम्ही पडलो वृद्ध.
कृपा करून समजावून सांगा आम्हाला.

इलेक्ट्रा : माझ्याशिवाय त्यांचा दुसरा कोणीही आप्त

अशा प्रकारची वस्तू अर्पण करणार नाही.

सेविकावृंद : आणखी एकीचे होते हे कर्तव्य
जिने त्याची हत्या केली तिचे.

इलेक्ट्रा : पण तरीही जरा बघा.
रंग, आकार, पोत – सर्व अगदी हुबेहूब.

सेविकावृंद : हुबेहूब कशासारखे?
काय म्हणायचे आहे तुला?

इलेक्ट्रा : आमच्यासारखे
आमच्या कुटुंबीयांसारखे
स्वतः माझ्यासारखे.

सेविकावृंद : पण
ही ऑरिस्टीसचे तर समर्पण नसेल?
गुपचुप तिथे आणून ठेवलेले?

इलेक्ट्रा : अगदी त्याच्या केसासारखे
आहेत हे केस.

सेविकावृंद : यायचा धीर तरी कसा झाला त्याला?

इलेक्ट्रा : आमच्या पित्याच्या शोकाप्रीत्यर्थ
समर्पण म्हणून
त्याने ही बट पाठवली असावी.

सेविकावृंद : पाठवली असावी?
म्हणजे ऑरिस्टीस आपल्या मायभूमीवर
पुन्हा पाऊल टाकण्याचे धाडस कधीच करणार नाही

असा का ह्याचा अर्थ आहे?
ह्यामुळे तर माझे अश्रू
जास्तच जोराने वाहू लागले आहेत.

इलेक्ट्रा : अश्रू? छे:!
कडवटपणाचा एक खवळलेला दर्याच
माझे हृदय विदीर्ण करून टाकीत आहे.
माझ्या काळजाला
जणू लोखंडाची जडता आली आहे.
जो बेबंद पूर इथे उसळतो आहे.
( हृदयावर हात ठेवते. )
त्यातले दोन तहानलेले थेंब
जे मी आवरू शकले नाही
ते ही केसांची प्रियतम बट पाहून
माझ्या डोळ्यांतून ओघळत आहेत.
अगदी अचूक ओळखले आहे मी!
या शासक राजाला साजेशा बटेवर
कोणत्याही शासित मस्तकाला
हक्क सांगता येणे शक्यच नाही.
त्या खुनी स्त्रीने तिच्या मस्तकावरून
नक्कीच कापून काढलेली नाही ही बट.
माझ्या मातेने
त्या देवांचे विडंबन करणारीने!
तरीपण ह्या समजुतीवर
मनापासून विश्वास ठेवणे
की ऑरिस्टीस
जो साऱ्या विश्वाहून मला प्रिय आहे
त्यानेच ही भेट आमच्या पिताजींना
पाठवली आहे.
छे! केवळ आशेला बळी पडून
मी मनाला गोड भुरळ पाडून घेत आहे.

## कोअीफोरी अथवा अर्घ्यधारिका

ही केसांची बट जर बोलू शकली असती
काही प्रेमळ निरोप तिने सांगितला असता
माझ्या भग्न हृदयाची अनिश्चितता संपवण्यासाठी आणि
क्लायटेमनेस्ट्राच्या तिरस्कृत मस्तकावरून
जर ही कापलेली असेल
तर स्पष्ट हुकूम दिला असता
धुळीत तिला तुडवायचा तर किती बरे झाले असते!
अथवा
जर ही माझ्या भावाची असेल
तर माझ्या दुःखद विधीमध्ये
ती सहभागी होईल,
ह्या समाधीला भूषवील
आणि ॲगमेमनॉनच्या नावाला सन्मानित करील.
देवांना आम्ही साद घालतो
कोणती वादळे आमच्या जीवनप्रवासात
उलथापालथ आणि घोर व्यथा उत्पन्न करतील
हे जाणण्यासाठी,
पण जर संकटातून सुटका भविष्यात
लिहीलेली असेल
तर चिमुकल्या बीजातूनही
मोठा वृक्ष निर्माण होण्याची शक्यता आहेच
पण बघा!
ह्या खुणा पाऊलांच्या खुणा आहेत ह्या!
पहिल्याला पूरक असा दुसरा पुरावा आहे हा
माझ्या पाऊलांसारखाच आकार आहे ह्यांचा! आणि ह्या पहा दुसऱ्या
(खुणा)
खुणांची जोड गोळीच आहे
त्याचे स्वतःचे आणि त्याच्या कुणा सोबत्याचे.
बघा! टाचा, स्नायू
अगदी स्पष्ट उमटलेल्या आहेत त्यांच्या रेषा
त्यांची मोजमापे एकच आकार दर्शवतात

तीच परिमाणे अगदी माझ्या सारखीच.
माझे हृदय वेदना होण्याइतके वेगाने
धडधडत आहे.
माझी विचारशक्ती हादरून जणू मृतवत्
झाली आहे.
( ऑरिस्टीस आणि पायलेडिस् पुढे येतात )

ऑरिस्टीस : जेव्हा तुम्ही देवांना
तुमच्या प्रार्थनांना प्रतिसाद देण्यासाठी विनवता
तेव्हा तुम्हाला यश मिळतेच
अशी ह्यापुढे तुमची प्रौढी असू दे.

इलेक्ट्रा : काय म्हणायचे आहे तुम्हाला?
सांप्रतच्या माझ्या कुठल्या यशासाठी
देवाची कृपा उपयोगी पडली आहे माझ्या?

ऑरिस्टीस : वर्षानुवर्षे केलेल्या प्रार्थनांचे फळ आता तुमच्या डोळ्यांसमोर आहे.

इलेक्ट्रा : तुम्हाला माझी गुपिते कळतात?
सांगा पाहू तर मग
कोणचे नाव माझ्या मनात होते?

ऑरिस्टीस : मला माहित आहे
की तुमचे मन एकाच विचाराने
ओतप्रोत भरले आहे ऑरिस्टीसचे नाव.

इलेक्ट्रा : बरं तर मग?
काय उत्तर मिळाले आहे माझ्यासाठी?

ऑरिस्टीस : हा काय मी इथे उभा आहे.
ह्याहून जवळचा आप्त शोधायला नको.

इलेक्ट्रा : मला फशी पाडण्यासाठी.
काहीतरी सापळा दिसतो आहे हा.

ऑरिस्टीस : जर तसे असेल
तर मी स्वतःलाच अडकवण्यासाठी
सापळा लावतो आहे म्हणाना.

इलेक्ट्रा : माझ्या दुःखाची थट्टा करणे
आवडते आहे तुम्हाला.

ऑरिस्टीस : आणि माझ्याही दुःखाची
तुझी आणि माझी दुःखे एकच आहेत.

इलेक्ट्रा : मग मी आता
तुला ऑरिस्टीस म्हणून हाक मारू का मी?
खरे आहे का हे सारे?

ऑरिस्टीस : मी प्रत्यक्ष पुढे दिसत असतांना
मला ओळखायला किती वेळ लागतो आहे तुला!
तरीसुद्धा
जेव्हा ही बट
पुत्राची भेट म्हणून ठेवलेली तू पाहिलीस
तेव्हा मात्र पंख फुटले जणू तुझ्या मनाला.
जणू माझा चेहराच तुझ्यापुढे उभा आहे
असे तुला वाटले.
माझ्या पावलांच्या खुणांचा तू मागोवा घेतलास
त्यांचा आकार तुझ्या पावलांशी जुळतांना पाहिलास
आणि आपला भाऊ म्हणून ओळखलेस तू मला.
धर ही बट माझ्या मस्तकाशी
या इथे - जियून कापली गेली तिथे
किंवा हे इथले कापड बघ

तुझ्या हाताने, तुझ्या मागावर विणलेले.
बघ - तुझे शिकारीचे दृश्य आहे ते!
(इलेक्ट्रा खात्री होऊन ऑरिस्टीसकडे हर्षाने
पहाते. तो सावधगिरीची सूचना देण्यासाठी
तिचा हात पकडतो.)
हां शांत रहा. सावधान!
ह्या आनंदामुळे तुझी सावधगिरी
नष्ट होता कामा नये.
मला ठाऊक आहे की
आपले सर्वात जवळचे आप्तच
आपले मोठ्यात मोठे शत्रू आहेत.

सेविकावृंद : प्रिय राजपुत्रा,
तुझ्या पित्याच्या गृहीच्या अनमोल ठेव्या
मुक्तीची चालतीबोलती आशाच आहेस तू!
आमच्या अश्रूंनी आम्ही
सिंचन केले त्या आशेचे.
आता मोठ्या दृढनिश्चयाने
तुझ्या पित्याचा वारस म्हणून
तुझा हक्क जिंकून घेतला पाहिजेस तू.

इलेक्ट्रा : हे प्रिय, प्रियतम मुख!
तुझ्यामध्ये माझी चार सुखे एकवटली आहेत.
कारण तुलाच आता पिता म्हटले पाहिजे मी.
मातेवर मुलीने करायची सारी माया सुद्धा
आता तुझ्याच वाट्याला येणार आहे
कारण मी आता माझ्या मातेचा द्वेष करते
आणि न्याय्यच आहे ते.
क्रूरपणाने मारली गेलेली माझी बहीण इफिजेनिया
तिच्या वाट्याच्या प्रेमाचा भागही
मी तुलाच देते

आणि शेवटी
तू माझा निष्ठावंत बंधू आहेस
केवळ तुझ्या नावानेच
माझ्या जीवनाला अपमानापासून तारले आहे
विजय, न्याय आणि सर्वश्रेष्ठ झ्यूस
तुझ्या बाजूने उभे राहोत!

ऑरेस्टीस : झ्यूस! हे झ्यूसदेवा!
आमच्यावर आणि आम्ही योजीत असलेल्या कार्यावर
कृपादृष्टी ठेव.
गरूडाची पिल्ले पोरकी झाली आहेत
हे लक्षात घे.
क्रूर सापाच्या विळख्यात मृत्यूच्या सापळ्यात सापडून
गरूड मारला गेला आहे.
पहा, त्यांच्या कृश अशा अगतिकतेला क्षुधा कशी गांजते आहे.
बिचाऱ्यांच्या पंखात अजून
पुरी शक्ती आलेली नाही.
तरी आपल्या पित्याच्या मालमत्तेचा वारसाहक्क मागण्याचे
धैर्य दाखवीत आहेत ती
तरीपण असे असतानाही
हे झ्यूसदेवा, पोरक्या आणि हद्दपार झालेल्या
अशा आम्हां दोघांकडे
इलेक्ट्राकडे आणि मजकडे
आता कृपादृष्टीने बघ.
आमच्या पिताश्रींनी प्रार्थनेने
आणि अगणित प्रदानांनी
तुझे पूजन केले
तू जर आम्हाला प्राणाला मुकायची वेळ आणलीस
तर यज्ञयागात इतका सढळ असलेला
दुसरा हात तुला कोठे मिळेल?
गरूडाचा वंश एकदा नष्ट तर होऊ दे

मग मानवी डोळ्यांसमोर तुझ्या अगम्य गूढ, अचूक सामर्थ्याची ग्वाही देणारी
ढळढळीत चित्रे रेखाटणारे असे तुझे दूत तुला कुठे उपलब्ध होतील?
तुझ्या कोपाने जर
हा राजवंश उध्वस्त झाला
तर मग कोणता सश्रद्ध हात तुझ्या पूजास्थानांना
अर्घ्यप्रदानांनी भूषवील?
म्हणून म्हणतो वाचव आमचा वंश
आत्यंतिक बलहीनतेतून बळाची उभारणी कर
धडम्यातून यशाची प्रभा फाकू दे.

सेविकावृंद : मुलांनो,
पित्याच्या गृहाच्या तारकांनो,
हळू बोला रे!
कोणी ऐकेल आडून
आणि केवळ जीभ चालवण्याची आवड म्हणून
आपल्या शास्त्यांकडे जाऊन बडबडेल!
देव करो आणि मला ते
मृतावस्थेत दिसोत आतातरी
आणि त्यांचे मांस
रटरटणाऱ्या डांबरात आणि
ज्वालांत नष्ट होतांना पाहू दे मला.

ऑरिस्टीस : ॲपोलोचा शब्द सर्वशक्तिमान आहे.
तो कधीच अयशस्वी होणार नाही
त्याचा आवाज
निकड लावणारा, आग्रही
ह्या धोक्याच्या धाडसाला सामोरे जाण्यास
मला जबरदस्तीने प्रवृत्त करीत आहे.
जर मी 'जशास तसे' असा योग्य सूड
माझ्या पित्याच्या मारेकऱ्यांवर

## कोऑफोरी अथवा अर्घ्यधारिका

घेण्यात अयशस्वी झालो तर
माझ्यावर कुठली भयंकर अरिष्टे कोसळण्याचा संभव आहे
याची यादी उच्चारून माझ्या काळजातले गरम रक्त
गोठवून टाकले देवाने.
अशी दिली देवाने आज्ञा,
"रक्ताचा बदला रक्ताने घे.
तुझा चेहरा गारगोटीसारखा कणखर असू दे.
कितीही संपत्ती ज्याची तुला करू शकणार नाही
अशी किंमत त्यांना चुकती करायची आहे."
अवज्ञेची किंमत
अव्याहत वेदनांनी होणाऱ्या
माझ्या जीवनाच्या अखेरीने मोजावी लागेल मला
असे म्हणाला तो देव
प्रथम पृथ्वीच्या अधिष्ठात्र्या शक्तींचा
राग शांत करण्यासाठी
मानवाने काय गोष्टी केल्या पाहिजेत
ते त्याने उघड करून दाखवले मग -
जर असा राग उफाळत राहिला
तर कोणते उत्पात होतात तेही सांगितले
एक झपाट्याने पसरणारी व्याधी
आपल्या जहरी दातांनी
मानवी आकार नष्ट होईपर्यन्त
त्यांचे मांस कुरतडत राहील.
मग त्या व्याधीवर फुलेल रागट पांढरा बुरा पण,
तो पुढे म्हणाला, जेव्हा एका पित्याचे सांडलेले रक्त
त्याचा बदला घेतला न जाता पडून राहते
आणि मग योग्य काळाची घटका भरते
तेव्हा तो कर्तव्यच्युत पुत्र
ह्याहूनही जास्त भयंकर दृश्ये पहातो
अंधारात निरखून, ताणून पहाणाऱ्या
डोळ्यांपुढे दिसतात.

हल्ला करणाऱ्या सूडदेवता -
वंशपरंपरागत रक्तपातापराधाने खवळलेल्या
हाती आयुधे घेतलेल्या -
तमोमय शरांची, मायेफिरूपणाची,
मिथ्या, भयानक निशास्वप्नांची
या शस्त्रांनी त्या त्याला छळतात, पीडतात, सतावतात
त्याला निर्दय आसुडांनी फटकारून
किळसवाण्या, केविलवाण्या, गलिच्छ अवस्थेत
त्याच्या नगरीतून हुसकावून लावतात
भोजनोत्सव आणि मद्यसेवन
अर्घ्यप्रदानाचा मान -
यात सहभागी होऊ शकणार नाही तो यापुढे.
असे वदली होती देववाणी.
त्याच्या पित्याचा अदृश्य प्रकोप
प्रत्येक पूजास्थानापासून वंचित करतो त्याला.
कोणीही स्वागत करता कामा नये त्याचे स्वगृही
त्याच्या संगतीत वसती करता कामा नये कुठेही
तिरस्कृत, मित्रहीन आणि एकाकी असा तो
अखेरीस एकाद्या सुरकुतलेल्या फोलपटासारखा
पडून रहातो, मृत्यू कडून अंतिम संस्करण झालेला.
अशा दैवीवाणीवर विश्वास ठेवावा का मी?
अथवा का नाही (ठेवू?)
जरी मी त्यांच्यावर विश्वास ठेवू शकत नसलो तरीही
मला हे कार्य केलेच पाहिजे.
त्या एका उद्दिष्टाकडे
पुष्कळ कारणे माझी इच्छाशक्ती
खेचून नेत आहेत.
देवाची आज्ञा, पित्याविषयीचा शोक
आणि ह्याबरोबरच माझा हरपलेला, पित्याकडून मिळणारा
वारसा
आणि माझे स्वाभिमानी नागरीक

ट्रॉय जिंकण्यात त्यांनी दाखवलेल्या धैर्यामुळे
सर्व क्षेत्रात जे कीर्तीमंत झाले आहेत
ते आज एका स्त्रीचे
नव्हे दोन स्त्रियांचे
याप्रमाणे गुलाम बनून जीवन कंठीत
राहिले आहेत
हयाची शरम!
इजिस्थस! पुरूष असो वा स्त्री
तो आता त्याचा धडा शिकल्यावाचून
रहाणार नाही.
(ऑरिस्टीस आणि इलेक्ट्रा समाधीच्या दोन्हीं बाजूस उभे रहातात आणि सेविका वृंदासह रूद्ध शोकगान आणि ॲगमेमनॉनच्या आत्म्याचे आवाहन सुरू करतात)

सेविकावृंद : हे सर्वशक्तीमान नियती देवतांनो
ऐका आता!
आमची प्रार्थना स्वीकारा
आणि आमचा पिता जो झ्यूसदेव
त्याच्या हाती करवा
त्या उद्दिष्टाचे साफल्य
ज्याची आमची अत्युत्कट आशा
प्रतीक्षा करते आहे
आणि आमचा न्याय्य पक्ष
ज्याची हक्काने मागणी करतो आहे.
न्याय आपले ऋण जबरीने वसूल करतो
न्यायदेवतेचा आवाज उच्चस्वराने म्हणतो,
शब्दाला शब्दानेच उत्तर मिळो
द्वेषाला प्रतिसाद द्वेषाचाच मिळो
घातक असा वार
हत्या करणाऱ्या वाराशी गाठ घालो
कारण पापाचे योग्य बक्षिस

मृत्यू हेच आहे.
गर्वाचे बक्षिस, लगाम घालून घेणे हेच आहे.
तीन युगांचा पुराणा दंडक
माणसाला सांगतो आहे
की हे असेच घडले पाहिजे.

ऑरिस्टीस : आम्ही दुःखेच तुमच्यापोटी
जन्मलो - पिताजी
हाय! एका ध्रुवापासून दुसरा ध्रुव
जितका लांब आहे
तितका तुमच्यापासून दूर
फेकला गेलो आहे मी.
तरीही एकाद्या प्रेमळ शब्दाने किंवा
समयोचित कृतीने
तुमच्या आत्म्याला एकादी तरी सुखद झुळुक
पोचवू शकेन का मी?
ज्या अंधाऱ्या शय्येवर अनंतकाळपर्यन्त
तुम्ही खिळून रहाणार आहा
तिथे पोचवू शकेन का मी एकादी तरी
प्रकाशरेषा
तुम्हाला दिलासा द्यायला?
आणि जेव्हा
ॲट्रियसचे शेवटचे वंशज असलेली
तुमची याचक मुले
त्यांनी तुमच्यासाठी करायलाच हवे असे गुणगान
आणि स्नेहजन्य शोकालाप सादर करतील
तेव्हा तुम्ही - मृत असलात तरी -
त्यांनी अर्पिलेले लक्षात घेऊ शकाल का?
आणि जाणून घेऊ शकाल का त्यांचे सच्चे प्रेम?

सेविकावृंद : वत्सा,

अग्नीच्या प्रक्षुब्ध जबड्यातही
मृत माणसाचा आत्मा
नरम पडत नाही
त्याचा क्रोध अधिकाधिक चढतच रहातो.
खुनी उजेडात आणला जातो
मग जेव्हा ज्वलंत भक्तीने
अपत्याच्या अश्रूंतील भावनावेगाने
पित्याचे नाव उच्चारले जाते
तेव्हा ते शोकाचे शब्द आणि ती शोकाची कृती
दोन्हीही न्यायाचीच तामिली करतात
अपराधी व्यक्तीचा भेदक धमक्यांनी पाठपुरावा करतात.
डाव्याउजव्या बाजूंनी त्याला हैराण करून सोडतात.

**इलेक्ट्रा :** तर मग पिताजी
पाळीपाळीने गायिलेले आमचे अश्रूंचे गाणे ऐका
आमच्याकडे पहा - तुमचे प्रत्येक मूल
तुमच्या समाधीला जाग आणण्यासाठी
आमचे दुःख आक्रोशून सांगत आहे
आम्हा दोघांवर झालेल्या दुहेरी अन्यायाने
ह्या पृथ्वीवरचा भार दुप्पट झाला आहे
आम्ही दोघेही याचक, दोघेही निर्वासित,
असे एकतरी सत्तत्व आहे का
की जे विश्वव्यापी यातनांपुढे व्यर्थ ठरले नाही?
आमच्या दुर्दैवाशी लढा देण्याची
कोणती आशा आहे आम्हाला?

**सेविकावृंद :** पण तरीही
ह्या विवळणाऱ्या व्यथांतून
स्वर्गस्थ शक्तीची इच्छा असेल तर
उठतील आशांचे अधिक सुंदर सूर.
आमच्या समाधीजवळील शोकगीतांची जागा

अजूनही विजयगीते घेतील.
शाही भोजनगृहात राजाच्या वारसाचे स्वगृही
स्वागत करण्यासाठी
आणि त्याचे आरोग्यचिंतन करण्यासाठी
वारुणीचे पाट पहातील.

ऑरिस्टीस : पिताजी, ट्रॉयच्या तटांखाली
लिसियाच्या एखाद्या भालाईताच्या किंवा
खड्गधराच्या घावाने जखमी होऊन
जर तुम्ही मृत्यू पावला असतात
तर किती बरे झाले असते!
मग तुमचे घराणे संपन्नतेची लेणी
ल्यायले असते.
तुमच्या यशाची प्रौढी मिरवीत राहीले असते
आरगॉसच्या मार्गांवर
सर्व नजरा तुमच्या मुलांचा सन्मान करत्या
आणि त्या परदेशीय किनाऱ्यावर
अगणित हातांनी सन्मानाने उभारलेली
तुमची समाधी
आपल्या भव्य उच्चतेने
दूर अंतरावरून डोळ्यात भरली असती
तिची भव्य उंची
आणि प्राप्त कीर्तीने हलका झाला असता
तुम्ही गेल्याचा खेद
पण आता मात्र तुमच्या मृत्यूचे लांछन
कर्मबंधाला सलते आहे.

सेविकावृंद : मग पाताळलोकीच्या उदासीन अंधःकारात उगवलेल्या
एकाद्या नव्या ताऱ्याप्रमाणे,
वीरमरण पत्करलेल्यांनी
मित्र म्हणून तुमचे स्वागत केल्यावर

तुम्ही राज्य करायला हवे होते.
राजांनी सन्मानलेला राजा
पृथ्वीतळातील विस्तीर्ण प्रदेशांवर
अधिराज्य गाजवणाऱ्या सिंहासनाच्या अगदी
निकट असलेला.
कारण तुमच्या शब्दापुढे एके काळी
झुकत होते राजे.
ज्यांच्या हाती कृपेची
अगर विनाशाची सत्ता होती.
ज्यांच्या राजदंडाचा अवमान करण्याची
हिंमत नव्हती कुणाची.

**इलेक्ट्रा :** कशाला अशी इच्छा करायची?
स्कॅमॉन्डरशेजारी का करावी आमच्या पित्याने अक्षयनिद्रा?
ट्रॉयच्या तटांखाली जीव गमावण्यासाठीच जणू जे गेले
त्यांच्या मृतदेहांवरील अगणित मृत्तिका राशीतील
एक दयनीय राशी होऊन का रहावे त्याने?
त्याऐवजी त्या खुन्यांचाच,
निसर्ग नियमांना अनुसरून
त्यांच्या अखेरच्या घातक कृतीअगोदरच
एखाद्या सहज घटनेने शेवट का नाही होऊ शकला?
आणि मग शोकाच्या व्याकूळतेपासून बचावून
आम्ही लांबूनच ऐकले असते
त्यांच्या मृत्यूचे वृत्त?

**सेविकावृंद :** अगदी सोन्याच्या मोलाची इच्छा,
पण मुली, मृत्यूत ज्याची अखेरी आहे
असे जीवन कंठणाऱ्या मर्त्यांना
एवढे मोठे वरदान अमर देव
देऊ शकणार नाहीत!
बाकी नुसता विचार मनांत घोळवण्याचे स्वातंत्र्य

आपल्याला आहेच म्हणा!
आणि तरीही —
धीर सोडू नका, मुलांनो!
तुमच्या एकमेकांवर आपटून प्रतिध्वनी
उत्पन्न करणाऱ्या हातांचे दुहेरी गीत
आपल्या जादूचा प्रभाव पाडीत आहे
पृथ्वीच्या शक्ती
तुमच्या उद्दिष्टपूर्तीसाठी शस्त्रसज्ज होत आहेत.
त्या तिरस्कृत जुलमी खलावर
शाबीत झाला आहे अपराध विधीभंगाचा
अपत्ये त्यांच्या ऋणांची परतफेड हक्काने मागत आहेत
आणि उच्च स्वरांत म्हणत आहेत
"लढा शेवटी आमच्या बाजूलाच कौल देणार आहे."

ऑरिस्टीस : पृथ्वीतळाच्या झ्यूस!
हे झ्यूसदेवा, उशीरा का होईना,
पण पाताळलोकाच्या विवरातून
बेदरकार अपकृत्ये करणाऱ्यांसाठी
कडक सूड पाठवणाऱ्या देवा,
आमच्या आक्रोशाने
त्याचा प्रभाव पाडला आहे का?
पृथ्वीच्या अदृष्ट हृदयाला
एखाद्या बाणाप्रमाणे भेदले आहे का त्याने
एका गोष्टीपासून तत्सम गोष्ट
उत्पन्न होईल का?
जसा पित्यापासून पुत्र?
आणि दुष्कृत्यापासून वाजवी सूड?

सेविकावृंद : येवो तो क्षण
जेव्हा हत्या झालेली पत्नी
आणि तिचा पार कोसळलेला सहचर

ह्यांच्याजवळ (उभी राहून)
मी विजयी, विधीयुक्त आवाज उठवीन,
जर माझ्या विचारांना पंख देणारी आशा
स्वर्गस्थ शक्तींनी पाठवलेली असेल
आणि ती उठवणार असेल
बेबंद आणि उधाण आलेले एक वादळ
सूडाचा निर्धार केलेल्या तीव्र भावनेचे
तर माझ्या हृदयात मुक्त संचार करणारा द्वेष
का लपवावा मी?

इलेक्ट्रा : एका नवीनच आशंकेने कापते आहे मी
त्यांची गुन्हेगार मस्तके छिन्नभिन्न करण्यास
खचितच झ्यूसचा हात
वहाणार नाही?
कारण पिता व माता ह्यांचे अधिकार
त्याच्याच छत्राखाली असतात ना?
किती छान होईल जर झ्यूस वार करील
व त्याचा निर्णय
सर्वांपुढे उघड करील तर!
ध्यान द्या माझ्या शब्दांकडे
पृथ्वीच्या आणि निशेच्या शक्तींनो
असत्य मागे हटून सत्याला जागा करून देवो
हीच आहे माझी एकमेव न्याय्य याचना.

सेविकावृंद : धीर धरा!
देवांचाच असा संकेत आहे
की हत्येने सांडलेले रक्त
भूमीतून आक्रोशून मागणी करते
पुन्हा रक्त वहावण्याची.
मृतांनी त्वेषाने धाडलेल्या सूडदेवता
आरोळ्या मारतात विनाशासाठी.

वेदनेची प्रतिक्रिया वेदनाच,
विनाश आपल्या मागोमाग आणतो
आणखी एक नवा सर्वनाश.

ॲरिस्टीस : अधोलोकीच्या राजसत्तांनो
केव्हा ध्यान जाईल तुमचे आमच्याकडे?
मृतांच्या तीव्र शापांनो,
बघा आमची अवहेलना
ॲट्रियसच्या वंशाचे अखेरचे अवशेष
बघा कसे निर्वासित, बहिष्कृत, आणि
निराधार झाले आहेत.
झ्यूसदेवा, कुठे जावे रे आता आम्ही?

सेविकावृंद : निराशेने विषण्ण झालेला तुमचा आवाज ऐकून
माझे स्वत:चे हृदय
धपापते आशंकेने
आणि प्रत्येक शब्दांसरशी
उत्पन्न होणारी
नवनवी भीती
आशेवर काजळी आणते
पण जेव्हा आत्मविश्वासाचा प्रकाश
पुन्हा स्पष्ट झळकू लागतो
तेव्हा तुमच्या धैर्याने
माझ्या वेदना निपटून निघतात
आणि मग पुन्हा सर्व काही उज्ज्वल आणि
सुभग दिसू लागते.

इलेक्ट्रा : संतापलेल्या मृतांना डिवचण्यासाठी
आता काय बोलावे आम्ही?
आमच्या मातेने जे अन्याय
आम्हाला भोगायला लावले

त्यांच्याशिवाय दुसरे काय बोलणार आम्ही?
आता आमच्यावर प्रेमाचा वर्षाव करो ती
पण तिने सावध रहावे हे बरे!
कारण असे अन्याय
सारवासारव करून नाहीसे करता येत नाहीत.
त्या लांडगीने जन्म दिलेली हिंस्त्र पिले
तिच्यासारखीच आहेत.
त्यांच्याशी लडिवाळपणा करण्याची
कोणाची छाती असेल
तर करावा तो त्याने!

सेविकावृंद : पौर्वात्य देशांतील शोकग्रस्तांप्रमाणे
छाती आणि डोके बडवून घेत
एखाद्या पर्शियातील आक्रंदणाऱ्या स्त्रीप्रमाणे
जेव्हा तो मरून पडला तेव्हा
अॅगमेमनॉनसाठी शोक केला मी
मग ओरबाडण्यासाठी आवळलेल्या बोटांनी
आणि जोर येण्यासाठी
ताणलेल्या बाहूंनी एकापाठोपाठ घाव पडले
आणि दुखापत झालेले माझे दयनीय मस्तक
जोराच्या आघातांनी निनादत राहिले.

इलेक्ट्रा : हाय!
क्रूर आणि गारगोटीसारख्या कठीण हृदयाच्या माते!
गारगोटीसारख्या कठीण कबरीतच
पोचवलेस तू त्यांना.
एक राजा होता तो
पण त्याला शोकमग्न रस्त्यांतून
जमावाबरोबर मिरवत जाण्याचे भाग्य लाभले नाही.
एक पती होता तो -
पण मानसन्मान न लाभता

कोणी अश्रू ढाळल्याशिवाय
निर्घृण मृत्यूशय्येवर पडावे लागले त्याला.

ऑरिस्टीस : हा प्रगाढ अपमान
केवळ राजाचा आणि पतीचा झाला नाही
तर एक पिताही अपमानित झाला
आणि स्वर्गस्थांच्या कृपेने
आणि माझ्या स्वतःच्या हातांच्या कृतीने
तिला ह्याचीही किंमत चुकवावी लागेल
आणि जेव्हा तिच्या आयुष्याची अखेर होईल
तेव्हा माझेही जीवन वाऱ्यावर विरून जाऊ दे.

सेविकावृंद : आणि ही आणखी एक गोष्टही
तुम्हाला माहित व्हायला हवी.
त्यांचे शरीर छिन्नविछिन्न केले गेले होते
आणि जिने त्यांचे
अशा स्थितीत दफन केले
ते मुद्दामच काही हेतूपूर्वकच
त्यांचे सांडलेले रक्त म्हणजे एक ओझे व्हावे
तुमचे जीवन वाकवायला
आणि त्यांचा इतका द्वेष केला गेला
आणि त्यांचे दफन इतक्या लाजिरवाण्या तऱ्हेने झाले
ह्या कल्पनेखाली तुमच्या जिवाचा चेंदामेंदा
व्हावा हा होता तिचा हेतू.

इलेक्ट्रा : आणि अशा तऱ्हेने झाला
माझ्या पित्याचा मृत्यू
आणि मी तिरस्कृत, नकोशी झालेली,
एका बाजूला ढकललेली
आणि लूत लागलेल्या कुत्र्यासारखी
सर्वांनी अव्हेरलेली

अश्रू ढाळते आहे हास्यासारखे मुबलक, स्वैर-
आणि हुंदके देते आहे दृष्टीआड सर्वांच्या
हे तुमच्या हृदयावर कोरलेले असू दे
जेव्हा तुम्हाला दुःख म्हणजे काय ते ऐकण्याची वेळ येईल.

सेविकावृंद : आम्ही तुम्हाला ज्या भयानक गोष्टी सांगितल्या
त्या थेट तुमच्या हृदयापर्यन्त पोचू देत
एका भेदक, स्पष्ट आरोळीने,
आणि तुम्हाला दृढ आणि स्थिर निश्चयाशी
जखडून ठेवू देत.
जे घडून गेले ते कोणी मानव
बदलू शकत नाही.
नियतीने जे अजून गुप्त ठेवले आहे
ते प्रत्यक्षात आणण्यासाठी तुमची हिंमत तापून उठू दे.
कारण तुमचा हक्क कोणीही
नाकारू शकत नाही -
जर न डगमगणाऱ्या शक्तीनिशी
तुम्ही लढायला उभे राहिलात तर.

ऑरेस्टीस : पिताजी,
माझ्या पाठीशी उभे रहा
तुमचा पुत्र तुम्हाला साद घालतो आहे.

इलेक्ट्रा : त्याच्याच शब्दांचा
प्रतिध्वनी उठवते आहे मी
जे कधीही सुकत नाहीत असे अश्रू ढाळीत!

सेविकावृंद : त्याचे उच्चस्वरातले आवाहन
आम्ही सर्वजणी एकवटलेल्या आवाजात
पुन्हा उच्चरीत आहोत.
लक्षात घ्या आमचे शब्द

वर सूर्यप्रकाशात या
आणि आमच्या बाजूने शत्रूंना तोंड द्यायला उभे रहा!

ॲरिस्टीस : जर तलवारी वापरल्या जाणार असतील
तर तलवारींचा ईश आमच्यासाठी वार
करील.
जर न्यायनिवाडा होणार असेल
तर प्रत्यक्ष न्यायदेवता आमची बाजू मांडील.

इलेक्ट्रा : हे देवांनो ऐका,
पोचू देत तुमच्यापर्यन्त आमचे शब्द
आणि सत्याला धरून आमच्या पक्षाला
न्याय द्या.

सेविकावृंद : मी ऐकते आहे तुमच्या प्रार्थना
आणि थरकाप होतो आहे माझा
नियत अशा अखेरीने फार वेळ लावला आहे
पण प्रार्थनेने ती खचितच साध्य होणार आहे.

ॲरिस्टीस : हाय रे ! आमच्या घराण्यावरील शाप!
हत्येचे भूत!
कलहात केलेले वार आणि अनैसर्गिक रक्तपात!

इलेक्ट्रा : घृणास्पद यातना! असह्य दुःख!

सर्व : हाय! केव्हा संपेल हा कर्मभोग?

ॲरिस्टीस : आमच्या वंशाचे रक्त वहावणाऱ्या
ह्या जखमेतले रक्त थांबवण्याला
दुसरा मार्गच नाही याशिवाय
बाहेरचे कोणीही मदत करू शकणार नाही

आपण स्वत:च आपल्या व्याधीवर
उपचार केला पाहिजे -

इलेक्ट्रा : कारण
रक्ताला रक्तानेच आणि अन्यायाला अन्यायानेच
टक्कर दिली पाहिजे.

सर्व : आमची प्रार्थना संपली आहे.
अपोलोकीच्या शक्ती
आमच्या गीतांचा स्वीकार करोत.

सेविकावृंद : पृथ्वीच्या वातावरणातील देवहो
आम्ही ज्यासाठी प्रार्थना करीत आहोत
ते सारे आम्हाला द्या.
शक्तीवानांच्या विरूद्ध दुर्बळांना सहाय्य करा.
आमच्या आशांकडे सानुग्रह प्रसन्न दृष्टी टाका
आणि आमच्या कृतीला
पूर्ण यशाचे वरदान द्या.

ऑरिस्टीस : माझा राजा, माझ्या पित्या
कोणत्याही राजाच्या वाट्याला येऊ नये
अशा मरणाने मृत झाला तुम्ही
द्या मला - तुमची प्रार्थना करतो मी
हे राज्य आणि हे सिंहासन
जे हक्काने तुमचेच होते.

इलेक्ट्रा : माझ्या दुरावस्थेकडे बघा
माझ्या गरजेकडे पहा
"इजिस्थसला विकून टाकलेली"
ह्या प्रवादापासून माझा बचाव करा.

ॲरिस्टीस : आम्हाला वाचवा
आणि मग उचित ते सर्व नैमित्तिक व्रतोत्सव
तुमच्यासाठी प्रस्थापित केले जातील
नाहीतर –
जेव्हा मेष व सा
सर्व वेदीवर अग्नीत समर्पिली जाते
तेव्हा तुम्ही तेवढे हविर्भागाला पारखे व्हाल.

इलेक्ट्रा : आणि मी माझ्या लग्नदिवशी
माझ्या विपुल कन्याधनातून
आमच्या वंशपरंपरा निधीतून
तुम्हाला अर्घ्ये अर्पण करीन
आणि ह्या समाधीला सर्वोच्च मान देईन.

ॲरिस्टीस : हे पृथ्वीमाते
माझ्या तलवारीला मार्गदर्शन करण्यासाठी
माझ्या पित्याला माझ्याकडे पाठव.

इलेक्ट्रा : हे राज्ञी पर्सीफोनी,
उज्वल जय आमच्या वाट्याला येऊ दे.

ॲरिस्टीस : आठवा, पिताजी,
तुमच्या रक्ताने माखलेले
स्नानाचे पवित्र पात्र.

इलेक्ट्रा : आठवा तो झगा,
तुमचे हातपाय बांधण्यासाठी
त्यांनी वापरलेले ते जाळे.

ॲरिस्टीस : सापळा
लोखंडाचा नव्हे तर धाग्यांचा

त्याने तुम्हाला आपले भक्ष्य बनवले,
पिताजी.

**इलेक्ट्रा :** लाजिरवाण्या फसवेगिरीचा
झगा चढवला त्यांनी तुमच्यावर
तुम्हाला कायमचे लांछन लावणारा -

**ऑरिस्टीस :** तुम्हाला कमीपणा आणणारी
ही कथा ऐकून
तुमच्या भावना चेतवल्या गेल्या नाहीत का पिताजी?

**इलेक्ट्रा :** प्रियतम पिताजी,
आमची सुटका करण्यासाठी
तुम्ही जागृत होणार नाही का?

**ऑरिस्टीस :** ज्यांनी तुमचा पराभव केला
त्यांचा पराभव करण्याची
तुम्हाला आतूरता नाही वाटत?
तर मग आमच्या निष्ठावंत कार्याला बळ द्यायला
न्यायदेवतांना तरी पाठवा
अथवा त्यांच्या इतकी त्वेषपूर्ण पकड घेऊन
आम्हाला झुंजू द्या, आपल्यापरीने.

**इलेक्ट्रा :** पण तरीही पिताजी
हा शेवटचा आक्रोश ऐकाच,
इथे तुमच्या समाधीजवळ बसलेल्या आमच्याकडे पहा.
तुमच्या रक्तामांसाच्या जीवांवर दया करा.
एक पुरुष आणि एक स्त्री
ज्या दोघांकरवीच फक्त -

**ऑरिस्टीस :** पुढे चालू रहाणार आहे तुमचा वंश.

पेलॉप्सचे बीज आहोत आम्ही.
आम्हाला नष्ट होण्याची वेळ आणू नका.
तुम्ही मृत आहात आणि तरीही मृत आहात असे म्हणता येणार नाही.
कारण आमच्या रूपाने जिवंत राहू शकता तुम्ही.

इलेक्ट्रा : मृत माणसाचे नाव आणि कीर्ती
त्याची मुलेच जिवंत ठेवतात.
कोळ्याचे जाळे तरंगत ठेवणाऱ्या
बुचांसारखी असतात ती
त्याचे गाठी मारलेले धागे समुद्राच्या तळापर्यन्त
बुडण्यापासून वाचवतात ती.

ऑरेस्टीस : आमच्या साऱ्या विनवण्या
तुमच्यासाठीच आहेत
ऐका तर मग त्या
आणि स्वतःचा बचाव करा.

सेविकावृंद : या! चला!
सारे कर्तव्य पूर्ण करण्यासाठी
पुष्कळसे बोलला आहात तुम्ही
कठोर दैवाने शोकगीतांपासून वंचित केलेली समाधी
सन्मानिली आहे तुम्ही.
पण आता,
ज्याअर्थी तुमचा कार्य सुरू करण्याचा
निर्धार झालेला आहे
त्या अर्थी आता वेळ गमावू नका.
त्वरित कामाला लागा.
आणि ईश्वराची कृपा तुम्हावर आहे
हे सिद्ध करून दाखवा.

ऑरेस्टीस : तसेच करतो मी

आणि तरीही
जे मी विचारतो आहे ते जर
वेळकाढूपणाचे किंवा बाष्कळ नसेल
तर मला सांगा
कशासाठी ही अर्घ्यप्रदाने
इकडे पाठवली तिने?
ज्या अन्यायाचे परिमार्जन
कितीही खटपट केली तरी आता होणार नाही
त्याबद्दल टोचणी लागल्याचे
इतक्या कालावधीनंतर का दाखवावे तिने?
का तिला वाटते की
त्या मृताला काही साक्षेपी बुद्धीच नाही
म्हणून इतके क्षुद्र विलोभन पाठवले तिने?
अशक्य!
पण तरीही -
एवढ्या मोठ्या गुन्ह्यासाठी
एवढीशी भेट?
अहो! जरी एकाद्या माणसाने
अगदी शेवटच्या कणापर्यन्त
आपली दौलत खर्चिली तरीही
असे म्हणतात की
एका खुनाचे प्रायश्चित करण्यास
ती पुरी पडत नाही
आणि त्याचे ते श्रम व्यर्थच जातात.
जर शक्य असले
तर तिने हे का केले ते सांगा
मला समजायला हवे आहे.

सेविकावृंद : मी सांगू शकेन, मुला,
मी होतेच तिथे.
स्वप्ने, रात्री संचार करणाऱ्या भयप्रदगोष्टी

हयांनी घाबरली ती पाखंडी स्त्री,
आणि त्यांनीच भाग पाडले तिला,
हया देणग्या पाठवण्याला.

ॲरिस्टीस : ते स्वप्न काय होते
ते विचारलेत का तुम्ही?
स्पष्टपणे वर्णन करता येईल का तुम्हाला त्याचे?

सेविकावृंद : तिने स्वतःच सांगितले सारे आम्हाला
तिला स्वप्न पडले की तिने एका सर्पाला जन्म दिला;

ॲरिस्टीस : मग पुढे काय झाले?
का एवढ्यातच संपले स्वप्न?
त्याचे मर्म काय ते सांगा मला.

सेविकावृंद : तिने शालीमध्ये
गुरफटून घेतले त्याला,
आणि तान्हया अर्भकासारखे
जोजवून निजवले,

ॲरिस्टीस : खचितच हया नकजात राक्षसाला
अन्नही लागले असेल,
कोणते अन्न दिले त्याला?

सेविकावृंद : तिच्या स्वप्नात
तिने स्वतःच स्तनपान दिले त्याला.

ॲरिस्टीस : त्याच्या किळसवाण्या विषारी दातांनी
नक्कीच स्तनाग्र जखमी झाले असणार तिचे?

सेविकावृंद : हो ना.

त्या प्राण्याने तिच्या दुधाबरोबर
रक्ताच्या गुठळ्या पण खेचून घेतल्या.

ऑरेस्टीस : नक्कीच हे स्वप्न
कुणाकडून तरी पाठवले गेले होते.
तिचा पती, अँगमेमनॉन याजकडून आले
असणार ते.

सेविकावृंद : ती मोठ्याने किंचाळली झोपेत
आणि थरथर कापत जागी झाली
आणि रात्र पडल्यामुळे बारीक केलेले
राजवाड्यातले अनेक दिवे
तिला धीर देण्यासाठी मोठे करण्यात आले.
तावडतोब अर्घ्यप्रदाने धाडली तिने.
विषाचा त्याच्या उगमापाशीच निचरा करण्यासाठी.

ऑरेस्टीस : मी प्रार्थितो तर मग
माझ्या पित्याच्या अस्थी जपणाऱ्या ह्या पृथ्वीला
की त्या स्वप्नाचा अर्थ
मी सांगतो त्या प्रमाणे
माझ्याकरवीच फलद्रूप होवो
मी जसजसा अर्थ लावतो आहे
एकेक मुद्दा घेऊन
तसतसा तो जमत जातो आहे बरोबर
ऐका. प्रथम म्हणजे
जर मी जन्माला आलो तिथूनच ह्या
सर्पाने जन्म घेतला असेल
आणि मानववंशी असल्याप्रमाणे
नंतर तो बालकाच्या कपड्यात
लपेटला गेला असेल,
जर मला दूध पाजणारा स्तन

त्याने आपल्या वासलेल्या तोंडात
घट्ट पकडला असेल,
आणि मग जर त्याने त्या मधुर दुग्धात
स्वत:चे दही मिसळले असेल
आणि तिला भीतीने चीत्कार करायला
लावले असेल
तर अर्थातच त्याचा अर्थ असा होतो
की जिने ह्या बीभत्स प्राण्याला पाजले
ती घातपातानेच मेली पाहिजे.
मी बदलला पाहिजे माझा स्वभाव,
माझे हृदय आणि माझी कृती,
सर्पवत् झाली पाहिजे!
ह्या स्वप्नाची आज्ञाच आहे तशी.
भवितव्यतेने निवडलेला तिचा मारेकरी मीच आहे.

सेविकावृंद : तू लावलेला ह्या खुणांचा अर्थ
मी मान्य करते
आणि म्हणते "तथास्तु"
आम्ही तुझे मित्र आहोत
आता आम्हाला एकेकीला
आज्ञा कर तुझ्या.
सांग आम्ही काय करावे
आणि काय करू नये तेही सांग.

ऑरिस्टीस : सोपे आहे ते.
इलेक्ट्रा तू राजवाड्यात गेले पाहिजेस.
आणि माझ्या बेताबद्दलचा कुणाला काही संशय येणार नाही
ह्याबद्दल खबरदारी घेतली पाहिजेस.
त्याला मारण्यासाठी
त्यांनी विश्वासघाताचा वापर केला
आता त्यांना आढळून येईल की

## कोऑफोरी अथवा अर्घ्यधारिका

त्यांना फार महागात पडणार आहे ते कृत्य
जेव्हा लॉक्सिअसच्या - स्वामी ॲपोलोच्या
भविष्यसूचक वाणीला अनुसरून,
विश्वासघात त्यांनाही पकडील सापळ्यात
आणि अगदी तशाच जाळ्यात ठार करील त्यांना
ॲपोलोचे भविष्यसूचन आजवर
व्यर्थ झालले नाही कधीच.
आता माझ्या बेताबद्दल बोलतो
मस्तकापासून पायापर्यन्त
परदेशी वेष धारण करून
मी ह्या पायलेडिससह
राजवाड्याच्या बाहेरील प्रवेशद्वारापाशी येईन.
"घरी आलेला एक पाहूणा"
"शस्त्र सज्ज असलेला एक अतिथि" म्हणून!
पार्नेससमधील उच्चाराची ढब आमच्या जिभेवर
आम्ही झग्यासारखी चढवू.
जणू काही आम्ही दोघे तीसमधलीच माणसे आहोत.
द्वारपाल कदाचित आंबट तोंडाने
आमचे स्वागत करतील,
म्हणतील की, अमानुष भीतीदायक गोष्टींनी
सारे घर वेडेपिसे झाले आहे.
मग थांबून राहू आम्ही
दरम्यान रस्त्याने येणारे जाणारे तर्क करीत रहातील
आणि म्हणतील
"इजिस्थस एका याचकाला
का बरे बाहेर थांबून रहायला लावीत आहे?
तो तर घरातच आहे.
आणि माहितही असणार त्याला
याचक बाहेर आल्याचे"
पण त्याबद्दल मग काहीही घडो
एकदा का महालाच्या दरवाजातून माझे

## ग्रीक शोकनाट्ये

पाऊल आत पडले
आणि त्या नीच इजिस्थसला
माझ्या पित्याच्या सिंहासनावर बसलेला मी पाहिला
किंवा जर तेव्हा तो आणि मी समोरासमोर आलो
तर मी सांगतो तुम्हाला
एकदा माझ्या डोळ्यांशी डोळा तर भिडू दे त्याचा.
मग मेल्यातच जमा आहे तो.
"कोण आहे तो माणूस?" असे विचारायला सुद्धा
त्याला सवड मिळणार नाही.
कारण लागलीच माझ्या ब्रॉन्झ तलवारी वरून
मृत्यू त्याच्यावर झेप घेऊन
त्याचा गळा दाबील.
हत्यारूपी राक्षसीने पूर्वी आकंठ पान केलेच आहे.
आज ती तिसरा, शुद्ध रक्ताचा,
परिपूर्तीचा घोट घेईल.
ताई, तुझे काम म्हणजे
आता नीट लक्ष ठेवणे
म्हणजे आपण सगळ्यांनी वठवायच्या
सर्व भूमिकांचे निरनिराळे दुवे
नीट एकत्र जुळतील.
तुम्ही, बायांनो बोलण्यात सावध शहाणपणा ठेवा.
प्रत्येक नव्या क्षणीच्या गरजेप्रमाणे
काय ते बोला किंवा गप्पच रहा.
बाकीच्या गोष्टीबद्दल
मी हर्मिसला आवाहन करतो
की त्याने मला साथद्यावी
साक्षी व्हावे, मार्गदर्शन करावे
आणि माझ्या तलवारीकडून घडणाऱ्या सत्वपरीक्षेला
आशीर्वाद द्यावा.

(ऑरेस्टीस,पायलॅडिज् आणि इलेक्ट्रा आतात.)

कोअीफोरी अथवा अर्घ्यधारिका

सेविकावृंद : असंख्य रूपांनी भीती
पृथ्वीवर थैमान घालीत आहे
पृथ्वीच्या वाढत्या लेकरांचा मेळावा म्हणजे
लुटारूंचा अड्डा झाला आहे.
आणि सागराचा सखोल अंक
मानवांची शिकार करणाऱ्या राक्षसी आकृतींनी
बुजबुजला आहे.
भर दुपारी आकाशामधून प्रखरतेने
तळपणारा अग्नि
पिसे असलेल्या पंखांच्या पक्ष्यांवर
आणि दाट लव असणाऱ्या त्वचेच्या पशूंवर
दारूण आघात करीत आहे.
पशूपक्षी दोघेही ह्याची साक्ष देतील.
कारण दोघांनाही या माथेफिरू वादळाचा
संताप जाणवला आहे.
पण पुरुषाचे ते अविवेकी हृदय
त्याची हट्टी जिद्द
आणि स्त्रीचे परिणामाची पर्वा न करणारे
प्रेम आणि द्वेष
ह्या दोहोंच्या मागोमाग जी घातक व
अघाशी अरिष्टांची मालीका येते
त्याचा सपशील कोण सांगू शकणार आहे?
कारण
स्त्रीहृदयाला आंधळी करणारी बेदरकार वासना येते आडवी,
लपतछपत, धूर्तपणे आणि
विवाहबंधनाच्या स्नेहरज्जूला धिक्कारीत
आणि मानवजातीची आणि पशूंची विटंबना करीत.
दु:खी अॅलथिआकडून सत्य जाणून घ्या
जर तुमच्या विचारशक्तीला पंख फुटत नसतील तर,
तिने आपले हृदय दगडाचे केले
आणि ती घातक मशाल पेटवली.

पुरते ठाऊक होते तिला
त्या ज्वालेच्या फडफडण्याला साथ देणाऱ्या घटिका
कोणाचा मृत्यू ओढवून आणणार आहेत ते.
कारण हळूहळू कमी होत जाणाऱ्या
तिच्या त्या प्रकाशाबरोबर
ॲलथिआच्या स्वतःच्या पुत्राच्या जीवनाची ओहोटी
ओसरून जाणार होती
ज्या क्षणी त्याने
तिच्या उदरातून जन्म घेऊन रुदन केले
त्या क्षणापासून त्याच्या मृत्यूच्या दिवसापर्यन्त.
घृणा ह्या शब्दाला पर्याय म्हणून
दुसरे एक नाव उच्चारले जाते
सिला - जिने आपल्या पित्याला धाडले मृत्यूकडे
जिथे तलवारी त्याची वाट पहात होत्या
आणि तरीही तिला शरम वाटली नाही आपल्या कृत्याची
मिनॉसने क्रीटमध्ये घडवलेल्या एका
सुवर्णकंठबंधाच्या विलोभनाने तिला फितवले
तिने आपला पिता शांतपणे निद्रिस्त असतांना
त्याचा केस कापला
त्या केसाने त्याला दिले होत वरदान
जे अमर देव मर्त्यांना नाकारतात
आणि मग हर्मिसने त्याच्या स्कंधाला
स्पर्श केला
आणि लवकरच थंड झाला त्याचा श्वास
कोणतेही मलम ज्या जखमा बऱ्या करू शकत नाही
त्यांच्याबद्दल दोन कथा सांगितल्या
आता तिसरी आणि सर्वांत वाईट कथा ऐका
जिथे वैवाहिक जीवनात केवळ द्वेष वास करतो
जिथे स्त्रीचा मेंदू
लढवय्या पतीविरुद्ध विषपूर्ण विश्वासघात रचू शकतो
आणि या वीराच्या

## कोओफोरी अथवा अर्घ्यधारिका

भव्य आणि दरारा उत्पन्न करणाऱ्या भालप्रदेशावर
नाराजीची छाया पडली की
त्याच्यापुढे शत्रू थरथर कापत असत
तिथे साऱ्या देवांनी शापिलेले घर उभे आहे
असे समजा;
ज्या घरात आणि घरातील अग्नित पावित्र्य आहे
ते घर सन्मानाला पात्र आहे
तिथे द्वेष धगधगत नाही
किंवा सद्गुणांनी घालून दिलेल्या मर्यादेपलीकडे
स्त्रीची धाडसी प्रवृत्ती पोचत नाही.
होय, साऱ्या ध्यानात राहिलेल्या गुन्ह्यात
एक पहिल्या क्रमांकावर आहे
लेमनॉसमधील हत्याकांडाबद्दल बोलते आहे मी.
अशी एक कथा
की जी ऐकून माणसे
हृदय कष्टी होऊन सुस्कारे टाकतात
आणि जेव्हा फिक्कट पडलेल्या मुद्रेने
ते एखाद्या नव्या अचाट पापकृत्याबद्दल बोलतात,
तेव्हा ते म्हणतात,
"लेमनॉसमध्ये जे घडले त्याच्या इतकेच
भयानक आहे हे"
म्हणून आजच्या घटकेपर्यन्त,
आपली सारी जात (स्त्रीजात) शापग्रस्त आहे
देवांनी तिरस्कारलेली आणि पुरुषांनी
मताचा हक्क हिरावून घेतलेली
तुच्छ लेखलेली आणि मालमत्तेत वाटा नसलेली.
कारण देव ज्याचा तिरस्कार करतात
त्याचा कोणीही मानव गौरव करीत नाही
या तीन हकीकतींनी सिद्ध केला आहे माझा दृष्टीकोण
आणि जास्त उदाहरणे सांगत नाही आता मी.
हृदयाच्या जवळ तलवारीचे टोक वाट पहात आहे

जेव्हा न्यायदेव सूचक शब्द उच्चारतो
तेव्हा तिखट धारेचे ते जोरदार असे पाते
घुसते आरपार
कारण फार काळ कुणीही
सारासार विचार डावलू शकत नाही
अथवा स्वर्गस्थांचे पूज्य कायदे मोडून त्यावर
आपली कृत्ये माफ केली जातील
अशीही आशा बाळगू शकत नाही.
न्यायदेव आपली ऐरण मांडतो
मग नियती कठोर, तीक्ष्ण सुरी ठोकून घडवते
खून हा नेहमीच खुनाचा प्रसार करणार
एक जीव बळी पडला की दुसरा त्याचा
बदला म्हणून पडलाच पाहिजे.
म्हणून, दूरगामी निर्धार व सखोल कपट ह्याबद्दल
प्रख्यात असणारी
सूड उगवणारी राक्षसी
आता जेव्हा काळाबरोबर भाग्यचक्र फिरले आहे
तेव्हा पुराण्या गुन्ह्याला त्याचे मोल
रक्ताने देते आहे.

( हे गंभीर गीत गायिले जात असतांना रंगमंचावरील दृश्य बदलले, गेले असून आता राजवाड्याच्या पुढला भाग दिसत आहे. ऑरेस्टीस आणि पायलॅडीस सेवकांसह प्रवेशतात. ऑरेस्टीस राजवाड्याच्या दारावर थाप मारतो.)

ऑरेस्टीस : कुणी आहे का हो!
तुमच्या बाहेरच्या दारावर मी मारीत असलेली थाप
येते आहे का ऐकायला!
कुणी आहे का म्हणतो मी?
( तो पुन्हा दार ठोठावतो)
कोणी आहे का राजवाड्यात?

( तो पुन्हा दारावर थाप मारतो)
कोणी ऐकता आहात का?
तिसऱ्यांदा विचारतो.
दार उघडता का?
जर इजिस्थसच्या घराला
पाहुण्यांचे सुस्वागत करण्याचा सराव असेल
तर उघडाल दार!

सेवक : (एक सेवक दारात येतो)
हो रे बाबा. ऐकू येतोय् मला तुझा गर्गशा!
कुठला तुमचा गाव?
कुठून आलात तुम्ही?

ऑरिस्टीस : घराच्या मालकांना निरोप सांगा
की मी त्यांना भेटू इच्छितो
आणि एक बातमी पण सांगायची आहे त्यांना.
आणि जरा त्वरा करा
कारण रात्र धौडते आहे पुढे पुढे
तिच्या अंधाऱ्या रथातून
आणि आता प्रवाशांनी
एकाद्या आतिथ्यशील पथिकाश्रमात
मुक्काम टाकण्याची वेळ आली आहे
कोणातरी जबाबदार माणसाला यायला सांगा.
एकादी स्त्री जर ती गृहप्रमुख असेल तर
पण पुरुष असेल तर जास्त बरे होईल
म्हणजे मग शिष्टाचाराखातर
उलटसुलट व्यर्थ बोलणी तरी
करावी लागणारी नाहीत.
पुरुष दुसऱ्या पुरुषाबरोबर न संकोचता वागतो
आणि उघडपणे आपला पुरावा दाखवू शकतो
(क्लायटेमनेस्ट्रा राजवाड्याच्या दरवाजात येते. )

क्लायटेमनेस्ट्रा : सद्‌गृहस्थांनो, तुम्हाला काय सांगायचे असेल ते सांगा
ज्याची ज्याची तुम्ही अपेक्षा कराल
ते सारे ह्या घरात तुम्हाला मिळेल.
गरम पाण्याने स्नान व इतर सुखसोयी,
आरामशीर शय्या, स्नेहपूर्ण स्वागत आणि मनोरंजन;
जर ह्याशिवाय दुसरे काही जास्त गंभीर स्वरूपाचे
काम असेल तुमचे,
तर मग ती पुरुषांच्या अखत्यारीतील गोष्ट आहे.
आणि मी त्यांना त्याबद्दल कळवीन.

ऑरिस्टीस : मी फोसीसहून आलो आहे
दौलचा आहे मी
माझ्या मालासह प्रवास करीत
ऑरगॉसला चाललो आहे.
आणि इथे मी हा आताच
असा काही
माझ्या पायांवरचे खोगीर उतरतो आहे.
रस्त्यात एक मनुष्य भेटला मला
परका होता तो मला
असा मी त्याला होतो
त्याचे नाव बोलता बोलता समजले मला
स्ट्रॉफियस होते. फोसीसचा होता तो.
मी कुठे जातो आहे हे त्याने मला विचारले,
आणि स्वत:बद्दल सारे सांगितले;
मग तो म्हणाला,
"जर नाहीतरी तू आरगॉसला चालला आहेसच
तर हा निरोप लक्षात ठेव
आणि व्यवस्थितपणे पोचव तो नीट.
त्याच्या मातापित्यांना सांग
आणि विसरू नको हो
म्हणावे ऑरिस्टीस या जगात आता नाही.

तेव्हा जर त्याच्या कुटुंबाला
त्याला आपल्या घरी नेणे योग्य वाटले
किंवा आमचा पाहुणा म्हणून इथेच राहू देणे,
आणि एक स्थाईक झालेला परकीय म्हणून
इथेच फोसीसमध्ये त्याचे दफन होणे
( योग्य वाटले )
तर तू परत माझ्याकडे ये
आणि त्यांची काय इच्छा आहे ती सांग.
दरम्यान उचित तो शोक
पाळण्यात आला आहे
आणि आता त्याच्या अस्थी
ब्रॉन्झच्या एका जाडजुड मंजुषेत ठेवलेल्या आहेत."
असा होता माझा निरोप.
जर काही योगायोगाने
मी, माझ्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकेल
अशा संबंधित व्यक्तीशीच बोलत असेन
तर कोण जाणे, पण त्याच्या मातापित्यांना कळावे
हे योग्य आहे.

क्लायटेमनेस्ट्रा : हाय, काय हा दुःखाचा घाला !
आमची संरक्षणाची शेवटची तटबंदी
उध्वस्त झाली आहे. आणि आमचे जीवन व्यर्थ झाले आहे !
हाय रे दुःखी घराला झपाटणाऱ्या
दुर्दम्य शापा !
तुझ्या नजरेतून काहीही सुटत नाही !
आम्ही आमच्या मौल्यवान चिजा
दूर दडवून ठवतो.
पण तरीही तू लांबून नेम धरतोस
आणि तुझ्या तीक्ष्ण, लक्ष्यवेधी बाणांनी
मला प्रिय असलेले सारे,सारे माझ्या
करंट्या जीवनापासून हिरावून घेतोस

आता ऑरिस्टीसचीच गोष्ट घ्या.
त्याला खचितच वाटले असेल
की ह्या दलदलीपासून
आपले पाऊल लांब ठेवण्यातच शहाणपणा आहे
पण ह्या घरावरच्या शापाला विजयोन्मादाने हवातसा धुडगुस घालण्यापासून
युक्तीने तो परावृत्त करील.
या आशेनेच केवळ त्याच्याकडेच आम्ही पहात होतो.
आणि आता
मृतांची नावे नोंदवणाऱ्या त्या राक्षसीने
ऑरिस्टीसचे नावही नमूद करुन टाकले आहे.

ऑरिस्टीस : मला एवढेच वाटते की
मी जर चांगली बातमी आणणारा म्हणून
ह्या श्रीमंत राजवंशीगृहात
प्रवेश करु शकतो असतो
आणि इथल्या सुखद आतिथ्याचा स्वीकार
करु शकतो असतो
तर किती बरे झाले असते !
साऱ्या मैत्रींमध्ये
अतिथीची आपल्या यजमानाशी होणारी मैत्री
सर्वात अधिक स्नेहपूर्ण असते.
आणि असे जबाबदारीचे काम करायला नकार देणे
चुकीचे होईल असे मला वाटले.
कारण मी शब्द दिला होता
आणि आता फार अगत्याने
माझे स्वागत झाले आहे इथे.

क्लायटेमनेस्ट्रा : जे स्वागत प्राप्त करुन घेण्याची
तुमची पात्रता तुम्ही सिद्ध केली आहे
ते स्वागत तुम्हाला अवश्य मिळेल.

ते स्वागत तुम्हाला अवश्य मिळेल.
आमचे पाहुणे म्हणून.
हे घर तुमचेच समजा
जरी तुम्ही आला नसता
तरी लवकरच दुसऱ्या कोणीतरी
ही बातमी आणली असतीच.
पण जी माणसे दिवसभर प्रवास करतात
आणि ज्यांना अजून पुष्कळ दूर जायचे असते
त्यांनी भोजन आणि विश्रांतीसाठी
वेळ काढलाच पाहिजे.
(एका सेवकाला)
यांना आत घेऊन जा.
त्यांच्या मित्राला आणि सेवकांनाही न्या.
यांच्या रहाण्याची चांगली व्यवस्था करा.
पुरुषांच्या निवासस्थानात
आणि त्यांचे योग्य प्रकारे आगत स्वागतही करा.
औचित्य सांभाळून तत्परतेने कार्य करा
शेवटी याबद्दल तुम्हाला जबाबदार धरले जाईल
मी ही हकीकत राजाला कळवीन आणि
आमच्या मित्रांसह
कारण अनेक मित्र आहेत आम्हाला
आम्ही प्राप्त परिस्थितीची चर्चा करू.
(सर्व राजवाड्यात जातात.)

सेविकावृंद : या बायांनो!
लवकरच आपल्या हृदयांनी
आपल्या जिभांना बोलण्याचे धाडस दिले पाहिजे
आणि दाखवून दिले पाहिजे
की आम्ही अबला असलो तरी एकनिष्ठ आहोत.
आणि संकटकाळी ऑरेस्टीसला मदत करू शकतो.
हे आदरणीय भूमी,

हे पवित्र मृत्तिकाराशी
जी शोक मनावण्यासाठी
प्रेम आणि दुःख हर्षांनी उभवली
आणि जी नौकादलाच्या राजासाठी
खेदजनक आच्छादन बनली.
तू आता आमची प्रार्थना ऐक
आणि आताच तुझी मदत पाठव.
आता 'समजावणीला' तिच्या क्लुप्त्या वापरू दे
आणि लढ्यात सामील होऊ दे!
हर्मिस, पृथ्वीतळातील गुप्त शक्तीचा अधीश
त्या अरिष्टकारक तलवारीचा सांभाळ करू दे
आणि तिची धार तिखट करू दे.
असे दिसतेय् की आपला दाँलचा पाहुणा
काही गडबड गोंधळ उडवीत आहे.
बघ! ती पहा ऑरिस्टीसची अश्रूंत बुडालेली
दाई येत आहे.
क्लिलिस्सा! हे काय चालवले आहेस तू?
हे अश्रू काही "मोले घातले रडाया" पैकी नाहीत.
(राजवाड्यातून एक वृद्ध स्त्री बाहेर येते.)

दाई : माझ्या स्वामिनीने
मला ताबडतोब इजिस्थसला बोलावून आणायला
सांगितले आहे.
आता आपल्याला सांगण्यात आली ती बातमी
त्या लोकांकडून समक्षच ऐकण्यासाठी—
ही भयंकर बातमी.
तिच्या फसव्या डोळ्यात एक दुःखी भाव आहे.
आम्हा सेवकांच्या पुढे वरवर आणलेला
पण आतून ती हसते आहे.
का नाही? तिच्या दृष्टीने
हा सारा कारभार फार उत्तम रीतीने

कोॲफोरी अथवा अर्घ्यधारिका

हाताळला गेला आहे
मात्र, आपल्या घरासाठी
संकटाची भविष्यवाणीच आहे ही.
(कारण) ह्या माणसांचा वृत्तान्त अगदी स्पष्ट आहे.
स्वतःच स्वतःला आनंदाने मिठ्याच
मारील तो नीच प्राणी,
जेव्हा ही बातमी त्याच्या कानी जाईल तेव्हा
हाय, हाय! माझ्या शोकाची परमावधी झाली आता.
किती क्रूर आणि कटु वाटला होता
संकटाचा तो पहिला घोट
जेव्हा ॲट्रिअस ह्या राजमहालावर
राज्य करीत होता,
माझे हृदय किती रक्तबंबाळ झाले तेव्हा!
आणि तरीही इतका जबर आघात
कधी सोसला नव्हता आजपर्यन्त मी.
मी संकटांना तोंड दिले आहे.
अखेरच्या कटु घोटापर्यन्त ते सोसले आहे
पण माझा ऑरिस्टीस !............
देव भले करो त्याचे!
प्रेमळ मोठा पण त्याच्या संगोपनात
झिजून गेला माझा देह.
मी वाढवले त्याला.
त्या नवजात अर्भकाला
त्याच्या मातेच्या बाहूतुन उचलला मी,
आणि अगबाई!
किती वेळा रात्री ओरडून हाका मारल्या त्याने मला.
उठायला लावले मला.
आणि छळले ह्या नाहीतर त्या कारणाने
आणि आता त्याच्यावर आधारलेल्या
माझ्या साऱ्या आशा व्यर्थ झाल्या!
अहो, लक्षात आले ना तुमच्या

लहान बाळाला काही समजतं?
मग तुम्हालाच काळजी वहावी लागते त्याची
एखाद्या मुक्या प्राण्यासारखी.
आपल्याला योग्य वाटेल ते करायचं.
पाळण्यातल्या मुलाला काही
आपलं दुखलं खुपलं समजावून सांगता येत नाही.
आपल्याला खायला पाहिजे का प्यायला पाहिजे,
का मूत्रोत्सर्ग करायचा आहे.
कुठं समजतं त्याला?
बाळाच्या पोटातल्या व्यापारांवर
कोणाची हुकमत चालत नाही.
फारच लहान असतं ते.
हो, आता पुष्कळवेळा
मला समजायचे त्याला काय हवे ते.
आणि पुष्कळ वेळा, मला ठाऊक आहे,
माझा तर्क भलताच ठरायचा
आणि मग मला त्याचे कपडे धुवायला लागायचे.
कारण दाई आणि धोबीण
दोन्ही कामं करणारी हातांची जोडी
एकच होती.
म्हणजे मी दुहेरी कर्तव्य बजावीत असे.
हो ना, आणि मी वाढवले ऑरेस्टीसला
त्याच्या पित्याखातर.
आणि आता हे ऐकावे लागते आहे.
ऑरेस्टीस मरण पावला!
हं! आणि आता मला बोलावून आणले
पाहिजे त्या माणसाला,
ह्या घराचा शाप अन् शरम आहे तो,
आणि मोठा हर्ष होईल त्याला
ही बातमी ऐकल्यावर.

सेविकावृंद : तुझ्या निरोपात काय म्हटले आहे?
कसे यायचे आहे त्याने?
राजेशाही इतमामात?

दाई : राजेशाही इतमाम?
कृपाकरून ते पुन्हा बोला पाहू
समजले नाही मला काहीच.

सेविकावृंद : त्याने रक्षक शस्त्रधारी सैनिक
घेऊन यायचे आहे का, एकट्यानेच यायचे आहे?

दाई : असे होय? हो, रक्षक शस्त्रधारी सैनिकांसह.

सेविकावृंद : दाई, आम्ही ज्याचा तिरस्कार करतो
त्या आमच्या मालकाला
असे काहीही सांगू नको.
तुला जाता येईल तितक्या चटकन् जा
आनंदाचा अविर्भाव चेहऱ्यावर आण
आणि त्याला एकटाच यायला सांग
म्हणजे म्हणावे ती माणसे न भिता
सारी हकीकत सांगू शकतील.
शहाणा निरोप्या तिरकस निरोप सुद्धा
सरळ सीधा करून सांगतो.

दाई : हा काय प्रकार आहे?
म्हणजे जे आज ऐकले त्याचे स्वागत
करता की काय तुम्ही?

सेविकावृंद : आणि जर झ्यूसने कालांतराने
अखेरीस आपल्या विरुद्ध असणारा वारा
फिरवला असला तर!

दाई : वारा फिरवला?
तो कसा?
ऑरिस्टीस आपले आशास्थान होता
आणि आता तर तो निघून गेला आहे.

सेविकावृंद : त्याची खातरजमा करायला
चलाख भविष्यवेत्ताच हवा.

दाई : काय म्हणायचे आहे तुम्हाला?
तर मग तुम्ही काही वेगळे ऐकले आहात का?

सेविकावृंद : तू जा आपली
तुझा निरोप घेऊन जा
तुला आम्ही करायला सांगितले आहे
ते मात्र कर.
देवांचा ज्यांच्यात सबंध आहे
त्या गोष्टी देवच सांभाळतील.
(दाई जाते)

सेविकावृंद : झ्यूस,
ऑलिंपसवासी देवांच्या पित्या,
मी तुझी प्रार्थना करते.
हे वरदान आता आताच दे
की ह्या घराचे भाग्य
भक्कम पायावर प्रस्थापित व्हावे.
ज्यांच्या सद्सद्‌विवेकबुद्धीला स्मरून
घेतलेल्या शपथा
निर्दोष शासनाची मागणी करीत आहेत,
त्यांना त्यांच्या आशा फलद्रूप झालेल्या
आज पाहू दे
पवित्र न्यायासाठी

## कोओफोरी अथवा अर्घ्यधारिका

प्रार्थना करीत आहोत आम्ही
न्याय हाच आमचा संरक्षक आणि आधार
राहू दे नेहमी.
राजपुत्र मध्यवर्ती दालनात आहे
झ्यूसदेवा, त्याला शत्रूच्या समारासमोर येऊ दे!
जर तू त्याला थोरपदाला चढवलेस
तर तुझी इच्छा असेल त्याप्रमाणे
कृतज्ञतेच्या दुप्पट तिप्पट यज्ञयागात तुला
हविर्भाग देऊ.
तुला जो प्रिय होता
त्याचा पोरका मुलगा
हे झ्यूसदेवा एका जीवघेण्या शर्यतीत
घेठीला धरण्यात आला आहे
तर मग त्याच्या पळण्याच्या मार्गासाठी
अशी एक जागा निवड की जिच्यावर
मनुष्याला सपाट व निष्कंटक जमिनीवर
तालबद्ध गतीने धावता येईल.
आणि याप्रमाणे जलद पावले टाकीत
तो यशस्वी होऊन विजयस्तंभापर्यन्त
दौड करील.
अंतर्भागात वास करणाऱ्या
गृहदेवतांनो,
या घरातील प्रसन्न वैभव
तुमच्या प्रभावाने अनुग्रहीत होते
कृपाळूपणे ऐका
ह्या घराला सातत्याने भयामध्ये जखडून ठेवणाऱ्या,
फार पूर्वी घडून गेलेल्या गुन्ह्यांच्या
घोर दंडाचे निवारण करा
आमच्या प्रकरणाचा फेरविचार करा
हे दंडधरक्त आता जुनाट झाले आहे
तेव्हा ते वांझोटे झाले असले पाहिजे

आणि ह्या घराला
आता निरामयता प्राप्त झाली पाहिजे.
ॲपोलो,
सखोल गुहेतील रम्य देवालयाच्या ईशा,
असे वरदान दे की हे घर
आता धुळीतून आपली नजर वर करील
आणि एका पुरुषाचे स्वागी म्हणून
स्वागत करील.
विषण्णतेचा पडदा बाजूला होऊ दे.
धीरोदात्त कृत्यांवर
यशश्रीचा शिरपेच झळकू दे.
आणि हे घर वरदानाने
झगमगून उठू दे.

आणि हर्मिस - माईआचा पुत्र
खचितच आपला स्नेही होईल.
जर त्याची कृपा असेल
तर आपल्या कृतीला वेग देणारा
इतका उत्तम अनकूल वारा
दुसरा मिळणार नाही.
पुष्कळदा अनेक फायद्याच्या गोष्टी
तो आपल्या पदरात पाडून घेतो गुपचूप.
आपल्या गर्भितार्थी, गोंधळात टाकणाऱ्या
भाषणाच्या पडद्याखाली
तो आपली कृत्ये अंधारात ठेवतो
व त्यामुळे माणसे आंधळी बनतात
बाकी दिवस जेव्हा पूर्ण प्रकाशाने
झळाळत असतो
तेव्हाही माणसांना त्याच्या कृती अगम्यच
असतात म्हणा.
आणि मग -

## कोओफोरी अथवा अर्घ्यधारिका

मग ती वेळ येईल,
जेव्हा आम्ही आमच्या कर्कश आक्रोशाचे रूपांतर
करू त्या विजयगानाच्या सुरात
जो स्त्रिया लावतात.
वारा योग्य दिशेने वहातो तेव्हा
आणि आमच्या राजवंशी घराण्याच्या मुक्तीची
स्तोत्रे गाऊ.
एक नवा दिवस उगवतो आहे
आमच्या नगरीच्या जीवनात
या प्रेषित वरदानाने माझे स्वत:चे हृदय
भरून आले आहे
आणि मित्रांची सुटका झाली आहे
झपाटणाऱ्या भीतीपासून आणि कलहापासून.
ऑरेस्टीस,
हिंमत संचारू दे तुझ्या हृदयात
जेव्हा तो क्षण येईल
तिला ठार करण्याचा
तेव्हा तुझ्या पित्याच्या हत्येची मेघगर्जना कर.
जेव्हा ती स्फुंदत करुण वाणीने म्हणेल,
" माझ्या बाळा ऑरेस्टीस ! "
तेव्हा तू उत्तर कर –
" मी आहे फक्त माझ्या पित्याचा ! "
मग पुरे करून टाक तुझे भयंकर कृत्य
अरे, विधिलिखितच आहे ते.
आणि त्याबद्दल कोणीही तुला दोष देणार नाही.

पर्सिअसने धारण केले होते
तशा कठीण हृदयाची
तुझ्या सुदृढ काळजात स्थापना कर.
पृथ्वीच्या खाली आणि वर असणाऱ्या
ज्यांच्यावर तू प्रेम करतोस त्यांच्यासाठी

त्यांचा कोप शांत करण्यासाठी
बदला वसूल करुन घे.
आता तुझ्या भयंकर अखेरच्या कृत्याने
ॲट्रिअसच्या घराण्यासाठी मिळव
अन्त:करणातील मुक्तिशांती.
ती जुनी वैरे आता
पुन्हा रक्तपाताला कारण होऊ नयेत म्हणून
त्यांचे उत्पत्तिस्थान आणि बीजच
पूर्णपणे नष्ट कर.
( इजिस्थस येतो )

इजिस्थस : ठीक तर मग
हा मी आलो आहे
मला निरोप पाठवण्यात आला म्हणून.
मनाची शांती ढवळणारी बातमी आहे.
अगदी नको नकोशी वाटणारी असे एकतो.
काही प्रवाशांच्या सांगण्याप्रमाणे
ऑरिस्टीसचा मृत्यु झाला आहे म्हणे.
पण हे सुद्धा
आमच्या घराच्या अशुभकारक दैवामुळेच
घडले आहे असे म्हणणे
म्हणजे आधीच दुखापत झालेल्या
आणि जुन्या हत्यांनी सडलेल्या पाठीवर
धाभेजून टाकणाऱ्या भितीचे
एक नवे ओझे चढवण्यासारखे आहे.
मग काय समजायचे मी ?
हे खरोखरच विश्वसनीय आहे का ?
का नुसत्या बायकी घबराटातून उद्भवलेल्या
आणि सारख्या फुगत चाललेल्या
या बाजारु गप्पा आहेत ?

असल्या गप्पा लवकरच विरुनही जातात म्हणा.
मला नीट विचारपूर्वक उत्तर द्या.

सेविकावृंद : अर्थात आम्हीही ही बातमी
ऐकलीच आहे.
पण त्या माणसांनाच खुद्द विचारा ना
घरातच आहेत ते.
कर्णोपकर्णी ऐकलेली बातमी
कधीच खात्रीची नसते
माणसाला प्रत्यक्ष समोरासमोर विचारुन
सत्य जाणणे जास्त चांगले.

इजिस्थस : मी भेटतो त्या प्रवाशाला
आणि ऑरिस्टीस प्राणास मुकला
तेव्हा तो समक्ष तिथे होता
की त्याने कुठेतरी काहीतरी अर्धवट बातमी ऐकली
आणि इथे ती घेऊन आला
हे ही आणखी प्रश्न विचारुन समजून घेतो.
दोन डोळे आणि पाच ज्ञानेन्द्रिये
जागृत असलेल्या माणसाला तो फसवू शकणार नाही.
( इजिस्थस राजवाड्यात जातो )

सेविकावृंद : सर्वश्रेष्ठ झ्यूस,
काय म्हणू आता मी ?
मला प्रार्थना तर केली पाहिजे
पण कुठून सुरवात करु ?
इच्छा आणि निर्धार आतूर आहेत
ह्या क्षणाला योग्य अशा प्रार्थनेसाठी,
असे एक तळमळीचे आवाहन
की ज्यायोगे विनवणी करताच

यश प्राप्त होईल,
मानवी बळी सिद्ध आहे.
कट्यार त्वचेशी भिडली आहे –
पण या दिवसाचा शेवट कशाने होईल ?
ॲगमेमनॉनच्या घराण्याचा सर्वनाश
संपूर्ण आणि कायमचा तरी होईल
किंवा स्वातंत्र्याच्या ज्योतीने
आमच्या उद्धाराच्या प्रकाशात
आपला राजपुत्र शुद्ध करील त्याचे सिंहासन
आणि न्यायाने राज्य करील साऱ्या प्रदेशावर
आणि स्वत:च्या हक्काचे संपूर्ण वैभव भोगील –
असा आहे हा घाबरवून टाकणारा प्रश्न
आणि या क्षणीच त्याचा निकाल झाला पाहिजे.
एक विरुद्ध दोन या आकड्यान्वये बोलायचे तर
ऑरिस्टीस हा कठोर वारसा उचलून धरील
आणि ईश्वर त्याच्या बाजूला उभा राहील
विजयाने सत्याचा पक्ष खरा ठरू दे.
( राजवाड्यातून एक अंतकाळाची किंकाळी
ऐकू येते. हा आवाज इजिस्थसचा आहे. )

सेविकावृंद : कोणाचा आवाज होता तो ?
कोणाची जीत झाली ?
राजवाड्यावर कोणाची सत्ता आहे आता ?
या आपल्याला जास्त काही समजेपर्यन्त
बाजूला उभ्या रहा
आपण साथीदार आहोत असे वाटता
कामा नये कुणाला
झुंज संपली आहे
फासा टाकून झाला आहे.
( दृश्य बदलते व आतला चौक दिसू लागतो. एका बाजूला पाहुण्यांच्या

निवासात जाण्याचा दरवाजा आहे. मध्यभागी स्त्रियांच्या निवासाकडे जाणारा दरवाजा आहे. पहिल्या दरवाजातून इजिस्थसचा एक सेवक धावत येतो. )

सेवक : धावा, धावा ! मदतीला या कुणी !
माझा धनी मृत्यु पावला आहे !
ठार झाला आहे तो !
अहो, इजिस्थस मृतावस्थेत. दारे उघडा ताबडतोब ! स्त्रियांच्या निवासस्थानाची दारे उघडा म्हणतो मी ! लवकर या कोणीतरी
कोणीतरी बळकट माणूस लवकर.
आता काही मदतीचा उपयोग होणार नाही म्हणा.
सारे संपले आहे.
उघडा, उघडा ! अहो !
धावा मदतीला ! ऐकू येत नाही का माझे
म्हणणे तुम्हाला ?
तुम्ही सारे बहिरे तर नाही.
का गाढ झोपेत आहात ?
क्लायटेमनेस्ट्रा कुठे आहेत ?
काय करीत आहेत त्या ? अहो
कट्यारीच्या पात्यावर आहे त्यांचा जीव
त्यांचा स्वतःचा गळा
कापला जाण्याचा आहे संभव

( क्लायटेमनेस्ट्रा येते )

क्लायटेमनेस्ट्रा : काय आहे हा सारा प्रकार ?
ही अशी गडबड का चालवली आहेस तू ?

सेवक : मृत जिवंत होऊन
जिवंत असलेल्यांना मारायला आले आहेत
मी खरेखरे सांगतो आहे तुम्हाला !

क्लायटेमनेस्ट्रा : मृत ? हाय रे देवा–
मृतच ! होय, माझ्या लक्षात आले
तू कोणाबद्दल बोलते आहेस ते.
लबाडीने हत्या केली आम्ही ही गोष्ट खरी आहे
आणि लबाडीनेच आम्ही आता मरणार आहोत.
जा पळ, एक शस्त्र आणून दे मला.
( सेवक जातो )
आता येईल कळून
आम्ही जिंकतो की हरतो ते !
ही सारी लांबलचक कटू कथा आता
शेवटच्या वळणापर्यंत येऊन पोचली आहे.
( ऑरिस्टीस येतो )

ऑरिस्टीस : होय. तुलाच शोधीत होतो मी.
आतमध्ये तिथे त्याचा हिशेब चुकता झाला आहे.

क्लायटेमनेस्ट्रा : काय ? हाय, प्रियतम इजिस्थस,
ठार झालास तू ?
कुठे गेली तुझी ताकद ?

ऑरिस्टीस : हा तुझा माणूस तुला प्रिय
होता वाटते ?
छान, तू त्याच्या कबरीत त्याच्याबरोबर शयन कर ;
म्हणजे मग तो जरी मेला असला,
तरी तू त्याच्याशी तरी
कधीच बेईमान होणार नाहीस.

क्लायटेमनेस्ट्रा : खाली ठेव तुझी तलवार,
माझ्या मुला !
( ऑरिस्टीस हलत नाही )
( क्लायटेमनेस्ट्रा गुडघे टेकते )

माझ्या पोटच्या बाळा,
बघ ही छाती,
इथे पुष्कळदा शोपेत तुझे मस्तक विसावत असे;
आणि तुझ्या मृदु मुखाने तू
माझ्यापासून शोषून घेत होतास
ते मधुर दूध
जे तुला जीवन आणि शक्ती पुरवीत होते.
( पायलॅडिस येतो )

ऑरिस्टीस : पायलॅडिस, काय करु मी
मातेची हत्या करणे भयंकर गोष्ट आहे.
दया दाखवू का मी ?

पायलॅडिस : अरे, मग ॲपोलोचे शब्द,
त्याची पिथियातील दैवी भाकित
यांचे काय होईल ?
काय उरेल किंमत मग माणसाच्या आणाशपथांची ?
जगातल्या साऱ्या जित्या माणसांना तुझे शत्रू बनव,
पण देवाचे शत्रुत्व ओढवून आणू नकोस आपल्यावर.

ऑरिस्टीस : तुझ्या निर्णयाला मानतो मी ;
तुझा सल्ला योग्य आहे.
( क्लायटेमनेस्ट्राला उद्देशून )
चल, पुढे ये. त्याच्या अगदी निकट
मारायचे आहे तुला माझ्या मनात.
तो जिवंत होता तेव्हा
माझ्या पित्यापेक्षा तुला तो जास्त प्रिय वाटला.
तर आता मृत्यूतही त्याच्याच बरोबर
एक शय्या कर,
कारण तू प्रेम करतेस ना त्याच्यावर,
आणि द्वेष करतेस त्या माणसाचा

ज्याच्यावर तू प्रेम करायला हवे होतेस.

क्लायटेमनेस्ट्रा : मी तुला जीवन दिले ना !
मग मला माझे जीवन पुरते जगू दे ना.

ऑरिस्टीस : जगू देऊ तुला ? इथे –
ह्या माझ्या घरात ? तुला ?
माझ्या पित्याच्या मारेकरणीला ?

क्लायटेमनेस्ट्रा : बाळा, दैवाचाही हात होता त्यात.
साराच दोष काही माझा नव्हता.

ऑरिस्टीस : तर मग हा आहे दुसरा मृत्यु
त्याच दैवाने निश्चित केलेला.

क्लायटेमनेस्ट्रा : माझ्या पुत्रा,
तुला जन्मदात्रीच्या शापाचे भय
वाटत नाही का ?

ऑरिस्टीस : जन्मदात्री !
तू नुसता गर्भभार वाहिलास माझा.
आणि मग मी जन्मल्यावर त्याग केलास माझा
आणि दुर्दशेत लोटलेस.

क्लायटेमनेस्ट्रा : विश्वासू मित्रांकडे पाठवले
तुला मी म्हणजे का त्याग केला तुझा ?

ऑरिस्टीस : मी स्वतंत्र माणूस
म्हणून जन्माला आलो. तू माझे शरीर
आणि माझे सिंहासन विकलेस.

**क्लायटेमनेस्ट्रा :** विकले ? मग तुला विकल्यावर
मला जी किंमत आली ती कुठे आहे ?

**ऑरिस्टीस :** तुला मिळालेली किंमत ? मी
नाव घेणार नाही त्याचे, कारण तुझ्या
वर्तनाची शरम वाटते मला.

**क्लायटेमनेस्ट्रा :** तुझ्या पित्याने पण पापाचरण केले होते.
माझ्या पापांबरोबरच त्याच्याही पापांची गणती कर.

**ऑरिस्टीस :** चूप रहा ! त्याने लढाईत आपले
जीवन झिजवले. तू नुसती घरी बसली होती.

**क्लायटेमनेस्ट्रा :** पती जवळ नसलेल्या स्त्रीला
काही कमी सोसावे लागत नाही,
माझ्या मुला.

**ऑरिस्टीस :** पुरुषाचे श्रमच तर पोसतात
आणि सांभाळतात घरी बसणाऱ्या स्त्रीला.

**क्लायटेमनेस्ट्रा :** माझ्या पुत्रा, स्वतःच्या हाताने
मातेची हत्या करण्याचा निर्धारच केला
आहेस का तू ?

**ऑरिस्टीस :** माझ्या नव्हे, तुझ्या स्वतःच्याच
हाताने मृत्युचा आघात तू ओढवून घेत
आहेस आपल्यावर.

**क्लायटेमनेस्ट्रा :** मातेच्या शापामुळे उठवलेल्या सूडदेवतांची
शिकार होण्यापासून सावध रहा.

ऑरिस्टीस : मी जर माझा निर्धार शिथिल
होऊ दिला, तर पित्याच्या शापापासून
कसा सुटेन मी ?

क्लायटेमनेस्ट्रा : जिते जीव मृतांनाच आक्रोशून
साद घालतात. खरे आहे ते. मी
व्यर्थच बडबड करते आहे.

ऑरिस्टीस : नियतीचे वारे माझ्या पित्याच्या
मृत्यूकडून थेट तुझ्या मृत्युकडे वहाते आहे.

क्लायटेमनेस्ट्रा : ते माझे स्वप्न– हाय रे
देवांनो ! हा पहा तो सर्प ज्याला मी
जन्म दिला आणि पोसला.

ऑरिस्टीस : तुझ्या स्वप्नातल्या भीषणतेने
तुला भावी सत्यच सांगितले.
अपवित्र होता तुझा गुन्हा आणि तुझी
शिक्षाही अपवित्रच असेल.
( ऑरिस्टीस क्लायटेमनेस्ट्राला राजवाड्यात
घालवतो. पायलॅडिस् पाठोपाठ जातो )

सेविकावृंद : मी शोक करते ह्या दोघांसाठी सुद्धा–
एकजूट होती त्यांची अपराधात
आणि अखेरही एकजुटीनेच झाली
पण ज्याअर्थी आमच्या राजपुत्राने
हत्येने लडबडलेल्या भूतकाळावर
रक्तरंजित कळस चढवला आहे.
त्याला स्वत:लाही त्याबद्दल यातना होत आहेतच –
त्याअर्थी मी दोन पर्यायांमधून
हा एक पसंत करते–

कोओफोरी अथवा अर्घ्यधारिका

हा की आरगॉसची मधुर आशा
मृत्यूत नष्ट होऊ नये
प्रायॅमच्या मुलांची गोष्ट
बोलायची तर
हळूहळू पण निर्धाराने पावले टाकीत
न्यायदेवाने कठोर दंडासहित त्यांना गाठले
त्याचप्रमाणे दुहेरी मृत्युने पाठलाग केला
या राजवाड्यात सत्ता गाजवणाऱ्या
आणि तो उध्वस्त करणाऱ्या
दुहेरी श्वापदाचा.
निर्वासिताने प्रार्थना केली
देवाने नीट सल्ला दिला
सूड घेणारा न कचरता
त्याच्या ध्येयाकडे धावला
गा आनंदाने !
विजयाचा जयजयकार करा !
ह्या दिव्यभव्य दिवसाने
ऑरगॉसच्या सिंहासनाला स्वातंत्र्य
मिळवून दिले आहे.
या नगरीचा खडबडीत जीवनमार्ग
सुसह्य केला आहे. आणि त्या गुन्हेगार जोडीने
नष्ट केलेली सारी संपत्ती
लवकरच परत मिळणार आहे.
जो छुप्या तलवारीने वार करतो
त्याला अखेरीस छुपी शिक्षा गाठतेच.
लोक जिला झ्यूसची कन्या अशा योग्य
नात्याने ओळखतात.
त्या न्यायदेवतेने ऑरेस्टीस वार करीत असतांनाच
त्याच्या हाताला मार्ग दाखवला.
आणि तिच्या कोपयुक्त श्वासाने त्याच्या
शत्रूचे दमन केले.

गा आनंदाने !
विजयाचा जयजयकार करा.
ह्या भव्यदिव्य दिवसाने
आरगॉसचे सिंहासन स्वतंत्र केले आहे.
या नगरीचा खडबडीत जीवनमार्ग सुसह्य
केला आहे.
आणि त्या गुन्हेगार जोडीने
नष्ट केलेली सारी संपत्ती
लवकरच परत मिळणार आहे.
पारनॅससखालील प्रचंड
गुहेतल्या देवालयाच्या ईशाने ॲपोलोने
मेघगर्जनेप्रमाणे उच्चारला त्याचा शब्द—
" कपटाचा आश्रय घ्या.
पण माझा शब्द खोटा पडू देऊ नका. "
आता न्यायदेवता, तिला योग्य वाटलेल्या समयी
ॲपोलोने दिलेला शब्द प्रमाणित करीत आहे
कारण असे दिसते की अशा रीतीनेच
ईश्वरी सत्तेचा जय होतो
आणि गुन्हेगार आपल्या गुन्ह्यामुळे
ईश्वराच्या कृपेला वंचित होऊन रहातो.
म्हणून आपण देवाच्या सर्वशक्तीमत्तेचे अधिराज्य
आदरितो हे योग्यच करतो.
ह्या घरातील आत्म्यांनो,
आता दिवसाच्या प्रकाशाकडे डोळे वर करून पहा.
आता जोर धरा !
तुमच्या शृंखला भिरकावल्या गेल्या आहेत.
चला, उठा. मोकळेपणी उभे रहा आणि
सारे वातावरण आनंदाने भरून टाका.
फार दिवस तुम्ही निमूटपणे आडवे
पडून होतात.
एकदा का गृहाग्नी निर्मळ झाला,

शापाची निरगाठ सुटली आणि
जीवन पुन्हा निष्कलंक झाले की ताबडतोब कृतकृत्य व कार्यमग्न काल
ह्या राजद्वारातून आनंदाने प्रवेश करील.
लवकरच टाकलेले फासे त्यांची
भाग्यदर्शक बाजू दाखवतील.
पुष्कळ जण पहातील आणि विचारल्यावर
पुष्कळजण सांगतील ह्या घराण्याला प्राप्त झालेली वरदाने
जिथला निवास भाग्यश्रीला प्रिय आहे.
( दृश्य बदलते. आता ऑरिस्टीस इजिस्थस आणि क्लायटेमनेस्ट्रा यांच्या मृत देहांजवळ उभा राहिलेला दिसतो. ज्यात क्लायटेमनेस्ट्राने अॅगमेमनॉनला गुरफटून टाकले होते तो रक्तरंजित झगा हातात घेऊन सेवक उभे आहेत.)

ऑरिस्टीस : पुढे या सारेजण आणि बघा हे दृश्य !
ह्या दोघांनी छळवाद केला साऱ्या देशाचा
हत्या केली माझ्या पित्याची
लुटला माझा वारसा,
जिवंत होते तोवर सहभागी झाले ते
एकाच प्रतिष्ठेत, एकाच सिंहासनात, एकाच प्रीतीत.
आता त्या प्रतिष्ठेबरोबर, त्या प्रीतीबरोबर
ते सहभागी होत आहेत एकाच मृत्यूत.
दोघांनी मिळून एक शपथ घेतली होती.
माझ्या पित्याचा यातनामय शेवट करण्याची.
त्याच प्रमाणे एकत्र मरण स्वीकारण्याचीही.
ह्या दोन्हीही शपथा पाळल्या त्यांनी
( ऑरिस्टीस रक्तरंजित झग्याकडे बोट दाखवतो.)
माझ्या आचरणाचा न्याय करणाऱ्यांनो,
हा पुरावा पण पहा
ही धूर्त क्लृप्ती—या जाळ्यात त्यांनी
अडकवले माझ्या पित्याला.
त्याचे हात आणि पाय खिळवून टाकून,

जखडून टाकले त्याला.
( सेवकांना)
चला या पुरा उलगडून दाखवा तो.
बघा, हा वापरला होता एका माणसाची
मोट करून टाकण्यासाठी
पागल माणसाला जखडतात अशा अंगरख्यात !
भोवती उभे रहा आणि दाखवा तो.
त्या पित्याला पाहू दे ही चीज
माझ्या नव्हे तर ज्याची नजर
ह्या पृथ्वीवरची सारी कृत्ये पहाते त्याला.
त्या सूर्यदेवाला पाहू दे ही भीषणता
जी घडवण्यात माझ्या मातेचा हात होता !
मग त्याला होऊ दे माझा साक्षीदार
जेव्हा माझा न्यायनिवाडा होईल तेव्हा
आणि सांगू दे की
सत्तत्त्व आणि कर्तव्य ह्या दोहींनी
भाग पाडले मला ही हत्या करायला
माझ्या मातेची म्हणतो मी
त्याच्या मृत्युबद्दल एक शब्दही बोलायची
इच्छा नाही माझी—
व्यभिचारासाठी कायद्यात असलेली तरतूद.
त्याच्यासाठी केली गेली आहे.
पण हा बीभत्स गुन्हा
( झग्याकडे बोट दाखवीत )
आपल्या पतीच्या विरुद्ध आखणारी ती
ज्याचे अपत्य तिने आपल्या उदरात धारण केले होते
आणि एकेकाळी त्या अपत्यावर प्रेमही केले.
जरी आता तुम्ही त्याला तिचा क्रूर वैरी
म्हणून पहात आहात—
तिचे काय ?
जर ती घातक फटका मारणारी एखादा

कोओफोरी अथवा अर्घ्यधारिका

मत्स्य असती,
जहरी साप असती
तर विषाच्या दातांशिवायच, तिच्या नुसत्या स्पर्शानेसुद्धा
त्यातील निखळ रानटीपणाने आणि निसर्गदत्त जहराने,
एखाद्या बिचाऱ्या जीवाचा
त्याचे मांस सडायला लावून बळी घेतला असता.
मी काय म्हणून ह्या झग्याबद्दल ?
गौडस शब्द शोधू लागतो.
तरी असेच म्हणावे लागेल
की रानटी पशूसाठी लावलेला हा सापळा
किंवा एखाद्या शवाला गुंडाळण्याचे प्रेतवस्त्र
ज्याने त्याचे शवपेटिकेतले पाय झाकले होते–
जाळे नाही तर पिंजायचा चिमटा
पंगू करुन टाकणारा भोंगळ झगा
कोणी चलाख दरोडेखोर
अगर धंदेवाईक खिसेकापू
बनवीत असेल असले हत्यार
गरीब प्रवाशांना चकवण्यासाठी
आणि ह्या नामी नीचतेने
हत्या करीत असेल
आणि मग धुमसत असेल त्याचे
हृदय अपराधाच्या जाणीवेने
अशा स्त्रीबरोबर कधीच रहाणार
नाही मी एका घरात
त्यापेक्षा आधीच देवाने धाडावा मला
अपत्यहीन अवस्थेत मृत्यू.

सेविकावृंद : शोक करते आहे मी
तू मारलेल्या राजासाठी,
अश्रू ढाळते मी तुझा शेवट झालेला पाहून
तुझा मृत्यू भीषण होता खराच

पण जेव्हा काळाला पुष्कळ प्रतीक्षा करावी लागते.
तेव्हा उमलते अन्यायाच्या मुळातून
यातनांचे फूल.

ऑरिस्टीस : ती गुन्हेगार आहे की नाही ?
हा पहा इजिस्थसच्या तलवारीच्या करामतीमुळे
लाल रंगाने रंगलेला झगा
हा आहे माझा पुरावा
होय, हे रक्त आहे, रक्त
ज्यांच्या डागांनी काळाशी हातमिळवणी करुन
ह्या चित्राकृती रेखलेल्या कापडाचे
रंग फिके पाडले आहेत.
आणि रेखा पुसून टाकल्या आहेत
आता मी घोषित करतो ती स्तुतीस्तोत्रे
जी मी तेव्हा उच्चारु शकलो नव्हतो.
ज्याअर्थी मी बघू शकत नाही त्याचा देह
त्याअर्थी ज्या फसव्या जाळ्याने अडकवले
आणि मारले माझ्या पित्याला
त्याच्यावरच मी ढाळतो माझे शोकाश्रू.
तिचे कृत्य, त्याबद्दल तिला झालेली शिक्षा
हा साराच प्रकार घोर मनोव्यथा
देत आहे मला !
हा विजय जीवन घृणास्पद करतो आहे माझे
आपल्या कलंकित स्वरुपाने

सेविकावृंद : कोणीही माणसाने
वेदनेचा स्पर्श न झालेले जिणे जगण्याची
आशा करु नये.
आणि शेवटपर्यन्त भाग्यवन्त रहाण्याची
काही दुःखे वर्तमानात आपण भोगीत असतो
आणि काही काळ आणि देव

पाठवतात क्रमाक्रमाने

ऑरिस्टीस : आता मी काय म्हणतो
ते ऐकून घ्या.
ह्या घटकेला माझी अवस्था आहे.
अशा माणसासारखी की
जो घोड्यांची एक जोडी दौडवीत असतो
पण माहित नसते त्याला
कुठे संपणार आहे ती दौड.
माझी लगामावरील पकड ढिली पडली आहे
आणि माझी बुद्धि त्रस्त झाली आहे;
परिणामी भलतीकडेच नेत आहे ती मला
भीती माझ्या हृदयाला आपला सूर ऐकवीत आहे.
आणि त्याला कोपयुक्त करुन नाचवीत आहे.
म्हणून माझे मनोव्यापार सुव्यवस्थित
चालले असतानाच, त्या अवधीत
जे माझ्याशी इमान राखून आहेत
त्यांना मी गंभीरपणे जाहीररीत्या सांगतो
की माझ्या मातेची हत्या करणे हे पाप नव्हते.
कारण ती स्वत:च माझ्या पित्याच्या
खुनाने कलंकित झालेली होती.
अपवित्र आणि देवांच्या तिरस्काराला पात्र झालेली.
आणि ज्या भारलेल्या शब्दांनी मला
हे भयंकर कृत्य करायला धैर्य दिले.
त्यांची जबाबदारी मी टाकतो
लॉक्झियस अॅपोलोवर
त्याने त्याच्या पिथियातील दैवीवाणीने
उघड करुन सांगितले मला
की जर मी हे कृत्य केले.
तर कोणताही दोष येणार नाही माझ्यावर.
जर मी ते टाळले तर कोणते प्रायश्चित्त

मला होणार होते ते मी सांगत नाही.
कारण अशा घोर यातना माणसाच्या मनाच्या आवाक्यांच्या
फार पलीकडच्या आहेत.
आता मी काय करतो ते बघा
ह्या फांदीचे, ह्या गुच्छाचे अस्त्र
अगोदरच धारण करुन
ॲपोलोच्या पवित्र भूमीत
याचक म्हणून जातो मी.
तिथे पृथ्वीच्या मध्यबिंदूवर असलेल्या देवालयात
ज्योत तेवत असलेला एक
दीप प्रकाशत आहे.
आणि तिथे मागतो आसरा
आप्तसंबंधित रक्ताच्या अपराधाने
निर्वासित झालेल्या माझ्यासाठी.
ॲपोलोने केवळ याच मार्गाने
दुसऱ्या कुठल्याही नव्हे–
मदतीसाठी त्याच्याकडे वळायला
सांगितले होते मला.
ह्या कृत्याबद्दल म्हणाल तर,
आरगॉसमधल्या सर्व लोकांना–
आताच्या व भविष्यकाळच्या–
आवाहन करतो मी
की माझ्या वतीने त्यांनी साक्षी रहावे
की इथे ज्या मृत्यूला ती बळी पडली
तो मी केवळ निर्दयपणे तिच्यावर लादला नव्हता.
आता मी माझ्या मायदेशातून हद्दपार होऊन
बाहेर भटकत रहाण्यासाठी जात असताना
माझ्याबद्दल हे असे नेहमी म्हटले जावे.

सेविकावृंद : सत्य आणि यश
दोन्ही तुझ्या बाजूची आहेत.

मग अशुभ शब्दांचे ओझे तुझ्या जिभेवर का चढवतोस?
तू स्वतंत्र केले आहेस आरगॉसला
आणि तिच्या नागरिकांना.
आम्हाला त्रस्त करणारे दोन पशू
हतबल होऊन पडले तुझ्या तलवारीखाली
मग अशुभ घडेल असे कशाला बोलायचे?

**ऑरेस्टीस :** (सूडदेवता येताना पाहून)
ओ:! ओ:! पहा, बायांनो,
त्या पहा तिथे आहेत त्या!
गॉरगॉन राक्षसीप्रमाणे
करडे झगे घातले आहेत त्यांनी
आणि विळखे घातलेले सर्प त्यांच्या
शरीरांभोवती वळवळत आहेत.
पळ काढू द्या आत मला!

**सेविकावृंद :** आरगॉसच्या निष्ठावंत पुत्रांतील अग्रगण्य मुला,
कोणत्या काल्पनिक दृश्यांनी असा
घाबरून गेला आहेस तू?
जाऊ नको, थांब! तू तुला इष्ट तो
विजय मिळवला आहेस.
आता तुला कसली भीती आहे?

**ऑरेस्टीस :** माझ्या दृष्टीला दिसलेली ही चालतीबोलती भयानक दृश्ये
कल्पनेचा खेळ वाटत नाहीत मला.
ती कोण आहेत हे समजले आहे मला.
- एका आईच्या सांडलेल्या रक्ताने खवळलेले
सूड घेणारे शिकारी कुत्रे आहेत ते.

**सेविकावृंद :** त्या रक्ताचा कलंक अजून
ताजाच आहे तुझ्या हातावर.

म्हणून भांबावले आहे तुझे चित्त
साहजिकच नाही का ते?

ऑरिस्टीस : हाय रे देवा अँपोलो!
त्यांच्या संख्येत सारखी भर पडत आहे.
पहा, पहा तिकडे!
आणि बघा, त्यांच्या भयंकर डोळ्यांतून
रक्ताळलेला पू ठिबकत आहे.

सेविकावृंद : जा तर मग त्वरित तुझी
शुद्धी होईल तिकडे.
अँपोलोपुढे हात पसर आणि
तो तुला मुक्त करील तुझ्या ह्या यातनातून.

ऑरिस्टीस : मला माहित आहे की
हे प्राणी तुम्हाला दिसत नाहीत.
पण मला दिसताहेत ते.
फटके मारून मला हाकलीत आहेत ते!
नाही सहन होत हे मला!
पळूनच गेले पाहिजे मला यांच्यापासून
बचावण्यासाठी.
(एक अत्यन्त व्यथित किंकाळी फोडून ऑरिस्टीस पळून जातो.)

सेविकावृंद : सुदैव तुला साथ देवो
आणि ईश्वराचे आशीर्वाद तुला मार्ग दाखवोत
व त्या मार्गावरचे तुझे संरक्षक होवोत
आणि अखेर तुला शांती देवोत.
(सेविकावृंद रंगमंचाच्या पुढील भागात एकत्र होऊन उभा रहातो व प्रेक्षकांना उद्देशून बोलतो.)
अशा रीतीने ह्या पुरातन शापाने
तिसऱ्या खेपेला हा राजवंश

## कोईफोरी अथवा अर्घ्यधारिका

भयंकर वादळात सापडल्यागत उध्वस्त
करून टाकला.
आता त्या वादळाचा जोर ओसरला आहे
कारण विनाश व्हायचा तो झाला आहे.
थिएस्टिसच्या हत्या झालेल्या मुलांपासून
सुरवात झाली त्या विनाशाची.
त्यापाठोपाठ लगेच मृत्यू पावला एक माणूस
ॲकियाच्या सैन्याचा प्रमुख,
शूर आणि भला होता तो.
तो विश्वासघाताने मारला गेला.
विवस्त्र असतांना, त्याच्या आत्म्यावर पडलेले
रक्ताचे डाग धुवून निघावे म्हणून
ही तिसरी खेप
हिचा शेवट काय होईल सांगवत नाही-
आणि आम्ही श्वास रोखून धरतो आहो
आणि प्रतीक्षा करतो आहो आशादायक शब्दाची.
मुक्तीचा निर्णय मिळेल का?
का आणखी एक मृत्यू घडेल?
केव्हा होईल ह्या दीर्घकालीन वैराचा निकाल?
केव्हा निवळेल जोर ह्या वंशपरंपरागत शापाचा?
आणि त्याचा त्वेष ओसरून
अखेर केव्हा विसावून विलीन होईल तो.

२) कोअीफोरी या शोकनाट्यातील संदर्भांवर स्पष्टीकरणात्मक टीपा :–

**कोअीफोरी** : अर्घ्य घेऊन जाणाऱ्या सेविका. प्राचीन ग्रीकांच्या धर्मात होम – हवन इत्यादी प्रामुख्याने असे.

**लिसीयन** : लिसीया हे आशिया मायनर मधले एक ठिकाण आहे. शूरांची जन्मभूमी म्हणून हे प्रख्यात होते.

**पर्सिफोनी** : झ्युस व डेमेटरची मुलगी. अधोलोकाचा स्वामी हेडीजने तिला पळवून नेऊन अधोलोकाची राणी केली. डेमेटरने तिला परत आणली पृथ्वीवर. पण पर्सीफोनीने एक डाळिंब खाल्लेले असल्यामुळे झ्यूसच्या संमतीने ठरले की तिने वर्षाचा तिसरा भाग अधोलोकी रहावे. (डेमेटरने दु:खाने पृथ्वी उजाड केली तेव्हा पर्सीफोनीने तेथे काही खाल्ले नसल्यास तिला पृथ्वीवर परत पाठवण्यास झ्यूसने परवानगी दिली परंतू तिने डाळिंब खाल्ले असल्यामुळे अशी वाटणी करावी लागली.)

**पार्नेसिअन** : पार्नेससचा. माऊंट पार्नेसस ही कॉरिन्थच्या खंद खाडीच्या वायव्येस असलेली एक प्रचंड पर्वतश्रेणी आहे.

**फोसीस** : उत्तर ग्रीसमधला एक देश.

**ॲल्थिया** : ईजिअसची पत्नी, थेस्टियसची मुलगी, तिचा मुलगा मेलिॲगर ह्याच्या मृत्यूमुळे तिने आत्महत्या केली. तिच्या महालातली मशाल तेल संपून विझेपर्यंत तिचा मुलगा मरणार नाही असे भविष्य होते. म्हणून तिने तेल असतानाच मशाल विझवून ठेऊन दिली. पण तिच्या मुलाने तिच्या भावांना ठार केल्याचे कळताच त्वेषाने तिने मशाल पेटवली. ती विझताच मॅलिॲगर मेला.

**क्रेटन** : क्रीटचा रहिवासी.

# कोओफोरी अथवा अर्घ्यधारिका

**मिनॉस** : युरोपाचा मुलगा. क्रीटचा राजा त्याच्याजवळ मिनॉटोर नावाचा मानवी शरीर व बैलाचे डोके असलेला भयंकर प्राणी होता तो दरवर्षी सात युवक व सात युवती खात असे. त्याला ठेवण्यासाठी एक भुलभुलैय्या बांधण्यात आला होता.

**लेमनॉस** : एक बेट.

**लेमनियन** : लेमनॉसचा रहिवासी.

**स्किला** : ही भयंकर स्त्री मेंगेराचा राजा नायसस ह्याची मुलगी. हिचे मिनॉस वर प्रेम होते. जेव्हा मिनॉसने मॅगेराला वेढा घातला तेव्हा तिने निजलेल्या पित्याचा सोनेरी केस कापला. त्या केसावर तिच्या पित्याचे जीवित अवलंबून होते.

**लेमनॉसच्या स्त्रिया** : लेमनॉस ह्या बेटावरील स्त्रिया भयंकर होत्या. ह्या स्त्रियांनी सवतीमत्सरामुळे आपल्या नवऱ्यांना व त्यांच्या प्रियकराणींना ठार केले.

**दॉलियन** : डालिस ह्या फोसीसमधल्या पुरातन गावाचा रहिवासी.

**ऑलिंपियानिवासी देव** : मॅसेडोनिया व थेसलीच्या दरम्यान माऊंट ऑलिंपस हा पर्वत आहे. त्यावर झ्यूस, डिमिटर, हीरा, ॲफ्रोडाइटी, पॅलास, ॲथीनी, आरटिमिस वगैरे देव रहात अशी प्राचीन ग्रीकांची समजूत होती.

**माईआ** : झ्यूसपासून झालेल्या हर्मिसची आई. ॲटलास व प्लिओनीची मुलगी. तिचे कबुतरात रूपांतर करून तिला सप्तकृत्तिका या तारापुंजात स्थान देण्यात आले.

# युमेनिडीज

लेखक
इस्किलस

अनुवादिका
सौ. माधुरी भिडे

# युमेनिडीज

पात्र योजना :

**ॲपोलोची पुजारीण**

ॲपोलो

**हर्मिस**

ऑरिस्टीस

**क्लायटेमनेस्ट्राचे पिशाच्च**

**क्रोधदेवतांचा वृंद म्हणजेच युमेनीडीज्**

**अथिनी**

**अथेन्समधील बारा नागरीक**

**अथेन्समधील बऱ्याच स्त्रिया व मुली**

( दृश्य : प्रथम डेल्फीला ॲपोलोची दैवी वाणी जिथे होते त्या स्थळी अथवा ॲपोलोच्या देवळात;
नंतर अथेन्सला ॲक्रोपोलीस वरील अथीनीच्या देवालयात. )

**दृश्य १ ले.**

( ॲपोलोची दैवी वाणी जिथे होते त्या स्थळी, पडदा पडलेला आहे. ॲपोलोची पुजारीण खालील बाजूने एकीकडून प्रवेश करते, पायऱ्या चढून रंगमंचावर येते व पडद्यासमोर मध्यभागी उभी रहाते. )

**पुजारीण :** मी ज्यांना आदराने भजते
त्या सर्व देवांमध्ये
प्रथम पूजिते मी पृथ्वीला
भविष्य वाणीची प्रथम उद्‌गाती.
नंतर पृथ्वीकन्या थेमिस
जी, परंपरागत कथा सांगतात की,
ह्या दैवीवाणीच्या स्थानावर
अधिराज्य करीत होती पृथ्वीनंतर
त्यानंतर सिंहासनाधीष्ठित झाली, फीबी,
बळाचा उपयोग करून नव्हे
तर सर्वांच्या सदिच्छांनी.

ती सुद्धा टायटनांसारखी पृथ्वीची
आणखी एक कन्याच
तिने जन्मदिवसाची भेट म्हणून
आपला हक्क दिला फीबस्‌ला.
तिचे नाव धारण करणाऱ्या तरूणाला,
डेलॉसच्या उंच खडकाळ डोंगरांनी
वेढलेल्या सरोवरातून
तो जहाज़ांनी भरलेल्या पॅलासच्या
किनाऱ्यावर आला.
तिथून पारनॅससला आणि मग ह्या
पवित्र स्थळी,
आणि ह्या प्रवासात
ॲटिकच्या पुजाऱ्यांचे समूह,
हेफिस्टसचे मार्ग तयार करणारे पुत्र
त्याला साथ देत होते
पूर्वी कुणीही पाऊल न ठेवलेल्या
या असंस्कारित भूमीवर
यात्रेकरूंच्या सुखसोयीसाठी
करीत होते संस्कार
याप्रमाणे फीबस डेल्फीला आला
राजा व नागरीक – सर्वांनीच त्याचा मोठा
मानसन्मान केला.
झ्यूसने त्याच्या भविष्य जाणू शकणाऱ्या
माणसाला
स्वर्गीय ज्ञान प्रदान केले
आणि त्याला या सिंहासनाचा
चौथा वारसदार म्हणून अधिष्ठित केले,
ज्या स्थानावरून तो लॉक्सिआस या
अभिधानाने
आपल्या पित्याचे शब्द आणि मनोगत
मानवजातीला विशद करून सांगतो.

माझी श्रद्धा प्रथम ह्यांना आवाहन करते
आणि मी पवित्र शब्दांनी वंदिते
प्रांगणाधिष्ठित अथीनीला
आणि कॉरिकसवरील गुंफातील अप्सरांना.
तिथे, त्या भारलेल्या निवासस्थानात
मोठ्या खुषीने पक्षी घरटी बांधतात.
आणि तिथे ब्रोमियसनेही आपले निवासस्थान केले.
तो आपली झपाटलेली स्वभक्त सेना
एकाद्या सशाला शिकारी कुत्र्यांनी फाडून टाकावे
तशी राजा पेंथियसची स्थिती
करण्यासाठी एकदा घेऊन आला होता.
तेव्हापासूनच तो इथे वास करून आहे.
त्यानंतर मी नाव घेते
प्लेईस्टॉसच्या जलधारांचे, डेल्फीच्या नदीचे
नंतर पॅासाइडोनचे आणि शेवटी
तो सर्वोच्च कर्ता करविता दाता – झ्यूस, याचे.
आता भविष्यवेत्त्याच्या ह्या
आसनावर आरूढ होते मी;
स्वर्गस्थ शक्ती करो आणि
आजच्या दिवसाची आराधना
ती देणार असलेल्या वरदानात
आजवरच्या सर्व आराधनांहून सर्वश्रेष्ठ ठरो!
रूढीप्रमाणे, इथल्या कुणीही ग्रीक प्रश्न विचारणाऱ्याने
प्रथम कुणी पुढे यायचे ह्यासाठी
चिठ्ठ्या टाकल्यावर
त्या क्रमाने यावे.
फीबस् माझ्या ओठांना मार्गदर्शन करील.
त्यानुसार मी सत्याची घोषणा करीन.
(पुजारीण पडद्यामधून आत जाते. थोडा वेळ जातो आणि नंतर तिचा आवाज भयाने किंकाळी फोडताना ऐकू येतो, व ती परत बाहेर येते.)
एका भयानक दृश्याने –

वर्णन करण्यासही भीषण भासणाऱ्या अशा –
घालवले मला बाहेर – असहाय्य अवस्थेत,
लटपटत्या पायांनी, अँपोलोच्या निवासातून.
माझे पाय कापताहेत आणि उभे रहावत
नाही मला.
मला कुणीतरी हातांनी आधार द्यायला हवा.
भीती वयस्क स्त्रीला किती दुर्बळ करते.
अगदी लहान मुलाची अवस्था आणते.
जेव्हा मी पुष्पमालांनी सजवलेल्या आतल्या
गाभाऱ्याकडे गेले
तेव्हा तेथील गाभाऱ्यासमोरील चौथऱ्यावर
बसला होता एक याचक
एक कलंकित पुरुष –
दुर्गंधी येणारी, रक्ताने बरबटलेली
तलवार हाती धरून
अजूनही ओले रक्त
दिसत होते त्याच्या हातावर
परंतु त्याच्या मस्तकावर मात्र
सफेद लोकरीचे वेढ्यावर वेढे दिलेली
ताजी ऑलिव्हची पाने होती–
श्रद्धा दर्शवीत होती ती अवधान पूर्ण अशी.
इथपर्यन्त मी साध्या सिध्या शब्दात
सारे काही सांगू शकते
पण, ह्या माणसाजवळ
बाकांवर पसरलेला – झोपलेला
एक विचित्र समूह होता – स्त्रियांचा –
पण छेः, स्त्रिया कसल्या त्या!
गॉर्गॉन राक्षसीच – पण तरीही,
त्या गॉर्गॉन सारख्याही नाहीत
हतर्पिसचे चित्र रेखाटलेले मी एकदा
पाहिले होते.

राजा फायनियसपासून त्याची मेजवानी
हिसकावून घेणाऱ्या राक्षसी होत्या त्या.
पण ह्यांना पंख नाहीत–
काळ्या आणि विलक्षण किळसवाण्या आहेत ह्या.
त्यांचा गलिच्छ श्वास बीभत्स घोरण्यातून
बाहेर पडतो आहे.
त्यांच्या डोळ्यांतून घाणेरडा द्रव स्त्रवतो आहे.
देवांच्या पुतळ्यांसमोर वा मानवी गृहांतून
जो वापरणे दुष्ट खोडसाळपणाचे ठरेल असा
पेहराव आहे त्यांचा.
मी पाहिलेल्या कोठल्याही वंशातले प्राणी
नाहीत ह्या.
कोठलीही भूमी जन्म देऊ शकणार नाही त्यांना
ईश्वराचा आणि मानवाचा शाप माथी बसल्याशिवाय
मी जाते आता
लॉक्सिअस समर्थ आहे
आणि हे मंदिर त्याचे आहे.
मानवांच्या भ्रष्ट झालेल्या भिंती
त्याच्या पावन करणाऱ्या सामर्थ्याची
वाट पहात असतात.
पुरोहित, भविष्यवेत्ता आणि दु:खहर्ता
असलेला तो
आता स्वत:च्या वास्तूचे रक्षण करो.

(पुजारीण आल्या मार्गाने परत जाते. पडदे बाजूला होतात व अॅपोलोचे मंदिर नजरेस पडते. मध्यभागी ऑरिस्टीस एका ओबडधोबड दगडी वेदीजवळ बसलेला दिसतो. हाच तो गाभाऱ्यापुढचा मध्यभागातील चौथरा. त्याच्याशेजारी अॅपोलो व हर्मिस उभे आहेत. त्यांच्याभोवती जमिनीवर किंवा बाकांवर निजलेल्या बारा क्रोधदेवता आहेत.)

अॅपोलो : मी तुला दगा देणार नाही.
अगदी जवळ वा दूर कुठेही असलो

तरी मी तुझा सतत पाठीराखा
आणि तुझ्या शत्रूंच्या हृदयात भय उत्पन्न
करणारा आहे.
आता ह्या एका छोट्याशा तासापुरता
तू ह्या खवळलेल्या राक्षसिणींना
शांत असतांना पहातो आहेस.
झोपेने आपल्या पकडीत घेतल्या आहेत
ह्या शिकार करणाऱ्यांना
पुरातन, वयाचा हिशेब नसलेल्या थेरड्या आहेत ह्या.
ज्यांची उपस्थिती देव, मानव वा पशू
ह्यांना असह्य होते अगदी
दुरितासाठीच जन्म झाला आहे त्यांचा.
आणि दुरिताच्या तिमिरातच त्यांची वसती असते –
अधोलोकीच्या टारटॅरस मध्ये.
मानवांकडून आणि ऑलिंपसवासी देवांकडून
तिरस्कृत असे हे जीव
म्हणून म्हणतो पळ इथून आणि धीर सोडू नको.
अजूनही सागरांवरून आणि बेटांतील शहरातून –
ह्या विस्तृत खंडावरून –
जिथेजिथे भटक्यांच्या पावलांनी भूमी
कठीण झाली आहे तिथेतिथे
पाठलाग करतील त्या तुझा
पण तुझे धैर्य अढळ राहू दे
तुझ्या वाट्याला नियतीने आलेल्या यातना
उराशी बाळग.
आणि अथेन्सला पॅलासच्या शहरी जा.
तिथे याचना करणाऱ्या हातांनी
तिची पुरातन मूर्ती हृदयाशी कवटाळून घे.
आणि तिच्या सहाय्याची भीक माग.
तिथे मी तुझ्यासाठी न्यायाधीश नेमीन
आणि शांतवणाऱ्या विनवण्यांनी

ज्याने तुला प्रथम तुझ्या मातेची
हत्या करण्यास आज्ञापिले
तो मी, तुझ्या साऱ्या यातनामय जीवनातून
अखेर तुझी सुटका करीन.

ऑरिस्टीस : ॲपोलो! स्वामी!
न्याय आणि सत्य ह्यांचे ज्ञान तुलाच आहे.
तुझ्या सदिच्छेने ज्ञानाला स्फूर्ती मिळो
आणि तुझा माझ्याविषयीचा जिव्हाळा सफल होवो.
तू मागे कबूल केलेल्या मदतीसाठी
तुझी शक्ती हीच हमी आहे.

ॲपोलो: ध्यानात ठेव.
कोणत्याही भीतीला तुझ्या अढळ हृदयावर
आक्रमण करू देऊ नको.
हर्मिस, बंधो, त्याच्याबरोबर रक्षक म्हणून जा.
आणि तुझ्या नामधेयाला साजेल असे
आपले कर्तव्य पुरे कर.
त्याचे संरक्षण ही माझीही जिम्मेदारी आहेच.
त्याला वाटेत सांभाळून ने.
हद्दपारालाही त्याचे असे पावित्र्य असतेच.
त्याची कदर झ्यूस करतो.
आणि सुदैवाला त्याला वाट दाखवायला धाडतो.
( हर्मिस ऑरिस्टीसला घेऊन जातो. ॲपोलो मंदिरात परत जातो.
क्लायटेमनेस्ट्राचे पिशाच्च प्रगट होते. )

क्लायटेमनेस्ट्रा : अजून झोपलेल्याच तुम्ही?
अरे उठाना! झोपलेल्या तुमचा उपयोग तरी काय?
तुम्ही याप्रकारे माझ्याकडे अपमानकारक दुर्लक्ष केल्यामुळे
मी त्याच्यासाठी ठार मारलेल्या दुसऱ्या
मृतांकडून सतत धिःक्कारली जाते.

आणि भटकत रहाते अव्हेरलेली
आणि शरमिंदी केली गेलेली अशी,
खरे सांगते मी तुम्हाला
मी अपराधी समजली जाते त्यांच्याकडून
आणि धि:क्कार करतात ते माझा.
पण माझ्या स्वत:च्या पुत्राने जो घाव घातला
त्याच्याविरूद्ध मात्र कोणताच रागीट आवाज
उठवला जात नाही
बघा या इथे. माझ्या हृदयाखालची ही जखम –
आणि सांगा पाहू कोणाच्या तलवारीने ती केली ते!
बघाच! कारण दिवसाच्या उजेडाला
जड देहा पलीकडचे आतले काही दिसत नसले
तरी निद्रिस्त मनाला डोळे असतात.
पुष्कळदा तुमच्यासाठी माझ्या हाताने
मंदिरालाही अर्घ्ये अर्पण केली आहेत.
भारदस्त, शांतवणारी पेये होती ती.
माझ्या गृहाग्नीतली मध्यरात्रीच्या जी वेळ कोणत्याही देवासाठी राखून
ठेवलेली नसते.
विहिता विधी प्रीत्यर्थ
तुम्हाला मोलाची द्रव्ये समर्पण केली
आहेत मी.
पण आता माझ्या साऱ्या भेटी
पायदळी तुडवलेल्या दिसताहेत.
आणि तो अकस्मात उघडल्या गेलेल्या सापळ्यातून
एखाद्या हरीण शावकाने चपळाईने बाहेर उडी टाकावी
तसा निसटून दूर निघून गेलेला आहे.
आणि तुमची चेष्टा करून
शरमिंदे करतो आहे तुम्हाला
ऐका, खोल अधोलोकांतील शक्तींनो,
आणि नीट लक्षात घ्या!
ऐका, मी विनवते तुम्हाला.

कारण माझी विनवणी आहे जीवन मरणाचा प्रश्न!
ऐका, तुमच्या स्वप्नात मी
क्लायटेमनेस्ट्रा
हाका मारते आहे तुम्हाला.
(क्रोधदेवतावृंद अस्वस्थपणे पुटपुटतो कुत्रे झोपेत गुरगुरतात त्याप्रमाणे.)

**क्लायटेमनेस्ट्रा :** तुम्ही पुटपुटता आहात;
पण तुमचे सावज केव्हाच नजरेच्या
पार निघून गेले आहे.
त्याचे मित्र माझ्या मित्रांसारखे नाहीत
ते वाचवतात त्याला
आणि तुम्ही मात्र झोपा काढता आहात.
( पुन्हा क्रोधदेवतावृंद पुटपुटतो. )

**क्लायटेमनेस्ट्रा :** जाग्या होणार नाही का तुम्ही?
माझ्या दुःखाने तुमचे मन द्रवत नाही का!
अहो! तो गेला, निसटला!
ऑरेस्टीस, ज्याने मला
आपल्या मातेला ठार मारले
तो निसटून गेला आहे!
(क्रोधदेवतावृंद जास्तच अस्वस्थ चीत्कार करतो.)

**क्लायटेमनेस्ट्रा :** अजून नुसते चीत्कारच
करीत आहात? अजून झोपल्याच आहात?
आटपा लवकर, जाग्या व्हा आणि
उठून उभ्या रहा.
कामाला लागा एकदम!
दुरित हे तुमचे क्षेत्र आहे.
दुरित वाट पहाते आहे तुमची.
(चीत्कार चालूच रहातात.)

क्लायटेमनेस्ट्रा : निद्रा आणि थकवा
हया दोन एकमेकांना शोभणाऱ्या साथीदारांनी
त्या राक्षसिणींच्या क्षोभाचा जोर
पार ओसरून टाकला आहे.

क्रोधदेवतावृंद : (अधिकाधिक मोठ्याने चीत्कार करीत)
लागा त्याच्या मागे!
धरा, पकडा त्याला, पकडा त्याला,
पकडा त्याला, पकडा त्याला, पकडा त्याला!
संभाळा! जपून!

क्लायटेमनेस्ट्रा : स्वप्नात तुम्ही तुमच्या
सावजाचा पाठलाग करीत आहात.
कधीही सावजाचा ध्यास न सोडणाऱ्या
शिकारी कुत्र्यांसारख्या भुंकत आहां
पण प्रत्यक्ष कृतीचे काय?
थकव्याने आक्रमण केले आहे तुमच्यावर
आणि झोपेने तुम्हाला दुबळे करून टाकले आहे.
त्यामुळे माझ्या यातनांचा विसर पडला
आहे तुम्हाला अखेरीस
चला, उठा.
तुमच्या न्याय्य निंदेने लावा त्याच्या
हृदयाला तळमळायला कारण धारदार शब्द जागरूक
सद्‌सद्‌विवेकबुद्धीला टोचून चालना देतात
तुमच्या दमट गर्भाशयातील उष्ण
रक्ताची दुर्गंधी असलेल्या
वायूच्या जोरदार लोटांचा त्याच्यावर मारा करा.
सुटकेची त्याची आशा जीर्णशीर्ण करून टाका.
मृत्यू येईपर्यन्त त्याची शिकार करीत रहा.
(जसजसा क्रोधदेवतावृंद जागा होतो तसतसे क्लायटेमनेस्ट्राचे पिशाच्च अदृश्य होते.)

क्रोधदेवतावृंद : चल ग उठ, आणि तू सुद्धा उठ.
एकमेकींना उठवा.
चला; उठा सर्वजणी.
झोप झटकून टाका.
उठून उभ्या रहा.
त्या सूचनेला काय बरे अर्थ असू शकेल?
( ऑरिस्टीस निघून गेला असल्याचे त्यांच्या लक्षात येते. )
हे काय घडले बरे?
क्रोधदेवतांनो, आम्ही चकवल्या गेलो आहोत!
आमच्यासारखी फजिती कुणाची
कधीतरी झाली असेल का?
अशी फजिती कोण सहन करील?
अविश्रांत परिश्रम व्यर्थ झाले की!
कर्तव्य धि:क्कारले गेले!
हक्काची पायमल्ली झाली!
बघा तो रिकामा सापळा
आपले सावज नाहीसे झाले
पळाले — पुन्हा मुक्त झाले!
आपण निद्रिस्त असताना आपली
हक्काची गोष्ट हिरावली गेली.
झ्यूसच्या पुत्रा, फीबस्‌देवा
तू खरेच देव आहेस का?
तू तर सचोटी सोडूनच दिलीस!
कनिष्ठ असून तू आपल्याहून ज्येष्ठशक्तीची
वाटेल तशी पायमल्ली करतोस?
तुझ्या वेदीचा मान राखण्यासाठी
तू न्यायाचा अव्हेर केलास
आणि एका नास्तिक घातकाला वाचवलास
त्याच्यासाठी नियत असलेल्या यातनांपासून.
आणि याप्रमाणे मातृपदाची विटंबना केलीस.
अशा वाकड्या व्यवहाराला चांगले कोण म्हणेल?

ग्रीक शोकनाट्ये

माझ्या स्वप्नातच ऐकला मी
एक कठोर दोष देणारा शब्द –
माझ्या हृदयाला खोलवर मर्मस्थानी झोंबला तो
जशी चढ असलेल्या रस्त्यावर
सारथ्याच्या हातातील घट्ट धरलेली पराणी
शरीर जखमी होईपर्यन्त टोचते –
अगदी तसाच,
मी अनुभवते आहे सर्वांना परिचित असलेले पश्चातापाचे तडाखे –
नियतीच्या कणखर हाताने धरलेल्या चाबकाचे –
अनुतापाचे –
ज्याचा थंडगार आणि चिरडून टाकणारा जोर
कोणीही सहन करू शकत नाही.
दोष आपला नाही.
तो आहे त्या लहान वयाच्या देवांचा
ज्यांचा उदय पूर्वी राज्य करणारांच्या जागा बळकावतो
पायरीपासून माथ्यापर्यन्त
बरबटले आहे त्यांचे सिंहासन
सांकळलेल्या रक्ताने.
पहा, पहा, पृथ्वीचा मध्यबिंदू असलेल्या
पवित्र पाषाणाने
आत्मसात केले आहे
असे एक भीषण प्रदूषण
की ज्याची न्यायाला घृणा आहे!
फीबस्, तुला भविष्यवेत्याचे कौशल्य
व पवित्र ज्ञान असूनही
हया कृत्याने, तू तुझ्या स्वयंस्फूर्त इच्छेने,
तुझ्या स्वतःच्या वेदीच्या ज्वाला
अपवित्र केल्या आहेस
देवांनी घालून दिलेल्या दंडकांचा भंग केला आहेस
तसाच नियतीच्या पुरातन पूर्वापार हक्काचाही
कशासाठी? तर एका मर्त्य मानवाची

तात्पुरती गरज भागवण्यासाठी!
नियतीचा शत्रू,
तसाच जो माझाही शत्रू आहे तो
पापाला आश्रय देणार नाही.
ऑरिस्टीस शापित आहे
त्याने जरी मृतांजवळ आश्रय शोधला तरीही
जिथे अपराध क्षम्य आहे असे स्थान
त्याला सापडणार नाही.
लवकरच त्याच्या स्वत:च्याच गोतातला
एक असाच सूड घेणारा येईल
आणि त्याच्या डागाळलेल्या मस्तकावर
नियतीचा शाप पुन्हा ओढवून आणील.
(अँपोलो मंदिराच्या आतून बाहेर येतो. त्याच्या हाती त्याचे धनुष्य आणि बाणांचा भाता आहे.)

अँपोलो : बाहेर व्हा आधी ह्या मंदिराच्या!
मी आज्ञा देत आहे तुम्हाला
ताबडतोब निघून जा!
माझ्या भविष्यवाणीचे पवित्र स्थान सोडून जा.
अन्यथा माझ्या सुवर्णाच्या धनुष्यातून
पंख फुटल्यासारखा झेपावणाऱ्या
चकचकीत सर्पाच्या डंखाचा अनुभव
घ्यावा लागेल तुम्हाला.
आणि मग तुम्ही खुनी मारेकऱ्यांच्या
आंबुस मांसातून शोषून घेत
असलेला काळा फेस,
मोठे कष्ट सोशीत ओकावा लागेल तुम्हाला.
ह्या भिंतींच्या आत जागा कशी मिळेल तुम्हाला?
तुमचे स्थान तिथे
एखाद्या शिक्षा भोगण्याच्या गर्तेत –
जिथे मस्तके तोडली जातात,

डोळे बाहेर खेचले जातात,
गळे कापले जातात,
पौरुष खच्ची केले जाते –
एकाद्या नरकात – जिथे जखमी करणे,
पंगू करणे, दगडांनी चेचणे चालू असते–
जिथे सुळांवर चढवलेली शरीरे
आपल्या विव्हळण्यांनी नि:शब्द हवेला
वितळवून टाकतात–ती तुमची जागा.
अशाच मेजवान्या आवडतात तुम्हाला
ज्यामुळे स्वर्गस्थ, तुमचा तिटकारा करतो.
हे सारे सत्य नाही का?
तुमच्या अंगोपांगात घोषित होते आहे हे.
आकंठ रक्त प्यालेल्या
एकाद्या सिंहाची गुहा शोधा
तिथे तुम्हाला साजेल असे घर करा.
आणि याउपर तुमचा गलिच्छपणा
ह्या प्रार्थना आणि भविष्यवाणीच्या
निवासस्थानाला चिकटवू नका.
जा निघा! राखणदार नसलेल्या कळपा,
दुसऱ्या कुरणांत चर जा!
तुमच्यासारख्यांवर कोणीही देव प्रेम करीत नाही.

क्रोधदेवतावृंद : आता बोलण्याची पाळी माझी आहे.
ॲपोलो, स्वामी,
जो आरोप तू स्वत: आमच्यावर करीत आहेस
त्याला तू – तूच एकटा जबाबदार आहेस.
जे घडले आहे, ती पहिल्यापासून शेवटपर्यन्त
तुझीच करणी आहे.

ॲपोलो : ते कसे काय?
सांगा पाहू मला याबद्दल सारे काही पहिल्यापासून.

क्रोधदेवतावृंद : तुझ्या भविष्यवाणीनेच
त्याला त्याच्या मातेची हत्या करायचा आदेश दिला.

अँपोलो : माझ्या भविष्यवाणीने त्याला
त्याच्या पित्याच्या मृत्यूचा सूड घ्यायला सांगितले.

क्रोधदेवतावृंद : त्याचे हात अजून रक्तरंजित असतानाच
त्याचा रक्षणकर्ता म्हणून तू त्याला पाठीशी घातलेस.

अँपोलो : मी त्याला आश्रयासाठी
ह्या मंदिराकडे धाव घेण्याचा आदेश दिला.

क्रोधदेवतावृंद : त्याचे नेमलेले अनुचर म्हणून
आम्ही इथे उपस्थित आहोत.
मग आम्हाला कशासाठी दोष देतोस?

अँपोलो : तुमची इथली उपस्थिती
म्हणजे अत्याचारच आहे एक प्रकारचा.

क्रोधदेवतावृंद : पण तसेच ते आमचे कर्तव्य
आणि आमचा पदाधिकारही आहे तो!

अँपोलो : वा! मोठाच पदाधिकार आहे हा!
चला, योग्य त्या अभिमानपूर्वक
घोषित करा तुमचा तो पदाधिकार!

क्रोधदेवतावृंद : आम्ही मातृघातकाचा
हिरीरीने पाठलाग करून त्यांना हद्दपार करतो.

अँपोलो : आणि मग जेव्हा पत्नी पतीची हत्या करते
क्रोधदेवतावृंद : तेव्हा तिच्याबद्दल काय करता?

पतीपत्नी काही रक्ताच्या
नात्याने बांधलेले नसतात त्यामुळे
असे रक्त सांडणे स्वत:चे रक्त
सांडल्यासारखे होत नाही.

अँपोलो : तर मग झ्यूस आणि हीराच्या
विवाहबंधनाचा तुम्ही अव्हेर करता
ते पार उखडूनच टाकता.
ते लग्नबंधन तर साऱ्या विवाहबंधनांना पुष्टी देते.
आणि तुमच्या युक्तीवादाने
मर्त्य मानवांच्या आनंदाचे अतिरम्य उगमस्थान –
अफ्रॉडाईटी देवता अवहेलनेचे लक्ष्य होते.
विवाह जो दोन व्यक्तींना नियतीच्या दंडकाने एकत्र आणतो
व जो न्यायनीतीने संरक्षिलेला असतो
तो एकाद्या नुसत्या शपथेपेक्षांही अधिक पवित्र ठरला पाहिजे.
मग, जर जोडप्यातील जी एक व्यक्ती
दुसऱ्याला मारते तिला तुम्ही दया दाखवता
तिला सर्व दण्ड माफ करता,
आणि तिच्यावरचा सर्व राग सोडून देता
आणि ऑरिस्टीसचा मात्र जन्मभर छळ करता.
हे तुमचे करणे अन्यायाचे आहे.
त्याचा गुन्हा तुमच्या मनाला
अत्यंत दोषास्पद वाटतो हे जाणतो मी
आणि त्याच्या आईच्या बाबतीत मात्र तुम्ही अगदी उघडपणे
सौम्य धोरण स्वीकारता
आता पॅलास स्वत:च हा अभियोग ऐकेल
आणि उभयपक्षांच्या प्रार्थना ऐकून
कुणाचा पक्ष न्याय्य आहे ते निश्चित करील.

क्रोधदेवतावृंद : मी ठासून सांगते तुला
मी कधीच ऑरिस्टीसला माझ्या तावडीतून

मुद्दू देणार नाही.

अॅपोलो : करा तर मग त्याचा पाठलाग.
तुम्हाला हवे तेवढे कष्ट घ्या त्यासाठी.

क्रोधदेवतावृंद : फीबस्,
नुसत्या बोलण्यात सुद्धा
माझे अधिकार हिरावून घेऊ देणार नाही
मी तुला.

अॅपोलो : भेट म्हणून सुद्धा
तुझे अधिकार स्वीकारणार नाही मी.

क्रोधदेवतावृंद : झ्यूसच्या सिंहासनाजवळ
श्रेष्ठ मानीत असतील तुला.
पण मी त्याच्या मातेच्या रक्ताचा माग घेत
शोधून काढीन त्याला;
शिकारी कुत्र्यांसारखा पाठलाग करून
गाठीन त्याला
आणि त्याच्या बाबतीत न्याय मिळवण्यासाठी
त्याच्याविरुद्ध अभियोग उभा करीन.

अॅपोलो : तो प्रार्थक आहे माझा.
मी त्याच्या पाठीशी उभा राहीन
आणि शक्यतो वाचवीन त्याला.
जर माझ्याकडे धाव घेणाऱ्या गुन्हेगाराचा
मी त्याग करीन
तर स्वर्गात आणि पृथ्वीवरही
प्रक्षुब्ध क्रोध माझ्याविरुद्ध कारवाई
करण्यास उद्युक्त होईल.
(अॅपोलो बोलत असताना क्रोधदेवतावृंद रंगमंच सोडून निघून जाऊ

लागतो. ॲपोलोही मंदिरात परत जातो.)

दृश्य २ रे

( अथेन्समधले अथीनीचे मंदिर. समोर देवीचा पुतळा आहे. ऑरिस्टीस प्रवेश करतो व पुतळ्यासमोर गुडघे टेकून बसतो.)

ऑरिस्टीस : स्वर्गीय अथीनी!
ॲपोलोच्या सांगण्यावरून आलो आहे मी.
मला कृपापूर्वक आसरा दे.
मी जरी अजूनही पळतच राहिलो आहे
तरी आता पूर्वी सारखा अपवित्र नाही मी
नगरे आणि वन्यजातींमधून दूरवर व
दीर्घकाळ भटकत राहिल्याने
आता माझे रक्तरंजित हात
शुद्ध झाले आहेत.
माझ्या अपराधाची धार बोथट झाली आहे.
स्वागत करणाऱ्या घरांनी
माझ्या अंतरंगातील मालिन्य
घासूनपुसून टाकले आहे.–
आता, माझा भूमी व समुद्रावरचा
लांब दीर्घकालीन प्रवास
पूर्ण झाला आहे.
ॲपोलो लॉक्झिअसच्या आदेशाला
आणि त्याच्या भविष्यवाणीला मान देऊन
मी, हे देवी, तुझ्या निवासस्थानी,
तुझ्या पवित्र मूर्तीपुढे सादर झालो आहे;
माझ्यावरील अभियोगाचा निर्णय
जाणून घेण्यासाठी,
या इथेच रहाणार आहे मी.
(क्रोधदेवतावृंद ऑरिस्टीसचा माग घेत प्रवेश करतो.)

क्रोधदेवतावृंद : हाच आहे त्याचा माग.
अगदी स्पष्टपणे सापडला आहे मला तो.
या, मागोमाग चला.
प्रदूषणाचे अबोल बोट दाखवते आहे
तो मार्ग अनुसरा.
जखमी झालेले व ज्याच्या अंगातून
रक्त गळत आहे असे हरीण
शिकारी कुत्र्यांनी हुडकून काढावे
तसे वासावरून हुडकले आहे आपण त्याला.
जसा धनगर पावलापावलाने सारा डोंगर
विचरून काढतो,
तसा आपण प्रत्येक भूमीभागात शोध घेतला आहे.
पंखांशिवायच सागरावरून उड्डाण केले आहे
तरत्या जहाजांहून चपळ गतीने –
असा केला आहे अविरत पाठलाग.
शेवटी थकवा येऊन धापा टाकू लागलो आम्ही
पण आता इथे सापडणार आहे तो –
मला माहित आहे–
एकाद्या छपण्याच्या जागेत अंग चोरून बसलेला असा –
मानवी हत्येचा वास
खदखदा हसत आहे माझ्या नासिकेत.
बघा ना त्या तिथे!
पहा त्याला!
दिसला अखेरीस एकदाचा!
प्रत्येक दरवाजावर नजर ठेवा
नाहीतर खूनी गुपचूप नजर चुकवून जाईल.
आणि शिक्षा न भोगताच मुक्त होईल!
पुन्हा एकदा त्याला संरक्षण मिळाले आहे.
अमर अशा देवीच्या प्रतिमेला
घट्ट बिलगून बसला आहे तो.
आणि याप्रमाणे त्याच्या हाताने घडलेल्या कृत्यासाठी

त्याने आपला जीव न्यायनिवाड्यासाठी
सादर केला आहे.
कसलीही आशा त्याला
वाचवू शकणार नाही.
एका मातेचे एकदा सांडलेले रक्त
पुन्हा भरून देऊ शकणार नाही कुणी.
नुकत्याच वाहिलेल्या रक्ताचा तो प्रवाह
धुळीला मिळतो आहे –
एक वाळून गेलेला, दोषारोप करणारा डाग.
तुझे रक्त आम्हाला प्यायला द्यावे लागेल तुला
जित्या अवयवातले लालभडक रक्त आमचे आवडते,
भयानक अन्न
आमच्या श्रमांचे यथायोग्य पारितोषिक
मगच होईल तू केलेल्या अपराधाची भरपाई
होय, तुझा श्वासोच्छ्वास अजून चालू आहे तोवरच.
तुझे जीर्णशीर्ण मांस
तिच्या सांडलेल्या रक्ताची भरपाई म्हणून
तिला झालेल्या यातनांबद्दल
प्रायश्चित म्हणून
खाली मृत्यूच्या जगात जाऊन पोचेल.
नीट लक्षात घे हे.
एकट्या तुलाच नव्हे
तर प्रत्येक मर्त्य जीवाला –
जर त्याने अहंकाराने एकदाच उल्लंघिला
मातापितरे, ईश्वर अगर अतिथी ह्यांना
योग्य तो मान देण्याचा कायदा,
तर त्याला द्यावाच लागेल
त्या पापाबद्दल न्याय्य, अटळ कर, दंड म्हणून.
खोलखोल पाताळातील अवकाशात
मानवाच्या आचरणावर मृत्यूचे शासन जारी आहे.
कठोर आणि कणखर शिस्तीचे

आणि असा कोणीही नाही की
जो कुठलेही बळ अगर क्लृप्ती वापरून
चुकवू शकेल मृत्यूची सावधान नजर
वा त्याची प्रत्येक गोष्टीची वेध घेणारी प्रज्ञा.

ऑरिस्टीस : यातनांनी दीर्घकाळ प्रशिक्षित,
पवित्रीकरण विधीत पंडित अशा मला
केव्हा भाषण वैध आहे
आणि केव्हा मौन श्रेयस्कर आहे हे समजते
आणि ह्या प्रसंगी एका शहाण्या गुरूने
बोलायला सांगितले आहे मला.
माझ्या हातांना लांछित करणारे रक्त
कमजोर झाले आहे – शांत झाले आहे.
मातृहत्येचा डाग स्वच्छ धुतला गेला आहे.
अजून ताजा असतानाच
फीबस्च्या वेदीवर शुद्ध करणाऱ्या
रक्ताच्या अर्घ्यांनी
पापमुक्त केला गेला आहे तो.
ज्या ज्या मित्रांनी त्यांच्या घरात
हात पुढे करून –
त्याबद्दल त्यांच्यावर कोणताही दोष नाही आता
अगर त्यांना काहीही अपाय नाही झाला –
माझे स्वागत केले
त्या साऱ्यांचा नामोच्चार करायला
फार फार वेळ लागेल.
आणि आता पवित्र ओठांतून,
शुद्ध शब्दांनी
मी आवाहन करतो माझ्या सहाय्यार्थ
अथीनीला – ह्या भूमीच्या साम्राज्ञीला.
त्यामुळे तिला लाभेल –
एकही घाव घातल्याशिवाय –

केवळ एका न्याय्य कराराने –
माझे, माझ्या देशाचे व आरगॉसच्या
माझ्या नागरीकांचे
सतत, एकनिष्ठ, संपूर्ण, स्नेहशील, संघटित
अनुयायित्व.
ती ट्रिटॉन सरोवराजवळ –
आपल्या लिबियातील निवासस्थानी असो वा –
विश्रांती घेत किंवा
आपल्या स्नेह्यांची बलशाली रक्षणकर्ती बनून
झुंजत असो
किंवा योद्ध्याच्या धीट, अधिकारपूर्ण नजरेने
फ्लेग्रसच्या मैदानाचे निरीक्षण करीत असो –
त्या देवतेला माझे भाषण ऐकू जाणारच.
आता येऊ दे तिला देवाधिष्ठित अधिकाराने
आणि वाचवू दे माझ्या आत्म्याला!

क्रोधदेवतावृंद : अथीनी वा अॅपोलो –
कोणामध्येही सामर्थ्य नाही तुला वाचवण्याचे.
अगतिक झालेला, सर्वांनी त्याग केलेला.
आनंदाची चवसुद्धा विसरलेला असा तू.
रक्त शोषक पिशाच्यांचे भक्ष्य बनून
रहाशील –
केवळ एक रक्तहीन भूत बनून.
मुग्ध राहून माझ्या शब्दांचा अवमान
करतो आहेस तू?
अरे, तू तर आता माझ्या ताब्यात दिला
गेला आहेस,
मला समर्पण झाला आहेस!
कट्यार वा वेदीची वाट पहाण्याची काही
गरज नाही.
कारण तुझ्या जित्या मांसावरच ताव

## युमेनीडीज्

मारणार आहोत आम्ही.
आमच्या संकल्पाला तुला बांधून घालणारे
आमचे हे गीत ऐक

या क्रोधदेवतांनो
आपला निश्चय दृढ झालेला आहे
आता हावभाव व ताल
आपला मार्ग चोखाळू देत
म्हणजे आमच्या भयानक संगीताचा
वेड लावणारा जोर जो अनुभवील
तो कधीही विसरणार नाही की
मानवांची आयुष्ये निबद्ध करणाऱ्या
भिन्नभिन्न दैवी घटना
आमच्याच संकल्पानुसार त्याच्या वाट्याला
जात असतात.
आमचा निर्णय
सच्चा आणि न्याय्य असतो
ज्या माणसाचे, काहीही छपवून न ठेवणारे
हात शुद्ध असतील
त्याचा पाठलाग आमचा क्रोध करणार नाही
त्याचे जीवन निर्विघ्न व सुरक्षित राहील.
पण जेव्हा ह्याच्यासारखा एकादा पापी
अशा हीन प्रकारे सांडलेल्या रक्ताच्या
भाराने दबून
लज्जेने आपले अपराधी हात झाकून घेतो
तेव्हा मृतासाठी साक्षी राहून
आम्ही त्याचा न्याय करण्यास सज्ज होतो.
व त्या सांडलेल्या रक्ताच्या किंमतीची
मागणी करतो ठामपणे.

ऐक माझे,

## ग्रीक शोकनाट्ये

हे चिंतनमग्न रात्री
माझ्या माते – तुझ्या गर्भातून
मी, जे पृथ्वीवर सूर्यप्रकाशात रहातात
किंवा जे कबरीपलीकडे जाऊन चाचपडतात,
त्यांना शिक्षा करण्यासाठीं जन्म घेतला.
फीबस् माझे पदनिविष्ट कार्य आणि
माझा अधिकार –
आणि माझे पिंजऱ्यात अडकलेले
व भीतीने दबून बसलेले सावज
हिरावून घेऊ पहात आहे.
ज्या रक्ताने त्याच्या रक्ताचा गर्भभार वाहिला
त्या रक्ताच्या बाबतीतल्या त्याच्या अपराधाची,
त्या हिंसक पापाची
भरपाई व्हायलाच पाहिजे त्याच्या यातनांनी
आता, वेदीच्या जवळ
आमच्या विधीकर्मासाठी
सर्वथा सज्ज असलेल्या बळी भोवती
हे भारलेले गीत गा.
या गीताला वाद्याची साथ नाही
पण पंचेंद्रियात घुसणारी तलवार आहे ही,
हृदयात वादळ उठवणारी
मस्तिष्कात आगीचा लोळ भडकवणारी.
विवेक बधिर करून टाकणारा
हा क्रोधदेवतांचा प्रचंड गोंगाट आहे.
भयभीत करणारे सूर आहेत हे.
अंतरंग शुष्क करून टाकणारे.
जिची सर्वशक्तीमान सत्ता
विश्वाच्या व्यापाला आकार देते
त्या नियतीने अनंत काळापर्यन्त
हा कार्यभाग माझा असल्याचा दंडक
घालून दिला आहे.

## युमेनीडीज्

जेव्हा एकाद्या जीवघेण्या घावासाठी
अपराधित्वाच्या टोचण्या
मानवाच्या मूर्खपणाला अचानक घेरतात
तेव्हा त्याचा मृत्यूदिन येईपर्यन्त
आम्ही त्याची पाठ सोडीत नाही.
आणि "अधोलोकात दुःखापासून सुटका होते."
असे म्हणणारी आशा असत्यवादी ठरते.
आता, वेदीच्या जवळ
आमच्या विधी कर्मासाठी
सर्वथा सज्ज असलेल्या बळीभोवती
हे भारलेला गीत गा.
या गीताला वाद्याची साथ नाही
पण पंचेंद्रियात घुसलेली तलवार आहे ही,
हृदयात वादळ उठवणारी
मस्तिष्कात आगीचा लोळ भडकवणारी.
विवेक बधिर करून टाकणारा
हा क्रोधदेवतांचा प्रचंड गोंगाट आहे.
भयभीत करणारे सूर आहेत हे.
अंतरंग शुष्क करून टाकणारे.
ज्या दिवशी
आम्ही गर्भाशयात प्रवेश केला
त्या दिवशीच आमच्या हक्कांवर
शिक्कामोर्तब झाले
की मर्त्यांनी केलेल्या पापांच्या विरूद्ध
आमचा हात आम्ही उघडपणे उठवावा
अमरदेवांना मात्र आमच्याकडून भीति नाही.
आमच्या हक्काच्या मेजवान्यांत कुठल्याही
देवाला वाटा मिळू शकणार नाही.
जेव्हा मंदिरात पांढऱ्या झग्यांची गर्दी होते.
तेव्हा आम्ही परिधान करीत असलेला
अंधःकार

आमच्या उपस्थितीस मनाई करतो.
छळ करणे आणि थोरांचे अध:पतन
घडवून आणणे
हे आमच्यासाठी निवडलेले काम आहे
जेव्हा युद्ध स्वगृहाकडेच, वळते
आणि एक आप्त
आपल्या दुसऱ्या आप्तालाच रक्त वहावतो
तेव्हा तो बलाचा उच्चांक गाठीत असतानाच
आम्ही त्याची शिकार करतो.
आणि त्याचा गौरव धुळीला मिळवतो.
हे कार्य
मोठ्या उत्साहाने आम्ही हाती घेतो
आणि काळजीपूर्वक आणि कष्ट घेऊन
त्याचा पाठपुरावा करतो
म्हणजे मग देव ह्या कार्यापासून मुक्त रहातात.
कोणताही कलंक नसलेला व
कुठल्याही संशयास्पद कृत्यापासून
अलिप्त असणारा झ्यूस
आमच्या रक्तलांछित उपस्थितीला
घृणेने व तिरस्काराने झिडकारतो.
पण त्याच्या कार्यपूर्तीसाठीच
आमचा भीती उत्पन्न करणारा पदरव
उच्च स्थानाहून वाटचाल करीत खाली
झेप घेतो.
तीक्ष्ण व चिरडून टाकणारा असतो
त्याचा जोर
शेवटी अगतिक, हताश अपराध
जीव खाऊन पळता पळता कोसळून पडतो
आणि याप्रमाणे
आकाशापर्यन्त उंचावलेल्या
मानवांच्या गौरवगाथा

## युमेनीडीज्

काळे झगे घातलेल्या आमच्या
आक्रमणाबरोबर
नशिबांची घडामोड करणाऱ्या आमच्या
पदन्यासाच्या ठेक्यावर
सुडाच्या पुढे सरसावल्याबरोबर
भूमीखाली कोमेजून पडतात
आणि अपमानित अवस्थेत नष्ट होतात.
आणि मानवाच्या
अध:पतनात
ज्याच्या स्वत:च्या हातावरील प्रदूषण
एकाद्या विरळ अंधाऱ्या छायेप्रमाणे
त्याच्याभोवती घिरट्या घालते
आणि त्याच्या मनातील गोंधळात
अधिकाधिक अंधार कालवते.
दरम्यान विव्हळणारी भुते
त्याच्या घराच्या नाशाचे गाणे
पुन्हा पुन्हा गात रहातात.
कारण
ईश्वरी कायद्याचे साम्राज्य सतत
चालूच रहाते
आणि आम्ही – त्या कायद्याचे निवडक
पवित्र हस्तक –
आतापर्यंत घडलेल्या साऱ्या दुरितांची
ईश्वरी कायद्याने ठेवलेली सजीव नोंद
युक्तीप्रयुक्तीने कार्यवाही करणाऱ्या आम्ही
कोणत्याही सन्मानाची आशा नसताना
आमचे तिरस्कृत कर्तव्य सतत करीत रहातो
आणि कोणाच्याही विनवणीने आमचे
मन द्रवत नाही.
सजीव आणि मृत –
दोन्ही तिथे ठेचाळावे

म्हणून ज्या सूर्यप्रकाशाला अंतरलेल्या
अंधाऱ्या रस्त्यांवर
आम्ही दगडधोंडे विखरून टाकतो
त्या वाटा दुसऱ्या देवांनी टाळाव्या.
ह्याप्रमाणे
जे काम नियतीने आमच्या निष्ठेला
अटळपणे सोपवले आहे
त्याबद्दलचा स्वर्गाचा दृढ आदेश
आता सांगितला गेला आहे.
मग योग्य ते भय बाळगल्याशिवाय
आणि आदर दाखवल्याशिवाय कोण राहील आता ?
आमचा निवास जरी
अंधांच्या अधोलोकातील विवरात असला
तरी आमचा पुरातन हक्क कोणी नाकारू
धजत नाही.

( अथीनी तिच्या मंदिरातून बाहेर येते )

अथीनी : दूर वरून माझ्या नावाचा
मोठ्याने उद्घोष आलेला माझ्या कानी आला
अ‍ॅकिआच्या सेना नायकांनी मला दिलेली
भूमी ताब्यात घेण्यासाठी
धाईधाईने स्कॅमँडर नजीक गेले होते मी.
युद्धातील लुटीतून निवडलेली ही
बहुमोल देणगी
थीसीयसच्या पुत्रांनी संपूर्णपणे व
सतत भोगावी
म्हणून दिली गेली आहे.
पण चटकन् तिथून आले मी.
पाय किंवा पंख ह्यांना बिलकुल
कष्ट न देता.

भरवेगाने दौडणाऱ्या वाऱ्यांना
माझ्या गर्जणाऱ्या ढालीला जुपून
प्रवास केला मी.
माझ्या प्रांगणात
दिसत असलेल्या ह्या विचित्र समुहाने
माझे मन हेलावले आहे.
भीतीने नव्हे तर नवलाने.
कोण आहात तुम्ही?
मी साऱ्यांना उद्देशून बोलते आहे–
माझ्या पुतळ्याला प्रार्थक म्हणून
घट्ट कवळणाऱ्या ह्या माणसाला उद्देशून
आणि तुम्हालाही–
मी भूमीवर उपजणाऱ्या ज्या जीवांना ओळखते
त्यातील कोणाशीच साम्य नाही तुमचे.
तुम्ही देव - देवतामध्येही कधी दिसला नाहीत.
अथवा मर्त्य मानवांसारख्याही तुम्ही नाही-
पण मी हा अन्याय करीत आहे तुमच्यावर
काही कुरापत काढलेली नसतांना
दुसऱ्यांना विनाकारण निंदणे
विवेकबुद्धीला संमत नाही.

क्रोधदेवतावृंद : झ्यूसच्या कन्ये
अगदी थोडक्यात आम्ही सारे सांगतो
ते तू ऐकून घे.
आम्ही पुरातन निशेची अपत्ये आहोत
अधोलोकातील आमच्या खोल घरी
आम्हाला शापदेवता असे नाव आहे.

अथीनी : तुमचा वंश मला माहित आहे
तसेच सर्वसाधारण भाषणात तुमची
नावे आलेली मी ऐकली आहेत.

क्रोधदेवतावृंद : शक्य आहे. आता तू आमचे पदनिविष्ट कार्यही ऐक.

अथीनी : संतोषाने
मात्र सरळ शब्दात सांगा काय ते.

क्रोधदेवतावृंद: आम्ही हत्या करणारांना
हाकलून काढतो.

अथीनी: आणि अशा निराधार भटक्याला
आराम आणि शांती कुठे लाभू शकते?

क्रोधदेवतावृंद: जेथे आनंद व सुखसोई
ह्यांचे नावही ऐकू येत नाही
तेथे.

अथीनी : आणि या उद्देशानेच तुम्ही
आरडाओरडा करीत ह्या माणसाचा
पाठलाग करता आहा?

क्रोधदेवतावृंद: होय, त्याने जाणीवपूर्वक
मातेची हत्या केली आहे.

अथीनी : जिच्या कोपाला तो भ्याला
अशी कुणी त्याच्यावर जबरदस्ती करणारी
शक्ती तर नव्हती त्याच्या कृत्या मागे?

क्रोधदेवतावृंद : एकाद्या माणसाला
मातृहत्येला प्रवृत्त करील अशी शक्ती
कोणाजवळ आहे?

अथीनी : एका बाजूचे समर्थन मांडले

गेले आहे.
पण दोन्ही बाजू ऐकायच्या आहेत अजून.

क्रोधदेवतावृंद: पण त्याने आम्हाला
कोठलीही शपथ घ्यायला लावू नये
वा स्वत:ही शपथ घेऊ नये.

अथीनी : प्रत्यक्ष न्यायापेक्षा तुम्ही न्यायाच्या
पद्धतीवरच भर देत आहात.

क्रोधदेवतावृंद : ते कसे काय? समजावून सांगा मला.
भाषणात सूक्ष्म छटा घालण्याच्या
कौशल्यात कमी नाही तुम्ही.

अथीनी : केवळ शपथांवर भार देऊन
अन्यायाने आपल्या बाजूने निकाल लावून
घेता कामा नये.

क्रोधदेवतावृंद : तर मग उचित रीत्याच
त्याचा अभियोग चालू दे.
आणि प्रत्यक्ष घटितांवर आधारित
असाच निर्णय द्या.

अथीनी : ह्या अभियोगात अखेरचा
निकाल माझा राहील हे मान्य करता तुम्ही?

क्रोधदेवतावृंद : होय. आमचा तुमच्या
शहाणपणावर आणि तुमच्या पिताश्रींच्या
थोर नावावर विश्वास आहे.

अथीनी : माझ्या मित्रा,

आता तुझी बोलायची पाळी आहे
काय सांगणार आहेस तू?
न्यायावरच्या तुझ्या श्रद्धेने
तुला माझ्या पुतळ्याकडे आणले
एक पवित्र याचक म्हणून –
इक्सीऑन प्रमाणे–
माझ्या वेदीजवळ आलास तू
म्हणून प्रथम सांग
तुझा देश कोणता, तुझा जन्म कुठला
आणि आरोपाची सर्व पार्श्वभूमी विशद कर.
मग ह्या आरोपाला उत्तर दे.
आणि तुझे बोलणे सरळ स्पष्ट असू दे.

ऑरेस्टीस : अथीनी देवते,
प्रथम तुझ्या शेवटच्या शब्दांच्या अनुरोधाने
मी एका मोठ्या शंकेचे आधी निराकरण करतो
माझे हात कलंकित नाहीत
तुझ्या पुतळ्याच्या पायाशी बसलेला मी
लांछित नाही.

आणि ह्याबद्दलचा तोलामोलाचा पुरावा
मी तुझ्यापुढे ठेवतो.
रक्त सांडण्याचा गुन्हा करणाऱ्या मानवाला
कायद्यानुसार बोलण्याची बंदी असते
मानवहत्येच्या दोषांपासून शुद्धीकृत करणे
हे ज्यांचे काम असते
त्यांनी एकाद्या पशूच्या पित्या शावकाच्या
रक्ताचे थेंब
त्याच्यावर टाकीपर्यन्त तो बोलू शकत नाही
पुष्कळ काळापूर्वी
हे सारे विधी माझ्यासाठी इतर

युमेनिडीज्

मंदिरात करण्यात आले होते
पशू बळी दिले गेले होते
पवित्र पाणी शिंपडले गेले होते
तर मग तो प्रश्न अशा रीतीने
मी निकालात काढला आहे.
माझ्या जन्माबद्दल म्हणशील
तर मी आरगॉसचा आहे
आणि तू माझ्या पित्याला चांगले ओळखतेस
कारण ट्रॉय ही नगरी नामशेष करण्यासाठी
तुम्ही दोघांनी हातमिळवणी केली होती.

ॲगमेमनॉन
त्या लढाऊ नौकांच्या
ताफ्याचा प्रमुख — हा माझा पिता.
जेव्हा तो परत स्वगृही आला
तेव्हा त्याला लज्जास्पद मरण आले
माझ्या काळ्याकुट्ट हृदयाच्या मातेने
त्याला कपटी जाळ्यात गुरफटून टाकले
आणि त्याची हत्या केली.
माझा पिता स्नानपात्रात युद्धाचे डाग
धुवून काढीत असता
त्याच्यावर जो प्राणघातक वार पडला
त्याची खूण त्या अंगरख्यावर पुरावा
म्हणून सापडेल.
जेव्हा
अनेक वर्षांच्या हद्दपारीनंतर मी
स्वगृही आलो
तेव्हा मी माझ्या मातेची हत्या केली
नाकारीत नाही मी ते—
माझे ज्यांच्यावर प्रेम होते
त्या माझ्या पित्याखातर न्याय्य बदला

घेण्यासाठी मी केले होते ते कृत्य
ह्या कृत्याला अँपोलो पण माझ्याइतकाच
जबाबदार आहे.
त्याने मला सांगितले कोणत्या यातना
माझ्या आत्म्याला होरपळून टाकतील
जर मी त्या खुन्यांचा बदला घेण्यात
हलगर्जीपणा केला तर
मी यथायोग्य ते आचरण केले की नाही
त्याचा निर्णय तू करायचा आहेस.
तुझा शब्द मानायला सिद्ध आहे मी–
मग त्यायोगे मला जीवन लाभो वा मृत्यू.

अथीनी : हे प्रकरण इतके गंभीर आहे की
कोणीही एक माणूस त्याचा निर्णय
करू शकणार नाही.
शिवाय हत्येच्या प्रकरणात
माझ्या निर्णयाने न्यायदेवतेचा प्रक्षोभ
उफाळून उठावा
हेही रास्त नाही.
तू शुद्धीकरणाचे संपूर्ण विधी पुरे करून
पवित्र याचक म्हणून
माझ्या मंदिरात आलास आणि
मी व अथेन्स नगरीने
तुझे स्वागत करून तुला आश्रय दिला –
या गोष्टीमुळे तर तसे करणे
मुळीच योग्य ठरणार नाही.
पण तुझ्यावर आरोप करणारांची मागणी
झिडकारून टाकता येणार नाही
आणि जर ते आपला दावा जिंकू शकले नाहीत,
तर त्यांचा कोप–
मृत्यू व भय, सत्यानाश व विषप्रयोग

ह्यांच्यासारखा माझ्या भूमीवर कोसळेल
म्हणून मला मोठा प्रश्न पडला की
त्यांचे म्हणणे स्वीकारावे की
घालवून द्यावे त्यांना!
पण यापैकी काहीही केले तरी
परिणामी संकट आणि कुचंबणाच
तर मग ज्या अर्थी निर्णय मलाच करणे प्राप्त आहे
त्याअर्थी मी मानवहत्येच्या न्यायासाठी
एक कायमचेच न्यायासन स्थापून पंच निवडते
आणि त्यांच्या हाती माझे निर्णयाचे
अधिकार सोपवते.
तुमचा पुरावा सादर करा.
अशा साक्षीदारांना बोलवा की
ज्यांच्या शपथांनी न्यायाचे हात बळकट होतील.
मी माझे सर्वात सूज्ञ नागरीक निवडते
आणि त्यांना इथे बोलावून
शपथ घेववते त्यांच्याकडून
न्यायाला आणि सचोटीला धरून निर्णय देण्याची.

(अथीनी नगरीच्या बाजूला जाते. ऑरिस्टीस मंदिरात जातो.)

क्रोधदेवता : आता सत्य आणि असत्य
ह्यांची नावे बदलायला हवीत,
जुना कायदा आणि न्याय यांची
उलटापालट करायला हवी.
जर नवे अधिकारी
हा मारेकरी ज्याचा आग्रह धरीत आहे
त्या अन्यायी हक्काला अग्रक्रम देणार असतील तर
त्याच्या कृत्यामुळे आता
प्रत्येक माणसाला
गुन्हयाचा सोपा पथ वाटू लागेल जास्त चांगला.

आणि ह्यापुढील काळात
मातापित्यांचे रक्त मुलांच्या हातांवर
चमकत राहील शापित होऊन,
आजच्या दिवसाने सुरू केलेले ऋण फेडण्यासाठी
क्रोधदेवतांचा जागृत क्रोध होईल निद्रिस्त
गुन्हेगार जीवाचा कोणताही प्रकोप
करणार नाही पाठलाग.
धिक्कारील हत्या माझे हरपलेले दडपण
आणि दरम्यान शेजारीपाजारी
घडलेल्या अन्यांयाबद्दल बोलतील आणि रडतील
आणि विचारतील की,
शरीराने ह्याहून अधिक सोसावे तरी कसे
अथवा अशुभाचा फोफावत जाणारा प्रवाह
अडवावा तरी कसा
पुढे येतील चांगले दिवस म्हणून आशा
तरी कशी धरावी ?
आणि इकडे आपला प्रत्येक दुर्दैवी जीव
कुठलातरी निरर्थक उपाय सुचवीत रहातो!
कठोर दुर्दैवाच्या आघाताने
स्तंभित झालेल्या कोणाही मानवाने
आता घेऊ नये आमच्याकडे धाव
पुराण्या विनवण्या सुरावर उच्चरित—
"या, बदला घेणाऱ्या वेगवान क्रोधदेवतांनो!
हे न्यायाच्या खड्.गा
पडू दे तुझा घाव!
कधी कधी एकादा पिता व माता
दुर्दैवाचा घाला सोसणारा
किंवा भाग्याची पाठ फिरलेला
उच्च स्वराने दुःखाचे रडगाणे गाईल—
पण व्यर्थच—
बिचाऱ्याला ह्या नव्या दुष्टपणाची ओळखच

झालेली नसेल अजून –
जो (दुष्टपणा) लवकरच
सन्मार्गाच्या निवासस्थानापर्यन्त पोचेल
आणि सर्वनाश करील त्याचा.
कारण भीती –
चांगुलपणाने वागायला लावणारी भीती –
कुठेतरी झालीच पाहिजे सिंहासनाधिष्ठित
मानवांच्या व्यवहारांवर लक्ष ठेवून तिने
शिकवले पाहिजे त्यांना–
त्यांनी स्वत:च आपल्यावर ओढवून
घेतलेल्या दु:खाच्या द्वारा
की पापाला क्षमा केली जात नाही कधीही.
ज्याने सोडून दिले आहे आपल्या हृदयात
भीती बाळगणे
असा कोणता माणूस –
अथवा भय एकदा दूर
भिरकावून दिल्यावर
कोणती नगरी
पूर्वी एके काळी लववीत होती तशी
न्यायदेवतेपुढे आता यापुढे लववील मान?
सक्ती करणारे कायदे नसले
तरीही आसक्ती नसावी स्वैराचरणावर
तशीच जुलमी सत्तेच्या आसुडाखालची गुलामीही
कधीच नये स्वीकारू.
जिथे असतो स्वातंत्र्य आणि सत्ता ह्यांचा समतोल
तिथे देवाची देणगी म्हणून लाभते यश
मात्र तो ही सूत्रे हलवतो कशी
ते सांगू शकणार नाही कोणीही.
अगदी यथायोग्य आहे हे सत्य.
हृदयातील अश्रद्धा प्रसवते –
हातानी घडवते अपकृत्ये, आपल्याच तोंडवळ्याची.

पण जेव्हा हृदय असेल निष्कलंक
तेव्हा उपजतात दीर्घकाल वांछित वरदाने
आणि समृद्धी.
पण सर्वात आधी मी देते
आहे आदेश तुम्हाला
की मान द्या न्यायदेवतेच्या उच्च वेदीला
दृष्टीपथातला कोणताही लाभ
अश्रद्ध औद्धत्याने
हे पावित्र्य धि:क्कारण्याचा मोह
तुम्हाला न पाडो.
कार्यकारणभाव शाश्वतच रहातात.
पापापासून उद्‌भवते दु:ख
म्हणून मानवाने
आपल्या मातापितरांचे जीवित आणि
त्यांची प्रतिष्ठा
ह्यांची केली पाहिजे कदर
आणि जाणाऱ्या येणाऱ्या प्रत्येक अतिथीला
सन्मानले पाहिजे आदराने
आणि दिले पाहिजे त्याला संरक्षण.
सत्प्रवृत्तीबद्दल जो बाळगतो
सहर्ष प्रेम
त्याच्या समवेत रहातात संपत्ती आणि सन्मान
स्वायत्त, कुठल्याही बाह्य दडपणाशिवाय.
सदाचाराला नसते भीती
अकाली होणाऱ्या भीषण अंताची
पण ज्या माणसाची हट्टी प्रवृत्ती
प्रत्येक कायद्याचे बंधन झुगारून
त्याला हाकारायला लावते त्याचे तारू
अविवेकी, विपरीत मार्गावर,
त्याला केव्हा ना केव्हा तरी
आपली शिडे गुंडाळणे भाग पडते,

पश्चाताप करीत बसतो तो
फार उशीरा –
जेव्हा वादळाने त्याच्या शिडाच्या चिंधड्या होतात
आणि त्याच्या डोलकाठीचे होतात तुकडे.
उधाण आलेल्या सागरात
अगतिक ठरलेले, धडपड करीत असलेले हात
आणि व्यथाभरित आरोळ्या
बेफिकिर आकाशाकडे करूणा भाकतात
आणि मुर्खपणा सोडून
त्याने निराशेचा अवलंब केलेला पाहून–
बढायांची जागा भयाने घेतलेली पाहून
स्वर्गस्थ देव हास्य करतो–
तरीही वादळी, खडकाळ सुळक्यावर
त्याचे जहाज आपटून फुटल्यशिवाय रहाणार नाही.
हे लक्षात घेऊन
आणि तिथेच न्यायाच्या खडकावर
आदळतील त्याची पूर्वायुष्यातील वरदाने
आणि नष्ट होईल तो कायमचा –
कोणी ढाळणार नाही अश्रू त्याच्यासाठी
नावही रहाणार नाही त्याचे मागे."

(अथीनी आपल्या अथेन्सच्या बारा नागरीकांना घेऊन परत येते. ॲपोलो ऑरिस्टीसला घेऊन मंदिरातून येतो.)

अथीनी : दूता, शहरातील सर्वांना बोलाव.
आणि आजचा कार्यभाग घोषित कर
भर मानवीश्वासाने, टिन्हेनिआची तुतारी
आणि विशाल नभ फाटू दे तिच्या आवाजाने
आणि हादरू दे त्या आवाजाने अथेन्स नगरी.
आणि सभागृहात सदस्य आसनस्थ होत असतांना
मी आज निर्माण करीत असलेल्या

शाश्वत न्यायालयाचा
नि:शब्द स्वीकार करू देत, सर्व नागरिक आणि पंच मंडळी
आज आणि सर्वकाळ
न्यायदानाचा यथायोग्य विचार व्हावा म्हणून.

क्रोधदेवतावृंद : स्वर्गीय अँपोलो,
तुझ्या अधिकारात असेल त्यालच हात घाल
आधी सांग आम्हाला
ह्या प्रकरणात ढवळाढवळ करण्याचा काय
आहे तुला अधिकार?

अँपोलो : मी माझ्या साक्षीत
त्याचेच उत्तर देण्यासाठी आलो आहे.
याचकांना लागू असलेल्या कायद्याप्रमाणे
माझे लाभले आहे त्याला संरक्षण
मी ह्या हत्येच्या कलंकापासून
केले आहे त्याला मुक्त
मी इथे आलो आहे त्याचा बचावाचा
वकील म्हणून
कारण ज्या त्याच्या
घावाने झाला त्याच्या
मातेचा अंत
त्याला मीच आहे जबाबदार
पॅलास, कर ह्या दाव्याचा प्रस्ताव
आणि चालव तो तुझ्या प्रज्ञेच्या सूचनेनुसार.

अथीनी : दावा प्रस्तुत झाला आहे आता.
(क्रोधदेवतावृंदाच्या नायिकेला.)
तुम्ही आहात फिर्यादी
तेव्हा बोला तुम्ही प्रथम.
न्यायालयाला प्रथम घेतली पाहिजे ऐकून

आरोपाची संपूर्ण अंगोपांगे.

क्रोधदेवतावृंद : आम्ही संख्येने आहोत विपुल
पण तरी थोडेच शब्द पुरे होतील आमच्या कार्यसिद्धीला.
(ऑरिस्टीसला उद्देशून)

आणि तू दे उत्तरे आमच्या प्रश्नांना
मुद्द्याला मुद्दा भिडवून.
पहिला प्रश्न, हत्या केलीस तू तुझ्या मातेची?

ऑरिस्टीस : नाकारू शकत नाही मी हे.
होय, केली मी हत्या.

क्रोधदेवतावृंद : ठीक, ठीक. पहिली फेरी तर
जिंकलीच आम्ही.

ऑरिस्टीस : बढाई मारण्याची घाई होते
आहे फार.
मी हरलो नाही अजून.

क्रोधदेवतावृंद : तरीपण तू हवेस आम्हाला सांगायला
कशी केलीस तू तिची पाठवणी परलोकी?

ऑरिस्टीस : विद्ध केले मी तिचे हृदय
माझ्या खड्‌गाने.

क्रोधदेवतावृंद : कोणाच्या शिकवणीने?
कोणाच्या सल्याने?

ऑरिस्टीस : अॅपोलोच्या
त्याच्या भविष्यवाणीने दिला मला आदेश

तो स्वत:च साक्षी आहे याचा.

क्रोधदेवतावृंद : भविष्यवाणीच्या अधीशाने
मातृहत्या करण्याचा आदेश दिला?

ऑरिस्टीस : होय, आणि कधीही आपला
पाठिंबा काढून घेतलेला नाही त्याने त्या
दिवसापासून आजपर्यन्त.

क्रोधदेवतावृंद : जर आजच्या मताने ठरवले
तुला दोषी
तर तुझे शब्द बदलावे लागतील तुला.

ऑरिस्टीस : माझा विश्वास आहे त्याच्यावर.
माझा मृत पिताही मला धाडील सहाय्य.

क्रोधदेवतावृंद : होय. विश्वास ठेव आता
मृतांवरच.
तुझ्या हातूनच जीवघेणा घाव पडून
मृत झाली तुझी माता.

ऑरिस्टीस : द्विगुणित होता तिचा अपराध.
आणि द्विगुणित दण्डय होती ती.

क्रोधदेवतावृंद : ते कसे काय?
न्यायालयाला स्पष्ट करून सांग.

ऑरिस्टीस : तिने तिच्या पतीची हत्या केली
आणि माझ्या पित्याची पण.

क्रोधदेवतावृंद : तिच्या मृत्यूने मुक्त केले

तिला पापापासून
पण तू मात्र अजून जिवंत आहेस.

ऑरिस्टीस : पण ती होती जिवंत
तेव्हाच का केली नाहीत शिक्षा तुम्ही तिला?

क्रोधदेवतावृंद : ज्याची हत्या केली तिने
तो नव्हता तिच्या स्वतःच्या रक्ताचा.

ऑरिस्टीस : पण मी आहे माझ्या मातेच्या रक्ताचा?

क्रोधदेवतावृंद : नीच अधमा!
तिने तुला धारण केले नाही का तिच्या उदरात?
जे वाहते आहे तुझ्या धमन्यात.
ते तुझ्या मातेचे रक्त –
तू नाकारतो आहेस की काय ते?

ऑरिस्टीस : ॲपोलो आता तू दे साक्ष.
मी तिची हत्या केली –
हे योग्य होते का ते कृत्य?
स्पष्ट करून सांग मला.
मी तो वार केला खराच
कबूल करतो आहे मी ते.
पण ही हत्या न्याय्य होती का–
ह्या मुद्द्याचे विवरण कर.
आणि माझी बाजू मी कशी मांडावी
ते दाखव मला.

ॲपोलो : हे अथीनीच्या वंद्य न्यायालया
मी न्याय आणि सत्य यांना स्मरून,
बोलतो आहे तुमच्यापुढे–

एका भविष्यवेत्या देवाला
शोभेल असेच.
आतापर्यन्त मी कधीही
भविष्यवाणी सांगण्याच्या माझ्या स्थानावरून
पुरूष, स्त्री वा नगरी
ह्यांच्याबद्दल उच्चारला नाही असा एकही शब्द
जो ऑलिंपीयानिवासी पिता झ्यूस
ह्याने नियमबद्ध असा आदेशिला नव्हता.
मी निक्षून सांगतो तुम्हाला
न्यायाचा अंमल येथे रितसर होत आहे ना
ते प्रथम पहाच.
पण त्यानंतरची, ह्याहूनही महत्वाची
गोष्ट म्हणजे
माझ्या पित्याचा मानस लक्षात घ्या
कोणत्याही शपथेचा झ्यूसपेक्षा जास्त
प्रभाव असणे शक्यच नाही.
कारण त्याच्या नावानेच
त्या शपथेला लाभली आहे विश्वसनीयता.

क्रोधदेवतावृंद : तर मग तू असे का म्हणतोस
की तू ऑरिस्टीसला ऐकवलेल्या भविष्यवाणीची स्फूर्ती
झ्यूसपासून मिळाली तुला?
त्याने सूड घेईपर्यन्त आपल्या पित्याच्या मृत्यूचा
आपल्या मातेचे आपल्यावरील ऋण
नगण्य मानावे अशी होती ती भविष्यवाणी!

अँपोलो : असाच होता झ्यूसचा संकेत
आणि न्याय्यच होते झ्यूसचे मानस.
कारण त्या दोघांच्या मृत्यूंची
तुलनाच होऊ शकत नाही कोठल्याही प्रकारे.
तो राजा होता एक –

## युमेनिडीज्

देवांच्या आज्ञेने सन्माननीय राजदंड धारण करणारा.
एका स्त्रीने हत्या केली त्याची,
असा मृत्यू सन्माननीय ठरेलही—
पण केव्हा?
रणक्षेत्री, एखाद्या ॲमेझॉनच्या धनुष्यातून
सुटलेल्या बाणामुळे झाला तर!
पण पॅलास तू आणि या
दाव्यातील न्यायाधीश हो
ऐकाच आता
क्लायटेमनेस्ट्राने आपल्या पतीची हत्या
कशी केली ते.
पुष्कळ प्रमाणात यशस्वी होऊन
युद्धातून परत आला तो स्वगृही
आणि करू लागला विधीपूर्वक शुद्धीकरण
तेव्हा ती राहिली होती उभी त्याच्या समीपच.
जेव्हा विधी संपले आणि
चांदीच्या स्नानपात्रातून तो पडत होता बाहेर
तेव्हा तिने फेकल्या त्याच्यावर
एका झग्याच्या असंख्य अगणित चुण्या
लपेटले, अडकवून टाकले त्याला,
त्या भरतकाम केलेल्या झग्यात
आणि घातला घाव त्यावर
असा पंचमंडळी
झाला ह्या राजाचा भीषण अंत
राजतेज उसळत होते त्याच्या मुद्रेवर
त्याच्या शब्दाची सत्ता होती चालत
सैनिकांवर आणि नौकासमूहांवर
आणि अशी होती त्याची पत्नी
जिने ठार केले त्याला —
अशी की, ऑरेस्टीसचा न्याय करण्यास
बसलेल्या तुमच्यापैकी

कुणाच्याही हृदयाची चलबिचल
झाल्याशिवाय रहाणार नाही
तिचा गुन्हा ऐकतांना.

क्रोधदेवतावृंद : असे दिसते तुझ्या वर्णनावरून
की झ्यूस पित्याची हत्या हा
जास्त गर्हणीय गुन्हा मानतो
पण, जेव्हा त्याचा पिता क्रोनोस
झाला वृद्ध
तेव्हा झ्यूसने जखडले होते त्याला साखळदंडांनी
इथे परस्परविरोध दिसतो नाही का?
पंचमंडळी, तुम्ही शपथ घेतली आहे
तेव्हा हे लक्षपूर्वक ध्यानात घ्या.

अॅपोलो : तिरस्करणीय थेरड्यांनो,
स्वर्गातून बहिष्कृत झालेल्यांनो,
सैल करता येतात साखळदंड
फारसे बिघडत नाही त्यांच्यामुळे
बिघडले तरी सुधारता येते नाना उपायांनी.
पण जेव्हा मानवाचे रक्त
तहानेल्या धुळीत जिरते
तेव्हा एकदा हरपलेले ते जीवन
पुन्हा जगता येणे शक्य नसते.
मृत्यू ही एकच अशी गोष्ट आहे की
माझ्या पित्याने तिच्या निवारणार्थ संजीवक असा
मंत्र नाही योजून ठेवलेला.
बाकीच्या साऱ्या गोष्टी
त्याची सार्वभौम सत्ता
इच्छेनुसार सहज वर उचलून धरते
वा खाली झुगारून देते.

क्रोधदेवतावृंद : त्याला दोषमुक्त ठरवण्यासाठी
करतो आहेस तू विनवणी
पण तू केला आहेस का मनाशी विचार
की स्वतःच्या मातेचे रक्त धरिणीवर
अविरत सांडणारा
ह्यापुढे आरगॉसमध्ये कसा राहील
त्याच्या पित्याच्या गृही?
घेऊ शकेल का तो भाग सार्वजनिक
वेदींवर होणाऱ्या होमात?
जमातींच्या सामुदायिक मेजवान्यांमध्ये
पवित्र जलाने हस्तप्रक्षालन करू शकेल का तो?

ॲपोलो : ह्याचेही उत्तर देऊ शकतो मी,
मी जे म्हणतो त्यातले सत्य ध्यानी घ्या.
मातेचे म्हणून जे अपत्य मानले जाते
त्याची खरी जन्मदात्री ती नसते
ती असते केवळ एक धात्री –
जी खऱ्या जन्मदात्याने – नराने – पेरलेल्या
कोवळ्या बीजाची जोपासना करते.
म्हणून जर दैवाने ते अपत्य
घेतले नाही हिरावून
तर ती ते संभाळते –
एकाद्याने कोणा मित्रासाठी
एकादे वाढणारे रोप जपावे तसे.
आणि पिता मातेशिवाय
उत्पन्न करू शकतो अपत्य –
ह्या सत्याचा पुरावा म्हणून
ऑलिंपसवासी झ्यूसची कन्या
इथे आहे उपस्थित.
गर्भाशयाच्या अंधेऱ्या पाळण्यात
कधीच झाले नाही हिचे लालनपालन

परंतू असला जीव कोणीही देव
पुन्हा करू शकणार नाही उत्पन्न
पॅलास मी ह्या माणसाला
पाठवले तुझ्या गृहाग्नीजवळ याचक म्हणून
माझ्या कृपाप्रसादाने
तुझ्या नगरीला व तुझ्या प्रजाजनांना
थोर पदाला चढवण्यासाठी
लाभणाऱ्या अनेक देणग्यांपैकी
तो आहे एक
पॅलास, तो आणि त्याची नगरी
हे सदैव तुझे निष्ठावंत सहाय्यक रहातील
त्यांचे वंशज, सारा भविष्यकाल
ही बांधिलकी त्यांचा अमोल ठेवा मानतील.

अथीनी : आता मी पंचमहाशयांना
करू का विनंती
की त्यांच्या सद्सद्विवेकबुद्धीला अनुसरून
प्रत्येकाने करावे मतप्रदर्शन अशी?
दोन्ही बाजूंचा युक्तिवाद झाला आहे ना पुरा?

ॲपोलो : माझ्या भात्यातील प्रत्येक बाण
मारून झाला आहे माझा
आणि आता पंचमहाशयांच्या निर्णयाची
करतो आहे मी प्रतीक्षा.
(क्रोधदेवतावृंदाला)
या मार्गाने तुमचेही समाधान होईल ना?

क्रोधदेवतावृंद : (पंचांना उद्देशून)
तुम्ही त्यांची व आमची
दोघांचीही ऐकली आहे बाजू
आता पंचमहाशयहो,

तुम्ही मतप्रदर्शन कराल तेव्हा
तुम्ही घेतलेल्या शपथेबद्दलचा आदर
तुमच्या हृदयांना योग्य मार्ग दाखवो.

अथीनी : अथेन्सच्या नागरीकांनो,
ज्यात रक्त सांडले गेले होते
अशा ह्या पहिल्या दाव्याचा निवाडा करताना
प्रथम ऐका, तुमच्या न्यायालयाच्या संविधानाबद्दल.
आजपासून भविष्यकाली
हे न्यायमंडळ
इजियसच्या वंशासाठी
मानवहत्येच्या प्रत्येक दाव्याचा निर्णय करील
इथे, ॲरिसच्या टेकडीवर
या न्यायासनाचे शाश्वत अधिष्ठान राहील.
इथे, जेव्हा ॲमेझॉन स्त्रियांचे सैन्य आले
थिसीअसचा सूड घेण्यासाठी
तेव्हा त्यांनी इथेच टाकला सैन्याचा तळ
आणि हे स्थान
तटबंदी व बुरूज बांधून भक्कम केले
जसे काही एक नवे किल्ल्यासारखे शहरच
इथून जुन्यावर चढाई करायची होती त्यांना
आणि इथेच ॲरिसला बळी दिले त्यांनी
त्यामुळे नाव पडले ह्या खडकाचे
ॲरीऑपॅगस असे.
सादर भीती आणि भय – भीतीचा बंधू –
माझ्या नागरीकांना साऱ्या अपकृत्यांपासून
दूर ठेवतील
मात्र त्यांनी ठेवले पाहिजेत माझे कायदे अबाधित.
जर तुम्ही एकाद्या चमकत्या, निर्मळ झऱ्यात
अशुद्ध व मातकट अशा पाण्याचा
शिडकाव केलात

व ते बिघडवून टाकलेत
तर तुमची तृषा भागवायला
ते व्यर्थच ठरेल.
म्हणून काटेकोर कायदे
तात्कालिक सोईस्करपणासाठी दूषित करून टाकू नका.
स्वैरआचरण आणि गुलामी
ह्या दोहींचा त्याग करील
अशाच प्रकारच्या शासनाचे
कदर राखून संरक्षण करा व त्याला
मान द्या.
आणि तुमच्या राज्यपद्धतीतून
भीतीला अजिबात पदच्युत करू नका.
कारण ज्याला कशाचेच भय राहिले नाही
असा या पृथ्वीतलावरील कोणता माणूस
तरीही न्यायाने वागेल?
कायद्याच्या पावित्र्याबद्दलची
अशी सच्ची भीती
असू दे दृढमूल तुमच्या हृदयात.
म्हणजे मग उभा राहील तुमच्या नगरीच्या
सामर्थ्याचा कोट. –
तुमच्या भूमीभोवतीची एक तटबंदी –
अशी भक्कम की
स्किथियापासून पॅलॉपॉनीजपर्यन्तच्या
कोणाही दूसऱ्या जमातीला लाभलेली नाही याप्रमाणे
मी इथे तुमच्या रूपाने
हे न्यायालय स्थापन करीत आहे
ज्याचा उपमर्द करण्याची होणार नाही
कुणालाही प्राज्ञा. –
पवित्र, चटकन रागास चढणारे
आणि निष्ठेने जागृत रहाणारे
नागरीकांनी निवांत निद्रा घ्यावी म्हणून.

सान्या अथेन्सने
आपल्या स्मृतीपटलावर नोंदून ठेवावे
म्हणून तुम्हाला उद्देशून केलेल्या भाषणाचा
मी केला एवढा विस्तार.
आता आपापले मतप्रदर्शन करा सत्यनिष्ठपणे
आणि तुमच्या शपथेचा मान राखून
ह्या प्रकरणाचा न्याय करा.
याहून काही सांगायचे नाही मला.

( पुढील भाषण चालू असतांना पंचमंडळांचे सदस्य क्रमाक्रमाने मते द्यायला उठतात. दोन कलश ठेवलेले असतात. त्यातला एक कलश निर्णायक आहे व दुसरा अलक्षणीय आहे. पंचमंडळातील प्रत्येक सदस्याजवळ दोन गोट्या आहेत– एक काळी आणि एक पांढरी. " निर्णायक" कलशात प्रत्येक सदस्य " निर्दोष" असे मत असल्यास पांढरी व " दोषी" असे मत असल्यास काळी गोटी टाकतो. मग उरलेली गोटी दुसऱ्या कलशात टाकून आपल्या जागी परत जातो. )

**क्रोधदेवतावृंद :** माझाही सल्ला ऐकून घ्या.
तुमच्या देशाला भेट द्यायला आलेल्या आम्हाला
तुच्छ लेखून वागू नका.
नाहीतर आमच्या कठोरतेचा
घ्यावा लागेल तुम्हाला अनुभव.

**अ‍ॅपोलो :** माझी भविष्यवाणी
आणि झ्यूसचा शब्द, ह्यांचे भय बाळगा
असे निक्षून सांगतो आहे तुम्हाला
ही दोन्ही होऊ देऊ नका निष्फळ.

**क्रोधदेवतावृंद :** (अ‍ॅपोलोला उद्देशून)
रक्तलांछित कृत्ये ही काही
तू संरक्षण्याची लक्ष्यें नव्हेत.

हयापुढे कलंकित मंदिरातून वर्तवशील तू भविष्यवाणी.

अ‍ॅपोलो : तर मग झ्यूसचे काय?
जेव्हा त्याच्याकडे याचक म्हणून आला इक्झिऑन –
जगातला पहिला वहिला खूनी –
तेव्हा त्याने योजिले त्याचे शुद्धीकरण –
त्यामुळे झाला का तो कलंकित ?

क्रोधदेवतावृंद : तू बैस युक्तिवाद करीत
पण जर आम्ही जिंकलो नाही हा दावा
तर उच्चार करवणार नाही
अशा व्याधींनी आम्ही ग्रासून टाकू
या भूमीला.

अ‍ॅपोलो : आम्हा कनिष्ठ देवांमध्ये
तुम्हाला जसा किंचितही मान नाही
तसाच ज्येष्ठ देवांमध्येही नाही.
मी खचितच जिंकीन हा दावा.

क्रोधदेवतावृंद : हयावरून आठवण येते
अ‍ॅडमीटस्च्या घरातल्या तुझ्या वर्तनाची
तू नियतीदेवतांना लालुच दाखवून
एका मर्त्याला जीवदान दिलेस.

अ‍ॅपोलो : मला भजणाऱ्या माणसाला
मदत करणे
योग्य नव्हते का?
खचितच होते
शिवाय फार निकडीची होती अ‍ॅडमीटस्ची गरज.

क्रोधदेवतावृंद : आदिम देवींची

मद्य देऊ करून
चेष्टा मांडली होतीस तू
आणि भंग केलास तू पुरातन दैवी संकेतांचा.

अँपोलो : निराशा पदरी पडली
की तुमचे सारे जहर
ओकूनच टाकाल तात्काल तुम्ही – पण
काही अपाय होणार नाही त्यामुळे कोणाला.

क्रोधदेवतावृंद : तुला वाटते आहे की तुझे यौवन
धुळीला मिळवील माझ्या वार्धक्याला
आम्ही निर्णय ऐकला की
मग आमच्या कोपाचे आक्रमण व्हायला
वेळ लागायचा नाही मुळीच
तोवर दम धरीन मी.

अथीनी : अखेरचे मत देणे हे आहे
माझे कर्तव्य
जेव्हा तुमची मते मोजून होतील
तेव्हा माझे मत पडेल ऑरेस्टीसला –
त्याचा युक्तीवाद उचलून धरायला.
जन्म देणारी कुणीच माता नव्हती मला
म्हणून पित्याचा अधिकार आणि
सर्व बाबतीत पुरुषाचे स्वामित्व –
फक्त विवाहाने स्वत:चे समर्पण करण्याखेरीज –
हेच माझ्या संपूर्ण हृदयाच्या निष्ठेवर
वर्चस्व गाजवते.
म्हणून जिने केली आहे आपल्या पतीची हत्या
त्या स्त्रीचा मृत्यू
माझ्या मते त्याच्या मृत्यूच्या घटनेहून
फार, फार, कमी शोचनीय आहे.

आणि म्हणून जर तुमची मते समसमान पडली असतील
तर ऑरिस्टीस दावा जिंकेल.
ज्यांची त्या कामावर नेमणूक झाली आहे
त्यांनी कलश आणून मोजावी मते
(पंचमंडळातील दोघेजण तिची आज्ञा मानतात.)

ऑरिस्टीस : हे तेजस्वी ॲपोलो,
काय निर्णय प्रकट होईल बरे?

क्रोधदेवतावृंद : हे रजनीमाते,
हे तिमिरी, आमच्याकडे कृपादृष्टीने पहा.

ऑरिस्टीस : ह्या क्षणाने
माझ्या वाट्याला येणार आहे
निराशा आणि मृत्यू –
किंवा जीवन आणि आशा.

क्रोधदेवतावृंद : आमच्या वाट्याला
गौरवाची वृद्धी
किंवा अवमान आणि हानी.

ॲपोलो: मते बाहेर पडली आहेत.
नागरीकांनो, मोजा अगदी काटेकोरपणे
न्याय पवित्र आहे
म्हणून मते निरनिराळी करतांना
कदर करा न्यायाची.
एक मत गमावणे
म्हणजे सौख्याचा नाश होणे आहे
आणि एका मताचा लाभ
एक खचलेले घर वर उठवील पुन्हा.
(मते अथीनीजवळ आणली जातात. काळ्या व पांढऱ्या गोट्यांची संख्या

समान आहे. अथीनी तिची पांढरी गोटी पांढऱ्यांमध्ये टाकते.)

अथीनी : ऑरेस्टीस रक्तपाताच्या अपराधातून
करण्यात आला आहे मुक्त
मते पडली आहेत समसमान.

ऑरेस्टीस : पॅलास, माझ्या घराच्या रक्षक देवते!
मी निर्वासित झालेला होतो
तू मला परत आणलेस स्वगृही
आता हेलास माझ्याबद्दल म्हणू शकेल
"आरगॉसचा आहे तो
पूर्वी होता तसाच आजही.
आणि पॅलास, अँपोलो
आणि तारण हार सुखकर्ता झ्यूस
ह्यांच्या कृपेने आपल्या पित्याचे घर
आणि संपत्ती यांचा झाला आहे तो स्वामी."
कोण आहेत माझ्या मातेचे पुरस्कर्ते हे
लक्षात घेऊन
झ्यूसने माझ्या मृत पित्याला
जास्त मान दिला आहे.
आणि केली आहे माझी मुक्तता.
तेव्हा आता
आरगॉसच्या दिशेने पाऊल उचलण्यापूर्वी
मी तुझ्यापुढे -
तुझा देश आणि तुझे लोक यांच्यापुढे —
साऱ्या भविष्यकाळी जारी राहील
अशी प्रतिज्ञा करीत आहे ती ऐक.
आरगॉसचा कोणताही राजा
ॲटिकाविरूद्ध करणार नाही चाल.
युद्धासाठी सरसावलेल्या भालाईतांसह.
जर कोणी मानव

मी घातलेल्या ह्या शपथेचे करील उल्लंघन
तर सूड घेण्यासाठी मी
उठून माझ्या कबरीतून
आणि विनाशक हानीने व्याकूळ करीन त्याला.
अशुभ चिन्हांनी आणि निराशेने घेरले जाऊन
अडकून पडेल त्याची चढाई करणारी सेना जागोजागी
अखेरीस त्याचे सारे सैनिक त्यांनी घर सोडले
त्या दिवसाला देतील शिव्याशाप.
पण जर माझ्या शपथेचा मान राखला गेला
आणि माझे वंशज अथेन्सच्या राज्याचे
जर राहिले कडवे आणि एकनिष्ठ दोस्त
तर त्यांना लाभेल माझा आशीर्वाद.
तर मग पॅलास,
मी तुझा निरोप घेतो.
अथेन्सच्या नागरीकांनो,
स्वस्ति असो तुमचे.
प्रत्येक लढ्यात वाट्याला येवो तुमच्या शत्रूंच्या, मृत्यू
आणि तुम्हाला लाभो जय आणि विजय!
(ॲपोलो आणि ऑरेस्टीस जातात.)

क्रोधदेवतावृंद : प्राचीनाला आधुनिकाने तुडवले आहे पायदळी!
पुरातन कायद्यांना उल्लंघून
माझ्या योग्य हक्कापासून मला वंचित करणाऱ्या
तरण्या देवतांनो,
माझा शाप आहे तुम्हाला.
आता तुम्ही माझ्या इभ्रतीचा केलेला
अपमान शमवण्यासाठी
सूड चिघळत राहील माझ्या हृदयात
आणि मग माझे भरलेले हृदय
ह्या भूमीवर सर्व बाजूंनी वर्षाव करील
क्रोधाचा अपमानाबद्दल,

जहराचा – मला सोसाव्या लागलेल्या यातनांबद्दल –
होय, असे जहर की ज्याच्या प्राणघातक पर्जन्याने
वंध्यत्व आणणारा विनाशक रोग पडेल
प्रत्येक रोपावर आणि अर्भकावर.
आणि पृथ्वीचा पृष्ठभाग जाईल भरून
संसर्गदुष्ट व्रणांच्या खुणांनी.
मी कशाला ढाळू अश्रू?
ऐक न्यायदेवते, ऐक मी काय करणार
आहे ते!
लवकरच हताश होऊन
अथेन्स करील पश्चाताप
आपल्या अविचाराचा आणि हातून घडलेल्या
माझ्या विडंबनाचा.
निशा आणि शोक ह्यांच्या कन्यांनो,
चला मजबरोबर
मानहानी आणि लवकरच घेतला जाणारा सूड
ही बनवा आपली खाद्ये!

अथीनी : तुमच्या क्रोधपूर्ण शोकाला आवर घाला
अशी विनंती करते मी तुम्हाला
निस्पृहपणे चालवलेल्या दाव्यात
समान मतांच्या नोंदणीने
नि:पक्षपाती निर्णय झाला
त्यात तुमचा कसला अपमान वा पराभव?
सूर्यप्रकाशाप्रमाणे स्पष्ट असा पुरावा
प्रत्यक्ष झ्यूस पासून प्राप्त झालेला
ज्याने ऑरिस्टीसला धाव घालायला सांगितला
त्या देवाने आणला –
मग असा पुरावा साऱ्या अपायकारक परिणामांपासून
ऑरिस्टीसचे रक्षण केल्याशिवाय कसा राहील!
तेव्हा क्रोध शमू दे तुमचा

तुमच्या कोपाने आमच्या भूमीवर
रोगराई न वर्षो
आणि प्रत्येक बीज पोखरले जाऊन
साऱ्या भूमीचे नापीक वाळवंट न बनो
त्याबद्दल परतफेड म्हणून
ह्या सचोटीच्या देशात
एक वसतीस्थान मिळवून देण्याचे वचन
देते मी तुम्हाला
एका पवित्र गुहेत तेजस्वी सिंहासनांवर
अधीष्ठित होऊन
आमच्या नागरीकांकडून
मानसन्मानाचा स्वीकार करा तुम्ही सदैव.

•

क्रोधदेवतावृंद : प्राचीनाला आधुनिकाने तुडवले आहे
पायदळी!
पुरातन कायद्यांना उल्लंघून
माझ्या योग्य हक्कांपासून मला वंचित
करणाऱ्या
तरण्या देवतांनो,
माझा शाप आहे तुम्हाला.
आता तुम्ही माझ्या इभ्रतीचा केलेला
अपमान शमवण्यासाठी
सूड चिघळत राहील माझ्या हृदयात आणि मग माझे भरलेले हृदय
ह्या भूमीवर सर्व बाजूंनी वर्षाव करील क्रोधाचा अपमानाबद्दल,
जहराचा, मला सोसाव्या लागलेल्या
यातनांबद्दल —
होय, असे जहर की ज्याच्या प्राणघातक
पर्जन्याने
वंध्यत्व आणणारा विनाशक रोग पडेल
प्रत्येक रोपावर आणि अर्भकावर
आणि पृथ्वीचा पृष्ठभाग जाईल भरून

संसर्गदुष्ट व्रणांच्या खुणांनी.
मी कशाला ढाळू अश्रू?
ऐक न्यायदेवते, ऐक मी काय करणार
आहे ते!
लवकरच हताश होऊन
अथेन्स करील पश्चाताप
आपल्या अविचाराचा आणि
हातून घडलेल्या माझ्या विडंबनाचा
निशा आणि शोक ह्यांच्या कन्यांनो,
चला मजबरोबर
मानहानी आणि लवकरच घेतला जाणारा सूड
ही बनवा आपली खाद्ये!

अथीनी : कोणीही केलेला नाही तुमचा अपमान.
अमरांच्या क्रोधाने
मर्त्यांच्या कृषीक्षेत्रात भीषण रोगांचा
प्रसार का करावा बरे?
तुम्ही न्यायदेवतेला आवाहन करता,
माझा भरवसा झ्यूसवर.
पुढे कारणच काय वादंग माजवण्याचे?
सर्व देवांपैकी एकट्या मलाच माहित आहेत
झ्यूसचे वज्र ठेवलेल्या मोहरबंद खोलीच्या किल्ल्या.
पण बल वापरणे व्यर्थ आहे
मूर्ख धमक्यांचे परिणाम
भीषण रोग आणि अरिष्टे
ह्यांच्या रूपाने पसरण्याच्या पूर्वीच
त्यांना समजुतीने आवर घालणे जास्त श्रेयस्कर.
हा काळाकुट्ट अधिकाधिक उफाळणारा क्षोभ आवरा
सन्मान आणि प्रतिष्ठा
तिष्ठत आहेत तुमच्यासाठी
अथेन्समध्ये निवास करा माझ्यासारखाच

पहा! जेव्हा ॲटिकाची विस्तीर्ण शेते
त्यांच्या पहिल्या वहिल्या फळांची भेट
तुम्हाला देतील,
जेव्हा अपत्यजन्म वा विवाहाचे शपथविधी
ह्यांच्या प्रीत्यर्थ
शाश्वतचा एक हक्क म्हणून
तुमच्या वेदीवर बळी दिले जातील
तेव्हा मग माझ्या आताच्या शब्दांची महती
तुम्हाला समजून येईल.

क्रोधदेवतावृंद : हायरे!
किती लज्जास्पद आणि शोचनीय अवस्था ही!
जग जेव्हा बाल्यावस्थेत होते
तेव्हा जिच्या अंतरंगी प्रज्ञेचा अधिकाधिक
उत्कर्ष होत होता
त्या माझ्या वाट्याला नशीबाने हे घालावे!
नावनिशाणी नसलेले एक तिरस्करणीय स्थान.
— हेच पत्करावे लागणार का मला अखेर?
हे पुरातन पृथ्वी,
पहा माझी ही अवहेलना?
तीव्र वेदना हाडामासातून दौडत असता
माझा श्वास घुसमटून टाकणारा क्रोध
सारा संयम झुगारून देत आहे.
हाय निशे — माझ्या माते,
ऐक विव्हळणे माझे
नव्या देवांकडून माझ्या पुरातन स्थानावरून
पदच्युत झाले आहे मी
मला तुच्छ मानून चकवले त्यांनी मला.

अथीनी : तुमच्या ज्येष्ठ वयाला मान देऊन
गप्पच बसायला हवे मला

कारण (वयामुळे) तुम्हाला आलेले शहाणपण
कितीतरी अधिक आहे माझ्यापेक्षा.
अर्थात झ्यूसने मला सुद्धा
दिली आहे पारख करण्याची शक्ती
आणि हे सांगून ठेवत आहे मी तुम्हाला
की जरी तुम्ही दुसऱ्या एखाद्या भूमीला
केले आपले निवासस्थान
तरी तुमचे विचार तीव्र लालसेने
वळतील अथेन्सकडेच.
कारण आगामी कालखंडात
अथेन्सचे वैभव अधिकाधिक तेजाळतांना दिसेल.
इथे, एरेकथ्यूसच्या मंदिराजवळ
अत्युच्च मानाचे आश्रयस्थान लाभलेल्या तुम्ही
सर्वांकडून – पुरूष आणि स्त्रिया उभयतां – कडूनही –
दुसऱ्या कोठल्याही भूमीत मिळणार नाहीत
असे मानसन्मान मिळवाल
म्हणून म्हणते पेरू नका माझ्या कृषीक्षेत्रांवर
हत्येला प्रोत्साहन देणारे पाषाणखंड
आमच्या तरूणांची हृदये प्रदूषित करतील ते
मद्याने सुद्धा चढत नाही अशा उन्मादाने वेडे होतील ते
झुंजणाऱ्या कोंबड्यांचा स्वभावदोष
त्यांच्यात रूजत नका घालू
त्यामुळे माझ्या नगरीच्या परिसरात
माणूस माणसाविरूद्ध उभा ठाकेल
आप्त जुमानणार नाहीत आपल्याच आप्तांना
पण ही धिटाई त्यांच्या स्वत:च्याच
नाशाला कारण होईल शेवटी.
युद्ध असावे नेहमी परकीयांविरूद्ध
परकीयांच्या दाराशी.
तिथे मग माणसांनी करावे प्रणयाराधन यशाचे
पण स्वगृही मात्र झुंजू नये कोंबड्यांसारखे

तर मग देवतांनो,
मी तुम्हाला देऊ करीत आहे अथेन्समध्ये निवासस्थान
अत्यन्त प्रिय आहे इथली वसती देवांना
इथे तुमच्या ममतायुक्त कृपाप्रसादाला
साजेशा अशाच असतील
भेटी आणि सन्मान.

क्रोधदेवतावृंद : हायरे !
किती लज्जास्पद आणि शोचनीय अवस्था ही!
जग जेव्हा बाल्यावस्थेत होते
तेव्हा जिच्या अंतरंगी प्रज्ञेचा अधिकाधिक
उत्कर्ष होत होता
त्या माझ्या वाटयाला नशीबाने हे घालावे!
नावनिशाणी नसलेले एक तिरस्करणीय स्थान
– हेच पत्करावे लागणार का मला अखेर?
हे पुरातन पृथ्वी,
पहा माझी ही अवहेलना!
तीव्र वेदना हाडामासातून दौडत असताना
माझा श्वास घुसमटून टाकणारा क्रोध
सारा संयम झुगारून देत आहे
हाय निशे– माझ्या माते
ऐक विव्हळणे माझे
नव्या देवांकडून माझ्या पुरातन स्थानावरून पदच्युत झाले आहे मी –
मला तुच्छ मानून चकवले त्यांनी मला.

अथीनी : तुम्हाला उद्देशून
स्नेहपूर्ण शब्द उच्चारतांना
मी कधीच नाही थकणार
तुम्ही – एक ज्येष्ठ देवता –
एक कनिष्ठ शक्ती आणि हे नागरीक ह्यांच्याकडून
अपमानित, गृहहीन अशा अवस्थेत

ह्या भूमीतून हाकलल्या गेल्यात,
असे तुम्हाला म्हणू देणार नाही मी
पण जर निष्कलंक मनघरणीने
तुमच्या हृदयाला माझे शब्द मानण्यास
आणि माझ्या चित्तशामक भाषणचातुर्याचे
स्वागत करण्यास भाग पाडले
तर तुम्ही इथे रहा आमच्या समवेत!
जर तुम्ही असे करण्यास नकार दिलात तर,
हे ध्यानात ठेवा की तुम्हाला, तिरसटपणाने आणि दुष्टाव्याने
आमच्या माणसांनी गजबजलेल्या
राजमार्गांविरूद्ध उलटण्यास
कोणतेही पटणारे कारण नाही रहाणार.
एक थोर आणि शाश्वत वारसा
इथे तुमची वाट पहात आहे
असे केल्याने तुमचा मानही राहील
आणि समाधानकारक न्यायही होईल.

**क्रोधदेवतावृंद :** देवरूप अथीनी,
कोणते स्थान देऊ करीत आहेस
तू आम्हाला?

**अथीनी :** असे स्थान की तुम्हाला कधीही खेद
होणार नाही ते स्वीकारल्याबद्दल
स्वीकार करणे तुमच्या स्वाधीन आहे.

**क्रोधदेवतावृंद :** समजा मी ते स्वीकारले,
तर मग कोणते अधिकार आम्हाला मिळतील त्यामुळे?

**अथीनी :** असे अधिकार की तुमच्या कृपाप्रसादाचा
आधार शोधल्याशिवाय
कोणतेही घराणे रहाणार नाही प्रगतीपथावर.

क्रोधदेवतावृंद : हे स्थान व हे अधिकार
मला मिळवून देण्याचे वचन देतेस तू?

अथीनी : जे तुम्हाला भजतील पूजतील
त्या साऱ्यांचे मी स्वतः संरक्षण करीन
व त्यांची भरभराट करीन.

क्रोधदेवतावृंद : तुझा हा शब्द शाश्वत स्वरूपाचा आहे ना?

अथीनी : जे मी करणारच नाही
त्याबद्दल वचनबद्ध होण्याची काय गरज आहे मला?

क्रोधदेवतावृंद : माझा राग वितळतो आहे.
तुझ्या शब्दाने हृदयपालट होतो आहे माझा.

अथीनी : अथेन्समध्ये तुम्ही स्नेह्यांच्या सहवासात आहात.

क्रोधदेवतावृंद : ह्या भूमीला मी कोणती
वरदाने द्यावी
अशी आहे तुझी इच्छा?

अथीनी : असे वरदान की
खेदाने त्रस्त नसावा कधी जय.
पृथ्वी, आकाश व सागर यांच्या
पासुन लाभणारे वरदान,
असे वरदान की जे वायू व सूर्यप्रकाश
यांच्यामधून साऱ्या भूमीवर हुंकारत रहावे
पशुधन आणि कृषीक्षेत्र
सतत फलद्रुप होत राहून
माझ्या नागरीकांना वैभवाला चढवोत,
तसेच बहुसंख्य शूर पुत्र जन्म घेवोत,

त्यांच्या शांतीने संरक्षण करण्यासाठी असे वरदान
अश्रद्धांना निश्चयाने नष्ट करा तणाप्रमाणे
नाहीतर त्यांचे माजलेले रान
सौजन्याचे फूल गुदमरवून टाकील.
न्यायाला धरून वागणाऱ्या माणसांची जीविते
दुरात्म्यांनी ग्रस्त केलेली आवडणार
नाहीत मला.
ही सारी वरदाने आणायला हवीत तुम्ही,
आणि मग मी त्यांच्या शूर विजयी शस्त्रास्त्रांना
देईन मिळवून विजय.
आणि अथेन्सच्या नावाला
जगभर मिळवून देईन सन्मान.

**क्रोधदेवतावृंद :** मी देते संमती
अथीनीच्या गृही तिच्यासमवेत रहाण्याला.
ह्या अमर शक्तींच्या बालेकिल्ल्याला –
जो सर्वशक्तीमान झ्यूस आणि ॲरिस
ह्यांनी आपल्या निवासासाठी निवडला –
जो ग्रीसच्या देवांच्या अभिमानाचे
आणि वैभवाचे स्थान आहे
आणि जी त्यांच्या वेदींचा रक्षणकर्ता आहे,
– त्याला मी आशीर्वचन देत राहीन इथे
ही अशी प्रार्थना करते मी अथेन्ससाठी,
सदिच्छापूर्वक ही भविष्यवाणी वर्तवते.
सद्‌भाग्याने दिलेल्या पुष्टीवर्धक देणग्यांनी,
तिच्या सुफला मृत्तीकेतून
सूर्याच्या तळपत्या तेजाने उत्पन्न झालेल्या देणग्यांनी
लवून जाईल ही अथेन्सची भूमी.

**अथीनी :** मी पण माझ्या वाट्याचे कार्य करीन
आणि माझ्या नगरीच्या जीवनासाठी वरदान मिळवीन,

आपल्या तटबंदीच्या आत
ह्या सहजासहजी प्रसन्न न होणाऱ्या
श्रेष्ठ देवतांचे स्वागत करून
त्यांचे काम म्हणजे
मर्त्यांचे सर्व व्यवहार संभाळणे.
त्यांच्याशी जो वैर करील
त्याचे जीवन शापित राहील.
जीवनाला घायाळ करणारा फटका आला कुठून
हेही समजणार नाही त्याला.
फक्त त्याच्या पित्याला विदित असलेला
गूढ अपराध
खेचतो त्याला त्यांच्या न्यायासनापुढे
आणि मग तिथे तो कितीही उच्चरवाने
आक्रोश करो त्याचा क्रुद्ध शत्रू – मृत्यू
नि:शब्दपणे त्याला मातीत चिरडून टाकतोच.

क्रोधदेवतावृंद : मला आणखीही काही
द्यायची आहेत आश्वासने.
कोणताही प्रतिकूल वारा
तुमची फळझाडे कमजोर करणारा
विनाशक रोग आणणार नाही वाहून.
कळ्यांना कुरतडून टाकणारा कुठलाही कीटक
उल्लंघू शकणार नाही तुमच्या सीमा चोरपावलांनी,
कुठलाही जीवनसत्व विनाशक रोग
धोक्यात आणणार नाही तुमचा अन्नपुरवठा.
तुमच्या पुष्ट मेंढ्यांना पॅन देव देईल जुळी कोकरे
त्यांच्या अपेक्षित प्रसवसमयी,
आणि भूमातेच्या भरगच्च उत्पादनाच्या
कृतज्ञ देणग्यांनी
सन्मानिल्या जावोत उदार दैवी शक्ती.

अथीनी : आमच्या नगरीच्या तटबंदीच्या संरक्षकांनो,
धक्का देणार असलेली वरदाने ऐका!
नियतीच्या सूडदेवतांची सत्ता, स्वर्ग व नरक –
दोन्ही ठिकाणी सारखीच प्रभावी असते.
आणि त्यांचे ह्या पृथ्वीवरील कार्य
सर्वांच्या समक्षच त्या पार पाडीत असतात.
ज्याच्या त्याच्या पात्रते प्रमाणे
कोणाला गीते तर कोणाला यातना देतात त्या
अश्रूंनी डोळ्यांपुढे अंधेरी आणणाऱ्या घटनेने.

क्रोधदेवतावृंद : मी प्रार्थना करते
की कोणत्याही भलत्याच वेळी
घडलेल्या योगायोगाने
ऐन भरात असलेल्या तुमच्या तरुणांचा
कधी होऊ नये नाश.
प्रत्येक सुंदर कुमारिका
वधू बनून
तिचे जीवन कृतार्थ करो सहर्ष.
ह्या सर्व देणग्यांसाठी
सार्वभौम देवांनो,
तुमची आम्ही प्रार्थना करतो.
आणि तुम्ही – आमच्या तीन भगिनींनो,
दरारा उत्पन्न करणाऱ्या नियतीदेवतांनो –
ज्यांच्या न्यायी हुकुमाने
प्रत्येक माणसासाठी रेखाटला जातो
अपरिवर्तनीय मार्ग –
तुमचे स्थान प्रत्येक गृही आहे अढळ.
तुमचा फेरा
यथायोग्य दटावणीसह प्रत्येकाच्या वाटणीला येतोच –
तुम्ही ऐका आमची प्रार्थना –
हे अमर देववंशातल्या

सर्वाधिक वंदनीयांनो, ऐका.

अथीनी : तुम्ही आमच्या ह्या प्रिय भूमीवर
करीत असलेल्या प्रेमामुळे
माझे हृदय भरून आले आहे आता
पवित्र 'मनावणी' देवाला ही मी धन्यवाद देते –
दृढ नकाराने पण सौम्यपणे त्याने झगडा चालविला
अखेर झ्यूस अधिवक्ता बनून
दाव्यात सहभागी झाला.
आणि त्याने मनावणीला केले यशस्वी
आता भले भल्यांना साथ देतील
आणि प्राप्त यशाचे वाटेकरी होऊ उभयता आपण.

क्रोधदेवतावृंद : अरिष्टांची अपार हाव असलेले यादवी युद्ध
कधीही न पेटो अथेन्समध्ये
धगधगणारा प्रकोप
ज्याचा केवळ हत्येनेच होतो उपशम
तो कधीही न उगारो शस्त्रास्त्रे,
मृत्तिका आकंठ प्राशनाने तृप्त होईपर्यन्त
मानवाचे रक्त सांडण्यास.
माझा वारसा बनलेल्या ह्या भूमीत,
आपण सारे एकमेकांच्या सहवासात
आनंद प्राप्त करून घेऊ या.
आणि एक दिलाने,
रक्ताच्या नात्याने बांधलेल्या सख्ख्या
भावांप्रमाणे,
प्रेम वा द्वेष करूया.
कारण मानवजातीच्या अनेक व्यथा दूर करण्याचा
हाच आहे एक उपाय.

अथीनी : हे कृपावंत शब्द

आणि निश्चित झालेली भावी कृत्ये
शहाणपणाकडे जाणाऱ्या मार्गाला शोभवितात.
अथेन्सला मोठे लाभ होणार आहेत.
ह्या भय उत्पन्न करणाऱ्या आकृतींपासून
आणि धाक घालणाऱ्या डोळ्यांपासून
तेव्हा स्नेहपूर्ण अन्त:करणाने भजा त्यांना
कारण स्नेहमयच आहे आता त्यांचे अन्त:करण
न्यायालाच देश मानो तुमचा
आपला सर्वश्रेष्ठ ठेवा.
म्हणजे सारी भूमी आणि ही नगरी
सर्व अंगानी होईल थोर आणि कीर्तीवंत.

क्रोधदेवतावृंद : हे नगरी, गा हर्षभरित अन्त:करणाने
आशीर्वचन प्राप्त झाले आहेत तुला.
समृद्ध आहेस तू वैभवांनी भरलेल्या शेतांनी व राजमार्गांनी
समयोचित शहाणपणा आहे तुझ्या ठायी.
तू जिला भजतेस
त्या देवीला प्रिय आहेस तू
सर्वांचा नियंता असलेल्या राजाच्या
न्यायासनाजवळ स्थानापन्न हो.
तो रक्षितो आणि दक्षतेने
अधिराज्य करतो त्या प्रियजनांवर
जे विसावतात तिच्या कुंवार पंखाखाली.

अथीनी : आम्हीही आमच्या परीने
चिंतितो तुम्हाला सौख्य.
आता मला निघायला हवे.
आणि तुम्हाला डोंगरातील तुमच्या गुहांचा
मार्ग दाखवायला हवा.
जे तुमच्यासमवेत अनुचर म्हणून रहाणार आहेत
त्यांच्या पवित्र मशालीने उजळले आहे

तुमचे वसतीस्थान
चला; या उत्सुक त्वरेने व गंभीर विधीपूर्वक
ह्या प्रिय भूमीच्या विवरात प्रवेश करा.
नंतर तेथूनच आमच्या गृहांतून व आमच्या सीमांवरून
हकालपट्टी करा साऱ्या अपायांची
आणि प्राप्त करून द्या आम्हाला वैभव आणि कीर्ती.
खडकाळ अथेन्सच्या, पुत्रांनो
पुढे होऊन मार्ग दाखवा त्यांना
तुमच्या परिसरातील त्यांच्या निवास सुखद करा.
कृपेची पाखर ह्या नगरीवर
घालण्यासाठी आल्या आहेत त्या.
आपल्या सदिच्छांचे पारितोषिक
देऊ या त्यांना त्याबद्दल.

क्रोधदेवतावृंद : आमची आशीर्वचने पुन्हा उच्चारतो आम्ही
इथे ज्यांची घरे आहेत त्यांना उद्देशून,
हा अथेन्सचा खडक ज्यांना प्रिय आहे
त्यांना उद्देशून.
आशीर्वाद माझे मंदिरांना आणि राजमार्गांना
जिथे अमर आणि मर्त्य माणसे भेटतात
आणि ज्याअर्थी आदरयुक्त भीतीने
आणि विनम्र हृदयांनी
तुम्ही माझे अतिथी म्हणून स्वागत करीत आहात
त्याअर्थी संवत्सरामागून संवत्सरे
अधिकाधिक उत्कर्ष होत राहील तुमचा.

अथीनी : आमच्यासाठी तुम्ही केलेल्या प्रार्थनेबद्दल
मी आभार मानते तुमचे.
आता ह्या मशालींच्या प्रकाशात
मी आणि ह्या माझ्या मूर्तीची देखभाल
करणाऱ्या माझ्या ह्या सेविका

युमेनिडीज्

भूमीखालच्या तुमच्या घरापर्यन्त
तुम्हाला पोचवायला येतो.
तुमच्याबरोबर येतील या
तरूण स्त्रिया, मुले –
शोभिवंतपणे सजलेली मंडळी –
थिसीयसच्या भूमीचा बहार.
तसाच जांभळ्या रंगाने रंगवलेले झगे घातलेल्या
पुरंध्रींचा आदरणीय समूहही
तुमच्यासोबत येईल.
स्नेहमयी देवींचा सन्मान करा.
आणि झगमगणारे दिवे पुढे सरकू द्यात.
म्हणजे आपल्या नूतन पाहुण्या
आगामी वर्षांमध्ये ऐश्वर्य आणि शांती
यांचा कृपाप्रसाद प्राप्त करून देतील आपल्या भूमीला.

(मागील तीन भाषणे चालू असतांना, वाद्ये व पेटवलेल्या मशाली घेऊन क्रोधदेवतांच्या वृंदाला रंगमंचावरून समारंभाने नेण्यासाठी एक जनसमूह जमा होत आहे. जाता जाता सारे मिळून गातात.)

हे थोर देवींनो
सन्मानाच्या भोक्त्यांनो
चला तुमच्या घराकडे.
हे पुरातन निशेच्या कन्यांनो,
तुमच्या सामंजस्याने तुम्हाला प्राप्त झालेले स्नेही
मार्ग दाखवीत आहेत तुम्हाला

(प्रत्येक जिव्हा पवित्र शब्दोच्चारच करो या समयी)

चला पुढे, पृथ्वीच्या उदरातील
अनादि गुहेत.
तिथे यज्ञयागाने सन्मानिल्या जाऊन

ग्रीक शोकनाट्ये

भयाने आणि विस्मययुक्त आदराने
भजल्या चाल तुम्ही

( आणि प्रत्येक जिव्हा पवित्र शब्दोच्चारच करो.)

चला, या, वचक उत्पन्न करणाऱ्या
पण स्नेहशील शक्तींनो
तुम्ही आमच्या भूमीवर प्रेम करता
आणि तिचे रक्षण करता
तिमिराला गिळणारी ज्वाला
तुमचा मार्ग तेजाने उजळीत असतांना
तुम्ही आनंदाने जा तुमच्या विश्रांतीस्थानाकडे
आणि प्रत्येक आवाज
आमच्या गाण्यावर चढवो कळस
एकाच हर्षभरित आरोळीने!
पुन्हा मद्याचे अर्घ्य दिले जावो तडतडणाऱ्या पाईनच्या ओंडक्यांच्या उजेडात
आता श्रेष्ठ, सर्वसाक्षी झ्यूस
पॅलासच्या नगरीचे करतो आहे संरक्षण
अशा रीतीने देव व दैव ह्यांची
झाली आहे मनमिळवणी
तर मग प्रत्येक आवाज चढवो कळस
आमच्या गीतावर
आनंदाच्या एकाच हर्षभरित आरोळीने!

## ३) 'युमेनिडीज्' मधील संदर्भांवर टीपा

अथीनी : झ्यूस व मेटिसची कन्या. ज्ञान व शक्ती ह्यांचे प्रतीक.

डेल्फी : फोसीसमधील ॲपोलोचे मंदिर असलेले सुप्रसिद्ध स्थान. ह्या मंदिरात ऑफॅलोस किंवा पृथ्वीचा मध्यवर्ती दगड नाभीस्थान आहे. ह्यावर ठेवलेल्या तिवईवर पिथीया ॲपोलोची पुजारीण बसते व लॅरिलचे धुंदी चढवणारे पान खाऊन भविष्यवाणी सांगते. तिला ॲपोलोची दैवी पत्नी मानतात.

थेमिस : गीआ अगर पृथ्वीमातेच्या टायटॅन म्हणवल्या जाणाऱ्या बारा अपत्यांपैकी एक.

टायटॅन : गीआ अगर पृथ्वीमातेने युरॅनसपासून बारा टायटॅनना जम दिला.

फीबी : आरटिमिसचे, चंद्रदेवी ह्या संदर्भातले नाव. फीबस हे सूर्यदेवाचे ॲपोलोचे नाव.

ॲक्रॉपोलिस : अथेन्समधील अथीनीच्या मंदिराची जागा.

डेलियन सरोवर : इजियन समुद्रातील सर्वांत लहान बेटाचे नाव डेलॉस तेथील सरोवर. तेथून फीबस् ॲपोलो डेल्फीला आला.

पॅलास : कुमारी देवता अथीनीचे दुसरे नाव.

ॲटिकजन : ॲटिका ह्या ग्रीसच्या एका भागाचे रहिवासी.

हेफिस्टसचेपुत्र : झ्यूस व हीराचा मुलगा हेफिस्टस अग्नीदेव. रोमन ह्याला व्हल्कन ह्या नावाने ओळखतात. हा देवांचा कारागीर होता. याचा मुलगा एरिकथॉनिअस. याने अथेन्स स्थापिले म्हणून ग्रीकांना

हेफिस्टसचे पुत्र म्हटले जाते.

**कॉरिसीयन गुहा** : पारनेसस पर्वतावर ही गुहा आहे. अँपोलोची प्रियकरीण अप्सरा कॉरिसीया हिच्या निवासामुळे ह्या गुहेला हे नाव पडले.

**नाभिस्थानातील पाषाण** : डेल्फीच्या मंदिराच्या पुढच्या प्रांगणात एक वेदी म्हणून वापरला जाणारा दगड होता. तो पृथ्वीचा मध्य समजला जात असे. त्याला ऑमफेलॉस म्हणजे नाभि म्हणत.

**ब्रोमियस** : डिओनायससचे दुसरे नाव.

**बॅक्कसचा भक्तसमूह** : बॅक्कस हे डिओनायससचे नाव आहे. त्याचे भक्त.

**पेंथियस** : थीबस्‌चा राजा. याने डिओनायससला मानले नाही म्हणून त्या देवाने त्याला ठार मारले. या गोष्टीवर युरायपीडीजचे "बॅक्काई" हे नाटक आधारले आहे.

**पॉसायडोन** : क्रोनस व ऱ्हीआ ह्यांचा मुलगा. सागरतळाचा राजा. घोड्यांचा रक्षणकर्ता.

**गॉर्गॉन्स** : तीन भयानक राक्षसी – मेडुसा, स्थेनो व यूरियॅली ह्या तिघी फॉर्सिस व सेटोच्या मुली लिबियात रहात होत्या. मेडुसाने अथीनीच्या मंदिरात पॉसायडोनला शय्यासोबत केल्याने अथीनीने तिला शाप दिला व केसांच्या जागी साप व पितळेच्या नख्या असलेली भयंकर राक्षसी केले. जिच्याकडे पहाताच माणसाचा दगड होई.

**हीरा** : क्रॉनोस व ऱ्हीया ह्यांची मुलगी. हिचे आपला बंधू झ्यूस ह्याच्याशी लग्न झाले. त्याने तिला सोनेरी सफरचंदांचे झाड दिले.

**ॲफ्रोदाईटी** : प्रीतीभावनेची देवी. तिच्या जवळ असलेल्या पट्ट्याची जादू अशी होती की, तो घालणाऱ्यावर सर्वजण मोहित होत.

**फीनीयस** : थ्रेसमधील सॅलमायडेससचा राजा. काही गुन्ह्यांबद्दल त्याला आंधळेपणाची शिक्षा झाली होती व दोन हार्पिस नावाच्या राक्षसी त्याला छळीत असत.

**हार्पिज्** : स्त्रीचे मस्तक व पक्ष्यांचे पंख असलेल्या राक्षसी. देव ह्यांचा मानवांना छळण्यासाठी उपयोग करीत असत.

**ट्रिटोनियन सरोवर** : ट्रिटॉनच्या सरोवराची पुढील कथा आहे. अथीनी ही झ्यूस व मेटिसची कन्या. पण तिच्या जन्म होण्यापूर्वी भविष्यवाणीने सांगितले की जन्माला येणारे मूल मुलगी असेल व त्यानंतर मेटिसला जर दुसरे मूल झाले तर तो मुलगा असेल व तो बापाला सिंहासनावरून दूर करील. झ्यूसने त्यामूळे मेटिसला गिळले. नंतर ट्रिटॉन सरोवराच्या काठावर तो हिंडत असतांना त्याचे मस्तक अतिशय दुखू लागले. हर्मिसने हे जाणून हेफिस्टस किंवा प्रोमिथियस् याला झ्यूसचे मस्तक फोडण्यास सांगितले व संपूर्ण शस्त्रधारिणी अथीनी त्यातून बाहेर आली. हे सरोवर भूमध्य समुद्रकिनाऱ्याजवळ लिबियात आहे.

**लिबियातील वसतीस्थान** : अथीनी लिबियाजवळच्या ट्रिटोनियन सरोवराजवळ जन्मली म्हणून ते तिचे वसतीस्थान मानले जाते.

**फ्लेग्रिअन मैदान** : हे ईशान्य ग्रीसमध्ये कॉसिडिसेमध्ये आहे. इथे देव व राक्षस यांच्यामध्ये लढाई झाली. तेव्हा अथीनी देवांची सेनापती होती.

**इक्शिऑन** : फ्लेजियसचा मुलगा. ह्याने आपल्या सासऱ्याला फसवून मारले. झ्यूसने त्याला क्षमा करून स्वर्गात नेऊन त्याचे त्या अपराध पासून शुद्धीकरण केले. पण कृतघ्नतेने त्याने हीराला नादी लावण्याचा प्रयत्न केला. झ्यूसने नेफिली ह्या हीरासारख्या दिसणाऱ्या छायेला निर्माण केले. तिच्यापासून सेंटॉरचा जन्म झाला. शिक्षा म्हणून

इक्शिऑनला एका पेटत्या चक्राला बांधण्यात आले. हे चक्र आकाशात सतत फिरत रहाते.

**टिऱ्हेनियन तुतारी** : मध्य इटलीतल्या एका भागाला ग्रीकलोक टिऱ्हेनिया म्हणत. एटुरिआ हे त्याचे दुसरे नाव. येथील रहिवासी रोमच्या सत्तेविरूद्ध अनेकदा लढले. त्यावेळी त्यांनी फुंकलेल्या तुतारीला हे नाव पडले.

**तीन नियतीदेवता** : क्लॉथो, लॅकेसिस व अॅट्रापॉस ह्या तीन पांढरी वस्त्रे परिधान करणाऱ्या भगिनी.
क्लॉथो ही मानवाच्या नियतीचा धागा कातते, लॅकेसिस तो मापते, व अॅट्रापॉस तो कात्रीने कापते. ह्याप्रमाणे ह्या नियतीदेवता माणसाचे दैव ठरवतात व अखेरीस त्याचा शेवट करतात.

**इरेक्थ्यूस** : अथेन्सचा पहिला राजा. ह्यानेच अथेन्स स्थापन केले यालाच इरेक्थॉनिअस म्हणत.

**अॅडमीटस्** : थेसेलीमधील फेरेचा राजा. अॅलसेस्टिसचा पती. तिने पतीचा प्राण वाचवण्यासाठी आपला प्राण दिला.

**अॅमेझॉनस्** : लढाऊ स्त्रियांची एक जमात. ह्या कॉकेशसमधून येऊन अशिया मायनरमध्ये राहिल्या असे म्हणतात. त्यांचे स्त्रीराज्य असे व त्यांच्यावर राणी राज्य करी. थीसीयसने त्यांच्यावर हल्ला केला आणि त्यांची राणी अँटिओप हिला पळवून आणले. पुढे त्याबद्दल सूड घेण्यासाठी अॅमेझॉननी अॅटिकावर हल्ला केला. पण थीसीयसने त्यांना हरवले. पुढे ट्रॉयच्या वेढ्यात त्या ट्रॉयचा राजा प्रॉअॅम ह्याच्या बाजूने लढल्या.

# थीब्जवर सातांची चढाई

( Seven Against Thebes
या पुस्तकाचा अनुवाद )

लेखक
**इस्किलस**

अनुवादक
**प्रा. आ.ना.पेडणेकर**

# थीब्जवर सातांची चढाई

पात्रे

एटीओक्लीज : थीब्जचा राजा

सैनिक

कोरस ( नारीवृंद) : थीब्जमधील स्त्रिया

अँटिगॉनी : एटीओक्लीजची बहीण

इस्मीनी : एटीओक्लीजची बहीण

अग्रदूत :

थीब्जचे सहा सशस्त्र योद्धे, इतर सैनिक नागरिक व सेवक

थीब्ज नगरीतील खुला चौक चबुतऱ्यावर आदिम देवतांच्या मूर्ती नगरीच्या भिंतीपलीकडे थीब्जच्या विस्तृत मैदानावर वेढा देणाऱ्या सैन्याचा तळ पडल्याचा देखावा. पहाट होत आहे.

तावातावाने बोलत कित्येक नागरिक येत आहेत. काही सैनिकांसह एटीओक्लीज राजा प्रवेश करतो, तेव्हा ते सगळे एकदम स्तब्ध होतात. एटीओक्लीजने राजवस्त्रे परिधान केली आहेत, मात्र त्याच्याजवळ कसलेही शस्त्र नाही.

एटीओक्लीज : कॅडमसच्या पुत्रांनो[1], नागरिक हो,
तुमच्या राज्याचे सुकाणू आहे ज्याच्या हातात,
मध्यवर्ती पुलावरुन अखंड जागृत राहून
मार्ग दाखवीत आहे जो देशाच्या प्रगतीला,
त्याला बोललेच पाहिजे आज आजच्या घटकेच्या कर्तव्याबद्दल.
नीट राहिली सद्य:स्थिती तर समजू कृपा परमेश्वराची.
पण जर का-
देव करो व तसे न होवो –

जर का ओढवले आपले दुर्दैव,
तर मात्र पथापथावर होईल उद्धार एटीओक्लीजच्या नावाचा.
देईल शाप, करील आक्रोश संतप्त नगरी.
कॅडमसस्थापित नगरीचे
यापासून आता रक्षण करो
रक्षकदेव झ्यूस.
पण तुम्हीही केले पाहिजे आपापल्या कर्तव्याचे पालन.
कोवळ्या तरुणांनो, वार्धक्याकडे झुकलेल्यांनो,
उभयतां जतन करा आपापली चैतन्यपूर्ण कर्तृत्वशक्ती
जी चढवते मानवाला थोरवीला.
कर्तव्याची हाक येईल – जागोजागी जागृत रहा.
रक्षण करा दक्षतेने तुमच्या नगरीचे –
तिच्या देवांच्या वेदीचे –
पडू देऊ नका खंड कधीही त्यांच्या यथायोग्य पूजनाअर्चनात.
रक्षण करा आपल्या बाळांचे
तुम्हाला प्रसवणाऱ्या, पोसणाऱ्या प्रिय भूमीचे,
सर्वांचे स्वागत प्रेमाने करणाऱ्या ह्याच दयाशील मातीने
जोपासले तुम्हाला तुम्ही रांगती अर्भके असताना,
तिनेच घेतली जबाबदारी तुमच्या पोषणाची,
तिनेच केले तुम्हाला जबाबदार नरपुंगव, कुलसंस्थापक, शूर ढालाईत,
तिनेच केले तुम्हाला सत्वशील, बलदंड आणि समर्थ
झेलण्यासाठी आजचे आव्हान.
अजूनपर्यंत झुकते आहे नशिबाचे पारडे आमच्या बाजूला.
कृपा देवतांची ! त्यांनीच दिले आहे आम्हाला सुयश
वेढ्याच्या या प्रदीर्घ काळात.
पण आता मात्र–
शकुन सूचक पक्ष्यांचा पालक – आमचा द्रष्टा[१]
अग्नीची मदत घेतल्याशिवायच
श्रवणचिंतन करुन सांगतो अचूकपणे
शकुनांचा होरा;
सूचक चिन्हांचा अर्थ लावून तो म्हणतो आहे –

आज रात्रीच अकीआवासी आखताहेत योजना
प्रखर हल्ला चढवून आपली नगरी उलथून पाडण्याची.
तर मग उचला आयुधे, उठा निघा आता, गर्दी करुन टाका
तटांकडे, मोर्च्यांकडे, प्रवेशद्वारांकडे.
भरुन टाका प्रत्येक बुरुजाचा दरेक प्रस्तर.
प्रवेशद्वारात पाऊल रोवा धीराने, निर्धाराने.
घाबरु नका मुळीच त्या परकियांच्या जमावाला. देव आपला
पाठीराखा, देईल विजय आपल्याला.
( नागरिकांच्या घोषणा, हर्षभरित आरोळ्या )
पाठवले आहे मी माझ्या टेहेळ्यांना
शत्रूसैन्याची पाहाणी करायला. खात्री आहे मला
येतील विनाविलंब घेऊन वार्ता.
अनपेक्षित हल्ल्याने घाबरणार नाही त्यानंतर आम्ही.
( एक सैनिक प्रवेश करतो. )

सैनिक: उदात्त श्रेष्ठ एटीओक्लीज,
कॅडमीआवासी जनांच्या राजा,
शत्रूसेनेतून आणली आहे मी विश्वसनीय वार्ता
सांगतो तुम्हाला माझ्या डोळ्यांना तिथे दिसलेले साद्यन्त दृश्य.
पकडला एक बैल सेनांच्या सात विक्राळ वीर पुरुषांनी.
कापून त्याचा गळा धरले रक्त काळ्या ढालीत.
बैलाच्या रक्तात बुडवीत बोटे, उच्चारुन भयप्रद नावे.
क्रूरतेच्या आणि रक्तपिपासू भयानकतेच्या, अधिष्ठात्यांची.
घेतल्या शपथा त्यांनी : ' नेस्तनाबूत करु
कॅडमीआ नगरी : पुरती धुळीला मिळवू तिला.
नाहीतर मरु भिजवीत शत्रूची भूमि आमच्या रक्ताने '
आणीत होता वस्तू प्रत्येकजण स्वत:च्या स्मृत्यर्थ
आणि ठेवीत होता त्या अॅड्रॅस्टसच्या रथावरती
न्यायला घरी आईवडिलांकडे.
आसवे झरली त्यांच्या डोळ्यातून
परंतु काढला नाही कुणी एकही शोकाचा उद्‌गार.

होते धगधगीत वीरश्रीने प्रत्येक वीराचे पोलादी काळीज –
जशी सिंहाच्या डोळ्यातील रक्तरंजित नजर.
कुवार्ता होती तरीही मी आणली ती सत्वर.
परतलो तेव्हा उचलीत होते नावाच्या चिठ्ठ्या
ठरवण्यासाठी कोणी करायची चढाई.
आमच्या कोणत्या वेशीवर आपली सेना घेऊन.
निवडा तर मग त्वरित नगरीमधून अतिसमर्थ योद्धे
उभे ठाकू द्या त्यांना खुल्या प्रवेशद्वारांशी ; दौडत आहे.
आमच्या रोखाने सगळीच्या सगळी ऑर्गास सेना
वादळाच्या वेगाने.
शत्रूंच्या अश्वांच्या मुखातील शुभ्र फेसाने
शिडकावा झाला आहे समग्र मैदानावर.
गलबताच्या शहाण्या कप्तानाप्रमाणे
करा सगळे सुरक्षित आणि बंदिस्त, आदळण्याआधी
युद्धाचे वादळ नगरीच्या तटांवर
गरजताहेत भूमीवर लाटा सशस्त्र योद्धयांच्या.
सज्ज रहा त्यांच्या प्रतिकाराला मिळेल त्या साधनांनिशी.
जागृत राहतील माझे डोळे टेहळणी करीत दिवसादेखील;
आणीन वार्ता खात्रीलायक थेट रणांगणांतून.
आधीच सावध होऊन टाळाल मग तुम्ही आपल्या पक्षाची हानी.
(सैनिक जातो )

एटीओक्लीज : हे झ्यूस देवा आणि हे पृथ्वीमाते!
ह्या नगरीच्या संरक्षक देवतांनो!
माझ्या पित्याच्या-इडीपस राजाच्या शापामधून[१]
प्रबळ होऊन उठलेल्या सूड देवते!
पहा कृपादृष्टीने या नगरीकडे
जेथून ओघ वाहतो आहे प्रार्थनांचा आम्हा ग्रीकांच्या मुखांमधून.
करू देऊ नका कॅडमसची नगरी उध्वस्त, भग्न.
देऊ नका हो धुळीला मिळू तिची घरे, तिच्या वेदी.
नका देऊ तिला शत्रूंच्या ताब्यात. क्रूर शृंखलांनी

नका करू दास ह्या स्वाधीन भूमीला कॅडमसच्या-
धावत या आमच्या मदतीला.
हे कार्य आहे आपणां उभयतांच्या हितसंबंधाचे-
हीच त्याची आमच्या तर्फे तुम्हापुढे वकिली.
कारण पूजिते आपल्या देवांना ती भूमी
जी करीत असते प्रगतीपथाची वाटचाल.

( एटीओक्लीज जातो. त्याच्यामागून नागरिक जातात. थोड्याच वेळात नारीवृंद प्रवेश करतो. या लहानमोठ्या वयाच्या स्त्रिया अत्यंत घाबरुन गेलेल्या असल्याने कशातरी अव्यवस्थित मागेपुढे चालत आहेत. पलीकडल्या खुल्या मैदानाकडे त्या पहात आहेत.)

नारीवृंद : हाय !
करते आहे आक्रंदन भयविव्हल हृदय माझे, शत्रूची सेना सुटते आहे
मोकाट सोडून आपली छावणी.
पहा, पहा, याच दिशेने पुढे पुढे वाहत येत आहे त्यांचा ओघ,
अग्रभागी आहेत त्यांच्या अश्वारुढ योद्धे.
हवेत उडालेली धूळ सांगते आहे. सारे-
नि:शब्द असूनही सांगते आहे
सरळ सीध्या शैलीने सत्यकथा.
( दूरवर कोलाहल ऐकू येतो.)
भूमीवर होणारा घोड्यांच्या टापांचा खडखडाट
करतो आहे बधीर माझ्या सान्या संवेदना.
येतो आहे आवाज जवळ जवळ वान्याच्या वेगाने.
अनिवार्य गिरिप्रपाताच्या मेघनादासारख्या
गरजताहेत घोड्यांच्या टापा.
ऐका कान देऊन, ऐका हो ऐका, आमची आळवणी
देवांनो आणि देवींनो,
घाला घालतो आहे आमच्यावर मृत्यु. वाचवा आम्हाला.
संरक्षण करा आमच्या तटांचे,
तुटून पडते आहे नगरीवर शत्रूंची सेना.

हातात घेऊन चमकत्या ढाली अन् धारदार शस्त्रे.
कोणता देव कोणती देवी वाचवील आम्हाला
आमच्या पाठीशी उभी ठाकून ?
पवित्र मूर्तींच्या पायांशी पडून, त्यांना घट्ट
कवटाळून करु दे मला तात्काळ त्यांची विनवणी.
दिव्यासनांवर विराजमान झालेल्या अमरांनो,
ऐका आमची आळवणी.
गत्यंतर नाही आता त्यांच्या पायांना मिठी घातल्यावाचून
स्वस्थ उभ्या का आम्ही गोंधळून जाऊन ?
पडला नाही का कानांवर तुमच्या, ढालींचा खणखणाट ?
वस्त्रांच्या, पुष्पमालांच्या समर्पणाने करायला हवी प्रार्थना आज–
आज नाही करायची तर करायची तरी कधी ?
थरथरते आहे काळीज भीतीने माझे ऐकून तो खणखणाट-
तो दणदणाट दशसहस्त्र भाल्यांचा.
ॲरीज देवा, आता तू करणार आहेस तरी काय ?
अनाथ करणार आहेस का सांग.
प्रारंभापासून तुझी असलेली तुझी ही भूमी ?

एटीओक्लीज : स्वर्णशिरस्त्राण मंडित देवा,
नजर वळव, खालती पहा, आमच्या नगरीकडे
बाहीत होतास जिला एकाकाळी मत्प्रिया म्हणून.
( स्त्रिया मूर्तीजवळ जाऊन मूर्तींना कवटाळून बसतात. )
आमच्या देशाच्या साऱ्या त्रात्यांनो-देवांनो धाव घ्या.
पहा आमच्याकडे, करतो आहोत एकमुखाने तुमची प्रार्थना.
दास्याच्या संकटाने भ्यालेल्या आम्ही.
उफाळताहेत नगरीभोवती.
लाटामागून लाटा. योद्धयाच्या कलत्या शिरस्त्राणाच्या तुऱ्यांच्या,
दामटीत आहे त्यांना सारखा पुढे ॲरीजचा श्वास.
तर मग झ्यूस देवा, आमच्या ताता, राजाधिराज झ्यूस देवा,
पिटाळून लाव आमच्या शत्रूंना,
हिसकावून घे त्यांची शिकार.

## थीब्जवर सातांची चढाई

ऑर्गासच्या सैनिकांनी वेढलेला आहे कॅडमसचा किल्ला.
युद्धाच्या या अवजारांनी झालो आहोत भयकंपित आम्ही.
मरणाचे गाणे गाऊ लागलो आहोत किनऱ्या आवाजात.
घोड्यांनी जबड्यात घट्ट धरलेल्या लगामांच्या काढण्या पकडून
आपल्या लखलखाटाने सर्वांत उठून दिसणाऱ्या चिलखतातील
सात सेनानी भाला धरुन हातात.
ठाकताहेत उभे प्रवेशद्वारांवर
उचललेल्या चिठ्ठीतील नावाप्रमाणे, आपल्या वाट्याला आलेल्या.

आणि तू
शक्तिशाली पॅलस
युद्धात आनंदोत्साहाने भाग घेणाऱ्या झ्यूस कन्ये,
तारणहार हो आमच्या ह्या नगरीची.
आणि हे पॉसिडोन, अश्वनिर्मात्या, सागर-स्वामी,
हाणून तुझा मत्स्यांतक त्रिशूळ
भयमुक्त करँ आम्हां सर्वांना
आणि हे अॅरीज युद्धदेवा,
रक्षण कर नगरीचे कॅडमसचे नाव लाभलेल्या.
तुझ्या दैदिप्यमान उपस्थितीने रक्षण कर आमचे.
आणि तू सुद्धा सायप्रसच्या देवते,
आमच्या वंशाच्या माते,
आम्हाला सहाय्य कर.
जरी जन्मलो आहोत आम्ही रक्तापासून तुझ्याच, तरीही
हाकारतो तुला तुझ्यासंनिध येऊन,
अन्य देवतांची करतो
तशी प्रार्थना तुझीही करीत.
अपोलो वृकदेवा, तुटून पड लांडगा होऊन तुही
शत्रूच्या सैनिकांवर या मेंढ्यांच्या कळपांवर.
कर आमच्या प्रत्येक दुःखोद्‌गाराची भरपाई.
त्यांच्या दुःखोद्‌गाराने.
आणि तू लीटोच्या कुवारकन्ये, कर सज्ज तुझे धनुष्य आता.

( थोडा वेळ शांतता. त्या अवधीत त्या सर्व स्त्रिया धास्तावून कानोसा घेतात. मग भयभीत आरोळी मारुन शांततेचा भंग करतात. )

मी ऐकला रथांचा धडधडाट,
घालताहेत ते नगरीला वेढा, मदतीला धाव हेरा राणी !
तो होता आवाज ओझ्याने दबलेल्या आसांच्या खडखडाटाचा-
दया येऊ दे आमची आर्टेमिसदेवी.
करताहेत दाहीदिशा पिसाट ओरडा सारख्या
भालाफेकींच्या कंपलहरीच्या रुपाने.
होणार तरी काय आता या नगरीची दशा? काय घडेल आता ?
होणार आहे तरी काय याचा शेवट ईश्वरी संकेताने ?
( बाहेर काहीतरी कोसळल्याचा आवाज, स्त्रिया पुन्हा किंचाळतात)
ऐका ! हे परमप्रिय अँपॉलो देवा !
तटावर होत आहे दगडांचा वर्षाव,
प्रवेशद्वारात आहे ब्रॉझने मढवलेल्या ढालींचा गडगडाट.
आणि तू अथीनीराणी* रणांगणात सदा यशस्विनी होणारी,
झ्यूसने दिला आहे तुला पवित्र अधिकार
युद्ध परिणतीचा निर्णय करण्याचा.
आमच्या बाजूने ठाक उभी तू.
अन् वाचव तुझे गृह-ही सप्तद्वारपुरी.
ऐका, आमच्या नगरीच्या संरक्षक तटांचे संरक्षण करणाऱ्या,
संपूर्ण सत्ताधारी, सर्वश्रेष्ठ देवदेवींनो, ऐका. आमची प्रार्थना
रणक्रंदनात श्रमी झालेली आमची ही नगरी
आमच्याविषयी परका भाव मनी बाळगणाऱ्या शत्रूच्या
नका करु हवाली, आमची श्रद्धा डावलून.
हात पुढे पसरुन
प्रार्थना करणाऱ्या आम्हा कुमारिकांची ऐका प्रार्थना
आणि न्याय द्या आम्हाला.
ऐका, आमच्या प्राणप्रिय देवांनो,
आमच्या प्रार्थना ऐकून करा. आम्हाला मुक्त भयातून.
प्रकट करा नगरीवरील माया तिच्यावर तुमचा वरदहस्त ठेवून.

थीब्जवर सातांची चढाई

विसरु नका नगरवासियांनी अर्पिलेली वायने,
करा आमचे रक्षण त्यांची आठवण ठेवून.
आमच्या नगरीने आचरिलेले पवित्र विधी,
भक्तिभावाने दिलेल्या यज्ञीय आहुती,
करा त्यांचे चिंतन-मनन.
( एटीओक्लीज प्रवेश करतो. )

एटीओक्लीज : वीट आला आहे मला तुमच्या करणीचा.
तुच्छ क्षुद्रांनो, मी विचारतो कोणती ही रीत नगरीच्या रक्षणाची ?
आपल्या संरक्षक दैवतांच्या मूर्तींना,
तुम्ही मिठ्या मारताहात, आक्रंदताहात, किंचाळताहात,
तिरस्कार वाटतो आहे साऱ्या सुज्ञांना तुमचा.
मिळेल का उत्तेजन अशाने,
या बायका म्हणजे - तटबंदीशी लढणाऱ्या योद्ध्यांना?.
छे ! छे ! नेहमी दूरच राहू दे मला या
बायकांपासून संगत नको यांची कधीही.
युद्धकाळात किंवा शांततेच्या सौख्यसमयी नकोत या जवळ,
दिले जर का बायकांना स्वतःच्या मार्गाने जाण्याचे स्वातंत्र्य
तर त्या बनतात उद्धट, असह्य होते त्यांची वागणूक;
पण एकदा का त्या भयभीत झाल्या म्हणजे मात्र त्या दुप्पट करतात,
हरेक संकट—मग ते असो घरामधील किंवा नगरीवरील.
पहा ना आताच—

धावताहात तुम्ही इतस्ततः भयंकर भीतीने घेरलेल्या
आणि काठोकाठ भरताहात आमच्या नागरिकांची काळिजे
धडकीने आणि भीरुतेने.
अशाने मिळते शत्रूला अगदी मनमानी संधी
आणि अशी तटांच्या आत आमच्या गळ्यांवर आम्हीच
फिरवतो आहो ही तीव्र छेदक सुरी.
बायांच्या मेळाव्यात जे गुरफटले
त्यांच्या हेच यायचे शेवटी नशिबी.

उल्लंघन केले आता जर कोणी माझ्या आज्ञांचे–
असू दे पुरुष, असू दे स्त्री असू दे अथवा तृतीयपंथी
करतील त्याला मृत्यूदंड काळे दगड घरांमधील.
होय, निश्चितच पावेल मृत्यु तो बचावाची संधी न मिळता.
नागरिकांचे हात ठेचतील त्याला दगड मारुन.[१]
युद्ध आहे कार्य पुरुषजातीचे; नको आहे बडबड
बायाबापड्यांची.

इथे घराबाहेर नाही स्थान तुम्हा बायकांना,
चला चालत्या व्हा घरात.
करु शकणार नाही तेथे तुम्ही कसलाही उपद्रव.
ऐकलीत ना आता माझी आज्ञा ? की नाही ऐकलीत ?
की सगळ्याच झाला आहात ठार बहिऱ्या ?

नारीवृंद : ईडीपसच्या लाडक्या पुत्रा,
माझे काळीच धडधडले कानावर पडताच–
खडखडाट रथांचा,
चीत्कार आसांचा आणि गतीमान चाकांचा,
कर्कश आवाज घोड्यांच्या जबड्यातील लोहखंडांचा–
अग्नीत तापवून ठोकून घडवलेल्या,
घोड्यांची शीघ्रगती रोखणाऱ्या,
सुकाणूप्रमाणे असणाऱ्या त्या लोहखंडांचा.

एटीओक्लीज : वादळी समुद्रात मोठ्या कष्टाने जहाजाचे नियंत्रण करणारा
चाक सोडून सुकाणूचे
धाव घेईल का नाळेकडे कधी स्वरक्षणार्थ ?

नारीवृंद : नाही, कधीच नाही.
पण माझी आहे श्रद्धा देवांवरती; धाव घेतली मी
म्हणून तर एकदम त्या आदिम मूर्तींकडे,
जेव्हा ऐकू आला प्राणघातक असा तो जणू गारांचा मारा

प्रवेशद्वारावरती.
खरे आहे अगदी भीतीने दिली माझ्या पायांना गती,
धास्तावून मी केली प्रार्थना अमर देवतांची,
नगरीवर असावा त्यांचा संरक्षक वरदहस्त म्हणून.

एटीओक्लीज : शत्रूच्या जहाजाने धक्का दिल्या तरी राहो अभेद्य
आमचे जहाज– अशी करा तर मग प्रार्थना.
दाद न देवोत शत्रूंच्या भाल्यांना आमचे तट.
होणार नाही का देवांचाच फायदा त्यामुळे ?
ऐकले असाल म्हणतात ते की –
पराभूत नगरीला सोडून जातात देवदेवता.

नारीवृंद : नको जिवंत रहाणे पाहाण्यासाठी
नगरीला सोडून जाणाऱ्या देवांचा सगळा समुदाय,
रस्त्यारस्त्यातून आमच्या
जाळपोळ, तोडमोड, नाश करीत गर्दी करणारे शत्रूसैनिक,
नको जिवंत राहणे या डोळ्यांनी पहायला.

एटीओक्लीज : करायचीच असेल तुम्हाला तर करा प्रार्थना.
पण देऊ नका तिलांजली सुज्ञपणाला.
सुभाषित सांगते कुठे मिळेल सुरक्षितता ते.
ती आहे कन्या,
आज्ञाधारकता आणि तारणहार या मातापित्यांची.

नारीवृंद : खरे आहे ते, परंतु त्यांहून जास्त समर्थ आहेत देव.
संकटकाळात माणसे होतात अगतिक, कधीकधी
झेपावतात काळे ढग जेव्हा त्यांच्या डोळ्यांवर,
तेव्हा त्या अति दुर्धर अरिष्टांतून
मार्ग दाखवतो त्यांना देवांचाच मदतीचा हात.

एटीओक्लीज : शत्रूच्या बळाशी आपले बळ अजमावताना

देवांची सेवा, रक्ताची अर्घ्ये, शकुन ज्ञानार्थ,
यज्ञांतील आहुती,
ह्या गोष्टी असतात पुरुषजातीच्या कार्यक्षेत्रातील,
तुम्हा बायकांचे कार्य आहे केवळ घरात शांत राहणे.

नारीवृंद : देवांच्याच कृपेने आम्ही राहत आहोत अजिंक्य नगरीत अन्
ठेवल्या आहेत दूर आमच्या तटांनी शत्रूंच्या झुंडी.
देवाचा नाही ओढवला आमच्यावर कोप,
केवळ करतो आहोत त्यांची प्रार्थना रात्रंदिवस म्हणून.

एटीओक्लीज : सुखेनैव करा देवांची पूजा. माझा नाही तिला मुळीच विरोध.
मात्र शांत, रहा स्तब्ध, जाऊ नका धास्तीच्या आहारी जराही
नाहीतर पसरवाल ही नैराश्याची साथ आमच्या नागरिकांमध्ये.

नारीवृंद : भयभीत झालेले होते ऐकून युद्धाचा एकदम माजलेला कोलाहल,
धावत सुटले धास्तावून
ॲक्रॉपॉलिसकडे– देवांच्या पवित्र निवासाकडे.

एटीओक्लीज : माझे ऐका ! किंचाळत सुटू नका.
जखमी लोकांच्या, मृत लोकांच्या वार्ता कानी पडताच.
ॲरीजचा तर नैवेद्यच आहे मानवी रक्त.

नारीवृंद : ऐका, त्या तिकडे कान द्या.
मला ऐकू आले घोड्यांचे खिंकाळणे.

एटीओक्लीज : ऐकत राहू नका एवढे कान टवकारुन

नारीवृंद : अहो, या आमच्या गढीमधून
अगदी जमिनीपासून उमटताहेत दु:खोद्गार.
वेढताहेत आम्हाल शत्रूंचे सैनिक

एटीओक्लीज : वेडा पडतो आहे यात शंकाच नाही तरीही
घेईन मी त्याबद्दल पुरती खबरदारी.
माझ्यावर भरवसा टाका त्या साऱ्या गोष्टीचा.

नारीवृंद : प्रवेशद्वारांवरचे प्रचंड धडाके वाढताहेत सारखे -
भीती वाटते आहे हो मला.

एटीओक्लीज : चूप, चूप एकदम,
नगरीमधे हा असा गाजावाजा
नको आहे व्हायला मला या गोष्टीचा.

नारीवृंद : आमच्या जीवनाशी एकजीव झालेल्या आमच्या देवांनो,
निराधार करु नका ह्या तटांना.

एटीओक्लीज : रोग पडो तुम्हा सर्वांवर
धीर धरुन गप्प बसायला तुम्ही काय घ्याल ?

नारीवृंद : हे देवतांनो, तुमची माणसं आहोत आम्ही.
रक्षण करा तुमच्या भक्तांचे दास्यापासून.

एटीओक्लीज : करता आहात तुम्हीच मला आणि आम्हा सर्वांना दास.

नारीवृंद : सर्वशक्तिमान झ्यूस देवा उगार शस्त्र आमच्या शत्रूंवर.

एटीओक्लीज : झ्यूस देवा, निर्मून स्त्रीजात कायपण अजब भेट ! दिलीस आम्हाला

नारीवृंद : यातना सोसाव्या लागतात. पुरुषांप्रमाणे स्त्रियांनादेखील
शत्रूंच्या ताब्यात नगरी गेली तर.

एटीओक्लीज : धजावता कशी असे शब्द उच्चारायला
ठेवून हात पवित्र मूर्तींवर ?

नारीवृंद : खचून गेली आहे हिंमत माझी पुरती
बोबडी वळली आहे माझी भयंकर भीतीने
अडखळते आहे जीभ सारखी.

एटीओक्लीज : विनवतो मी तुम्हाला
भाग पाडू नका कडक उपाय योजायला मला.

नारीवृंद : कळत नाही आम्हाला तुम्हाला काय हवे आहे ते.
स्पष्ट करा ना जरा आमच्यासाठी ?

एटीओक्लीज : मला हवी आहे तुमची रडकी बडबड बंद व्हायला.
नका लोटू नैराश्याच्या गर्तेत तुमच्या मित्रांना.

नारीवृंद : जशी तुमची आज्ञा. गप्प राहतो आम्ही.
एकच आहे दैव तुम्हाआम्हा-सर्वांचे.
सोसू आम्ही ते निमूटपणाने.

एटीओक्लीज : तुमची ही वृत्ती पाहून आता वाटते जास्त समाधान.
आता आणखी एक पाऊल पुढे टाका.
नका राहू कवळून ह्या मूर्तींना; करा प्रार्थना अशी-
जिच्यामुळे देव करतील लढाई आमच्यासाठी-
अशी प्रार्थना अधिक फलदायी.
ध्यान देऊन ऐका माझ्या नवसांच्या प्रतिज्ञा प्रथम
आणि मग करा मन:पूर्वक विजयाचे घोष जोरदार,
यज्ञसमयीचे घोष.
सर्व ग्रीकांना परिचित असे.
आणि द्या स्फूर्ती आमच्या सैनिकांना
बनवा त्यांना निर्भय रणांगणावर.

आमच्या नगरीच्या पथापथांवर आणि आमच्या शेतजमिनींवर
दक्षतेने नजर ठेवणाऱ्या आमच्या संरक्षक देवतांना,

थीब्जवर सातांची चढाई

डिर्सेच्या जलधारांना आणि इस्मीनस नदीला
या साऱ्यांना उद्देशून प्रतिज्ञापूर्वक बोलतो नवस
आज जर झाला आमचा जय,
आज जर झाली मुक्त आमची नगरी
तर न्हाऊ घालू देवाच्या वेदीना यज्ञीय मेंढ्यांच्या रक्ताने.
अर्पण करु त्यांना बैलांचे बळी,
आमच्या शत्रूंची वस्त्रे लुटून
चढवू देवांवर विजयचिन्हे.
हे देवांनो, ऐका लक्ष देऊन माझे हे शब्द;
माळांसारखी तुमच्या पवित्र मंदिरांमधे टांगून ठेवीन
युद्धातील लूट–शत्रूंची वस्त्रे.
तलवारींनी जागोजाग भोसकून टाकलेली.
प्रार्थना करायची अशा प्रकारची.
उच्च स्वरातील आक्रोशाने नव्हे
किंवा बरळून मूर्ख रानटी शब्द देवांपुढे,
अशाने नाही मुळीच व्हायचे तुमचे रक्षण भवितव्यापासून.
तोपर्यंत निवडतो मी जाऊन सहा योद्धे सैन्यातून आणि परत येऊन
नेमतो त्यांना सप्तद्वारांचे रक्षण करायला मी आहे सातवा.
स्वाभिमानात व बळात शत्रूशी करु आम्ही बरोबरी.
नाहीतर पसरेल वेगाने घायकुतीची अफवा साऱ्या नागरिकात,
त्या गर्जनेने व्याप्त हातील सर्वांची मने अहितकारी अशा अशुभाच्या
आशंकेच्या तापदायक व्यथेने.
( एटीओक्लीज जातो )

नारीवृंद : लक्षात येते आहे तुम्ही काय म्हणता ते,
तरीपणे भीतीने माझे मन आहे अस्वस्थ, आशंकित.
वेढा घालणाऱ्या झुंडींची धास्ती,
धडकते आहे काळजाजवळच्या काळजीमुळे
भयकंपित कबूतर जसे घरट्यातील पिलांच्या चिंतेने,
त्यांच्या शय्येत सरपटणाऱ्या क्रूर सर्पाला धास्तावते तसे
बघा, बघा. धावताहेत पुढे पुढे.

ग्रीक शोकनाट्ये

आमच्या तटांकडे शत्रूंचे सैनिक-
नाना प्रकारचे, नाना लढवय्ये—
जणू सबंध राष्ट्रच शस्त्रे घेऊन उठले आहे.
काय होणार आहे आमची अवस्था ?
पहा, पहा, पुन्हा
करताहेत ते अणकुचीदार दगडांचा वर्षाव.
तलवारींनी अन् लटकावलेल्या भाल्यांनी अवघडलेल्या
आमच्या सैनिकांवर.
स्वर्गोद्‌भव देवांनो,
सर्वशक्तिनिशी आपल्या करा रक्षण
कॅडमसच्या नगरीचे, कॅडमसने रुजवलेल्या वंशाचे. –
जर तुम्ही केली शत्रूच्या स्वाधीन आमची भरगच्च भूमी,
मिळेल कुठे तुम्हाला
या देशाहून अधिक चांगला निवासयोग्य देश ?
आणि कुठे मिळतील डिर्सेच्या जलधारा सर्व जलांहून अत्यंत पोषक
आहे ज्यातील जल,
जे पुरवतात पृथ्वीला वेढणारा पॉसिडोन
आणि टेथायसची मुले
लोकांची तृषा शमवण्यासाठी ?
म्हणून प्रार्थितो रक्षक देवांनो,
कोसळवा सर्वनाश दारांशी भिडलेल्या शत्रूंच्या सैनिकांवर-
उडवा त्यांच्या ढाली, करा त्यांची कत्तल
आणि प्राप्त करुन घ्या आमच्या लोकांच्या मुखातून गुणगौरव.
व्हा आमच्या नगरीचे तारणहार.
पक्की स्थिर करा तुमची अधिष्ठाने आमच्या मधील,
आमच्या उच्चरवातील आक्रोशांना आणि प्रार्थनांना ओ देऊन.

किती शोचनीय गोष्ट आहे ही
की युगानुयुगापासून वसलेल्या या नगरीच्या भाळी
लिहिला जावा सर्वनाशाचा शाप
ईश्वरेच्छेने आणि अकीआच्या रहिवाशांच्या हातांनी.

## थीब्जवर सातांची चढाई

तलवारींच्या जोरावर जिंकली जाणार ही नगरी अन् बनणार गुलाम,
उजाड, अवमानित;
उरणार फक्त धुमसत्या कोळशांचा कोसळला ढिगारा ?
तरुण अन् वृद्ध विधवांना नेतील ओढीत दावी करुन केसांची
जसे घोड्यांना ओढीत नेतात तशा.
लक्तरे झालेल्या वस्त्रांनी वेढलेल्या.
त्या भग्नावशेष नगरीतून माणसे खेचली जाताहेत बाहेर–
आणि मग उठतो एकच संमिश्र कोलाहल
कर्मभोग भोगायला निघालेल्या कैद्यांचा.
भेवडावीत आहे माझ्या मनाला हे भयाण भविष्य.
विवाहविधीत अजून नाही खुडली गेली ज्यांची कौमार्यपुष्पे
अशा कन्या, स्वगृही हळुवारपणे वाढवलेल्या
जातील नव्या घराकडे नाखुषीने पथ तुडवीत.
त्यांच्यासाठी वाहील आसवांचा पूर डोळ्यांमधून
काय होईल त्यांची अवस्था ?
मी तर म्हणेन–त्यांच्याहून असतील अधिक सुखात
मरणाच्या मिठीतील माणसे.
पराभूत होते नगरी तेव्हा
भोगाव्या लागतात अगणित यातना, अगणित दु:खे.
कैद करतात, ठार करतात माणसे माणसांना.
आगी लावतात,
सारा परिसर. टाकतात धुराने दुर्गंधित करुन
अॅरीजचा उन्माद करतो पागल माणसांच्या जमावांना,
सोडतो उन्माद अमंगल फूत्कार साऱ्या पवित्र भावनांवर.
आरोळ्यांनी दुमदुमताहेत पथ सारे,
कोसळून पडते मोर्चेबंदी तटांवरील,
योद्धे भिडतात योद्ध्यांशी आणि
कोसळतात खाली भाल्यांच्या माऱ्याने,
स्तनपान करताना ठार झालेल्या बाळांसाठी
आक्रोश करतात नवजात अर्भकांच्या माता
रक्ताने माखलेल्या,

भटकत्या सैनिकांच्या झुंडीच्या झुंडी
करतात ताटातुटी एकाच कुटुंबातील माणसांच्या.
लुटीने भारावलेले भांडतात लुटारु दुसऱ्या लुटारुंशी
आणखी लूट हिसकावण्यासाठी.
हिस्सा कमी किंवा सारखाच म्हणून
वाद घालणारे एकमेकांना म्हणतात
प्रत्येकाने पहावे आपापल्यापुरते
तुम्ही जर राहिलात मागे तर कोण थांबतो तुमच्यासाठी ?

सर्व प्रकारचे अन्नसाठे विखुरतात जमिनीवर
कुठेतरी कसे तरी.
दु:खीकष्टी करणारे हे दृश्य गृहिणींना.
भूमातेच्या उदार देणग्या-कशाबशा एकत्र केलेल्या
वाहून जाताहेत महापुरात अविचारी उथळेपणाच्या.
बनल्या आहेत तरुण स्त्रिया.
आता गुलाम-युद्धातील लूटच केवळ
परिचित प्रथमच त्या दु:खयातनांशी.
सज्ज आहे त्यांच्यासाठी
दु:खदायक शय्या शत्रूंजयाची--
शत्रूस त्याने पराभूत केले एवढ्यासाठीच फक्त त्याचा त्या भाग्यावर
हक्क.
तिथे रात्रीबरोबर होईल त्यांच्या नवजीवनाची सुरुवात.
यातना आणि अविरत वाहणारे अश्रू
हेच त्या जीवनातील सौख्य आता.

नारीवृंद : पहा, पहा, सख्यांनो,

पहिला गट : निश्चितच येत आहे इकडे तोच सैनिक
जो सांगणार होता एखादी नवीन वार्ता रणांगणावरील.
पडताहेत त्याची पावले रथचक्राच्या द्रुत वेगाने

नारीवृंद: येतो आहे राजा, पुत्र इडिपसचा स्वत:च इकडे

दुसरा गट : अगदी वेळेवर दूताची वार्ता ऐकण्यासाठी.
पडताहेत त्याचीही पावले भरभर लवकर पोचण्याच्या इच्छेने.

( एका बाजूने सैनिक प्रवेश करतो. दुसऱ्या बाजूने ऐटीओक्लीज.
एटीओक्लीजच्या बरोबर सहा योद्धे आणि इतर काही सैनिक )

सैनिक : ठाऊक झालीय मला अचूक रचना शत्रूसैन्याची,
सांगू शकतो मी, चिठ्ठ्या उचलल्यानंतर
कोणत्या द्वाराशी कोणता योद्धा नेमला गेला ते.
टायडीअस आहे गर्जत उभा
प्रोइटिड द्वारात केव्हाचाच.
पण पार करायला इस्मीनस नदी अनुज्ञा नाही.
द्रष्ट्याची त्याला. कारण अनुकूल नव्हते बळींचे शकुन.
ऐन दुपारी फुत्कारणाऱ्या सर्पासारखा.
युद्ध पिपासेने पिसाट झालेला टायडीअस
मारा करतो आहे अपशब्दांच्या आरोळ्यांचा.

सैनिक : इक्लेजपुत्र द्रष्ट्यावर[१]
म्हणतो आहे, पारंगत आहेस तू
मृत्युच्या मार्गातून निसटून जाण्यात
युद्धाचा विचारही सोसत नाही इतका तू भ्याड.
याप्रमाणे जोरजोराने ओरडताना हलवीत आहे.
सावली करणारे तीनही उंच तुरे
शिरस्त्राणाची आयाळच असे.
आणि दरम्यान ढालीच्या आतील काशाच्या घंटा
करु लागताहेत भयानक निनाद.
अन् मिरवते आहे ढालीच्या अग्रभागी घमेंडखोर रेखांकन:
कोरलेले आहे आकाश लखलखणारे तारकांनी
आणि मध्यावर तारकांमधे उठून दिसणारा झळाळणारा

पौर्णिमेचा कांतीमान चंद्र – रात्रीचा प्रत्यक्ष नेत्रच जणू,
उत्साहाने मिरवीत आपले चिलखत गर्वाने देत आहे. आरोळ्या
नदीकाठावर युद्धासाठी हपापलेला वीर.
तुतारीचा पुकार कधी होतो एकदाचा.
म्हणून चळवळत राहिलेला जागच्याजागी.
स्पर्धेला उत्सुक झालेला रथाला जुंपलेला
लगाम चावीत अधीरपणे फुरफुरणारा
बेफाम घोडाच जणू.
लढणार आहे कोण बरोबरीने त्याच्यासमोर
होईल जेव्हा स्पर्धेला प्रारंभ अडसर हटवून ?
तेव्हा आहे कोणी खात्रीचा वीर
जो प्रोईटसद्वार समर्थपणे झुंजवू शकेल ?

एटीओक्लीज : भीत नाही मी मुळीच कुणाच्याही जामानिम्याला
कोरलेली चित्रे, ढालीतील घंटा, शिरस्त्राणांचे तुरे
थोड्याच करणार आहेत जखमा
त्यांच्या भाल्यावाचून ?
आणि तू सांगतोस
त्याच्या ढालीवरील रजनीच्या रेखांकनाबद्दल.
अस्मानी नक्षत्रांचे तेज त्याच्या ढालीवरुन उसळते आहे म्हणे !
काय नेम ! असा मूर्खपणाच ठरतो माणसाचे भविष्य
घोषित करणारा

काय होईल सांग
कोसळली जर काळरात्रच त्याच्या डोळ्यांवर ? मला वाटते-
सिद्ध करुन देईल हे आढ्यताखोर रेखांकित चिन्ह
आपला अर्थ आपल्याला मिरवणाऱ्या योग्य रीतीने.
सांगू लागेल त्याची आढ्यता,
भविष्यवाणी त्याच्याच नाशाची
आणि तेच होईल न्यायास धरुन
टायडीअसशी लढायला सज्ज आहे हा शूर अस्टॅकस पुत्र

नेमतो आहे मी त्याला ह्या द्वाराच्या संरक्षणासाठी
जन्मलेला आहे तो थोर कुळात,
नम्रतेच्या सिंहासनाला मानतो तो,
अप्रिय आहे त्याला उद्धट वाक्तांडव,
मागे मागे राहतो तो लाजिरवाण्या कामापासून,
मात्र सरसावतो पुढे युद्धकार्याला.
ॲरीजने वाचवले होते.
ह्याच भूमीत रुजण्यास आलेल्या मानवांपैकी" काहींना.
हा त्यांतील एक मेलॅनिपस.
त्याच वृक्षांची एक उमदी शाखा,
आमच्या भूमीचा सच्चा पुत्र
ॲरीज करील युद्धाचा शेवट अनुकूल वा प्रतिकूल
नशिबाचे दान पडेल तसा.
पण एक गोष्ट मात्र निश्चित–
न्यायदेवतेच्या –
- आप्तविषयक कर्तव्यांच्या अधिष्टात्री देवतेच्या दंडकानुरुप
निघतो आहे तो रक्षण करण्यासाठी आपल्या जन्मभूमीचे
शत्रूच्या तलवारींपासून.
( मेलॅनिपस जातो )

नारीवृंद : निघाला आमचा कैवारी न्यायदेवतेचे नाव घेऊन
झुंजायला आमच्या नगरीप्रीत्यर्थ
देवकृपेने मिळो त्याला जय !
पण थरकाप होतो माझ्या काळजाचा
पाहून रक्ताच्या थारोळ्यातील वीरपुरुष
प्राण दिले ज्यांनी लढता लढता प्रियस्वजनांसाठी.

सैनिक : देवकृपेने मिळू दे विजय मेलॅनिपसला !
इलेक्ट्रन द्वारावर नेमला गेला आहे चिठ्ठीप्रमाणे
कॅपॅन्युस[८]
टायडीअसहून आहे तो गर्विष्ठ, प्रतिराक्षसच जसा.

बढायांमधून दिसते त्याची अमानुष आढ्यता,
करतो आहे मारा विचित्र भयाण धमक्यांचा
आमच्या तटबंदीवर.
विफल ठरोत देवांच्या कृपेने त्या साऱ्या.
म्हणतो आहे तो 'लुटणार आहे मी सगळी नगरी—
ईश्वराची इच्छा असो वा नसो, हटणार नाही मी
प्रत्यक्ष झ्यूसच्या वज्राचा प्रतिस्फोट झाला
माझ्या पायाशी तरी.'
विजेचे लोळ, अशनीपात म्हणजे त्याच्या लेखी
फक्त सूर्याचा दुपारचा दाह.
त्याच्या ढालीवर रेखांकित केलेले चिन्ह आहे. नि:शस्त्र वीराचे.
दोन्ही हातात घट्ट पकडलेली उफाळणारी पेटती मशाल
हेच त्याचे शस्त्र.
गरजतो आहे सोनेरी अक्षरात:
जाळून खाक करणार आहे मी सगळी नगरी
स्वीकारायला त्याचे आव्हान पाठवा कोणाला तरी
कोण जातो बोला—
त्याच्या बढायांना पुरुन उरेल असा कोण योद्धा
तोडीस तोड होईल त्याच्या ?

एटीओक्लीज : त्याच्यामुळे सुद्धा पडते आहे आमच्या लाभात आणखी भर.
गर्विष्ठ माणसे शेफारतात मूर्खपणाने
तेव्हा त्यांची जीभ उलटते त्यांच्यावर
आणि उमटतात तिच्यातून त्यांच्यावरच दोषारोप करणारे
सच्चे बोल.
कॅपॅन्यूसच्या धमक्या नाहीत केवळ शाब्दिक बडबड.
सज्ज आहे तो प्रत्यक्ष कृतीसाठी देवांना धिक्कारुन.
मर्त्यजीव, पण धजतो आहे द्यायला आव्हान स्वर्गाला.
माथेफिरुच्या उन्मादी उत्साहाने.
झ्यूसदेवाच्या कानावर आदळताहेत मेघगर्जनेसारख्या
त्याच्या शब्दांच्या फोफावत जाणाऱ्या लाटा.

आणि खात्री आहे माझी
त्याचा तो मशालवाला
उलटेल त्याच्यावरच त्याची लायकीच आहे तशी.
मग त्याच्यावर होणारा तो अशनीपात –
त्याला साजणार नाही उपमा दुपारच्या दाहाची.
त्या वीराशी लढणार आहे पॉलीफॉन्टीज –
मितभाषी, तेजस्वी, धैर्यशाली.
त्याचे सामर्थ्य करील निश्चित आमचे रक्षण.
आमचे कैवारी आर्टेमिस[१] आणि इतर देव यांच्या कृपेने !
( पॉलीफॉन्टीज जातो )

नारीवृंद : आता सांग कोण आहे योद्धा तिसऱ्या द्वाराशी नेमलेला ?
नष्ट होवो तो बढाईखोर.
आमच्या नगरीला मोठमोठ्याने धमक्या देणारा.
घुसून आमच्या घरात आमची अक्षत विश्रांतिस्थाने
उजाड करू पाहणारा तो उन्मत्त भालाईत.
निष्क्रिय होवो. वज्राघाताने .
आपले दुष्ट कृत्य करण्यापूर्वीच

सैनिक : आता तिसऱ्या वेशीवर चढाई करणाराचे सांगतो नाव.
ब्रॉंझच्या उताण्या शिरस्त्राणातील चिठ्ठ्यांमधून
वर उसळली चिठ्ठी एटीओक्लसच्या पाठवणीची.
भिडवील आता तो आपली सेना नीस्टन द्वाराला.
उतावीळ झाल्या आहेत त्याच्या अस्वस्थ घोड्या
धडका द्यायला प्रवेशद्वारावर.
जसजसा तो फिरवतो त्यांना निरनिराळ्या दिशांना
तसतशा त्या उडवताहेत दिमाखाने आपली शिरोबंधने.
त्यांच्या तोंडावरील झापडांच्या नळ्या.
थरथरताहेत त्या उमद्या जनावरांच्या श्वासोच्छ्वासांनी
आणि ऐकू येते आहे त्यांचे उन्मत्त संगीत बाहेर.
त्या योद्ध्याची ढाल मिरवते आहे रेखांकित चित्रण

लीनतेचा स्पर्श नाही त्याला एका चिलखतधारी वीरपुरुषाचे,
शत्रूच्या नगरीचा पाडाव करण्यासाठी तिच्या तटावर
शिडीने चढणाऱ्या.
कोरलेली आहे ढालीवर त्याचीसुद्धा आरोळी
'अशक्य आहे ॲरिसलाही मला हटवणे
या नगरीच्या तटांपासून'.
त्याच्याविरुद्ध लढायला धाडा खात्रीचा वीर
जो दास्यशृंखला पडू देणार नाही आमच्या देशाभोवती.

एटीओक्लीज : हा पहा उभा केला तात्काळ मी योद्धा
मी पाठवतो वीर मेगॅरसला.
भूमीमध्ये रुजलेल्यांचा वंशज, क्रेओनचा पुत्र
शब्दांऐवजी हातच त्याचे घोषित करतील त्याची
कर्तबगारी.
त्याची केली आहे आम्ही निवड, नशीब साथ करो त्याची.
ऐकून घोर गाज फुरफुरणाऱ्या घोड्यांची
पळणार नाही तो थरकापत प्रवेशद्वार सोडून.
युद्धात मरुन फेडील ऋण पोसणाऱ्या जन्मभूमीचे.
नाहीतर जिंकून दोनही वीरांना
आणि जिंकून किल्ला ढालीवरील.
आपली लूट नेऊन सजवील आपल्या वडिलांचे घर.
चल सांग आता पुढील क्रमांकाच्या योद्ध्याचे बढाईचे बोल
गाळू नको एवढाही तपशील.

नारीवृंद : आमच्या घरांचे रक्षण करणाऱ्या देवा !
करतो आहोत तुझी प्रार्थना
यश दे आम्हाला आमच्या अंगीकृत कार्यात,
येऊ दे मृत्यु. आमच्या शत्रूंच्या वाट्याला
आमच्या नगरीला धमकावणाऱ्या
उन्मत्त गर्विष्ठ बढाईखोरांवर
सूड घेणाऱ्या झ्यूस देवाची वळू दे संतप्त नजर.

सैनिक : ॲथीना आँकाच्या[1] जवळील द्वार येताच वाट्याला
गर्जना करीत ठाणे धरायला हजर झाला चौथा—
उंच देखणा हिपॉमिडॉन. विश्वास ठेवा माझ्यावर
थरकाप झाला माझा, जेव्हा पाहिली त्याच्या हातातली
सतत फिरती भव्य वाटोळी ढाल—
धान्य झोडपण्याची जमीनच अशी.
त्याच्या ढालीवर ज्याने केली इतकी कौशल्याची कलाकुसर
तो काही हीणकस कारागीर नव्हता बरें.
चित्रित केलेले चिन्ह आहे—
अत्युष्ण उच्छ्वास
अन् चकाकता धूर— जवळ जवळ ज्वालाच मुखातून सोडणाऱ्या टायफॉनचे.
वेढीत आहेत ढालीच्या कडेला सर्पांची वेटोळी
घट्ट जखडून ठेवण्यासाठी बाहेरील ढापणाला अंतर्गोलाच्या सांगाड्याशी.
दिली आहे त्याने युद्धाची आरोळी. संचारला आहे
अंगात त्याच्या ॲरीज देव; झिंगला आहे
युद्धलालसेचे मद्य पिऊन बॅक्कसचा भक्त
त्याची दाहक नजर दहशत भरते साऱ्यांच्या उरात.
अशा योद्धयाचे पाणी जोखील असा निवडा वीरपुरुष
अतिशय काळजीपूर्वक.
त्याच्या बढाईने भयभीत धावपळ आताच जणू प्रगटते आहे
आमच्या प्रवेशद्वारांशी.

एटीओक्लीज : जवळच आहे नगरीच्या प्रवेशद्वाराच्या ऑङ्.का पॅलस
तिरस्कार करतो तो मानवी औद्धत्याचा.
तो प्रथम करील प्रतिबंध त्या दुष्ट सर्पाला
जो धरटे अन् तिची पिल्ले, यांच्या शोधांत आहे
नंतर देईल सामना त्या योद्धयाशी ईनॉप्सचा पुत्र-
शूर हायपर्बिअस
एकदा निवड झाली की त्याच घटकेला

आवश्यक असे आपल्या वाट्याचे काम जाणून घ्यायला तत्पर.
हा लढा द्यायला समर्थ आहेत
त्याची शस्त्रे त्याची चित्तवृत्ती, त्याचे शरीर.
या दोघांची युद्धात जोडी जमवण्यात कौशल्य दाखवले आहे
हर्मीझ देवाने.
गाठ पडणार आहे ज्यांची आता ते जसे आहेत एकमेकांचे.
तसेच त्यांच्या ढालीवर चित्रांकित केलेले
देव देखील आहेत एकमेकांचे शत्रूच
ते पण करणार आहेत एकमेकांशी बरोबरी.
एकीवर आहे आग ओकणाऱ्या टायफॉनचे चित्र.
हायपर्बिअसच्या ढालीवर आहे स्थित स्थिरचित्त झ्यूसदेव
हातात त्याच्या झगमगणारे विजेचे खड्ग.
मला वाटतं झ्यूसदेवाचा पराभव झालेला पाहिला नाही.
कुणीही आजपावेतो.
हे असे आहेत रेखाटलेले देव दोन्ही योद्ध्यांवर कृपा करणारे
आपण आहोत विजयी बाजूचे,
ते हरणाऱ्या बाजूचे
कारण युद्धात टायफॉनचे बळ
कमीच पडणार झ्यूसदेवापेक्षा.
याप्रमाणे तुल्यबळ योद्धे आल्यावर समोरासमोर
जर आपल्याला आशा करता आली की
चिन्हावर असेल विजय अवलंबून, तर मिळेल
हायपर्बिअसला मदतीचा हात झ्यूस देवाचा
कारण आहे त्याच्या ढालीवर आकृती झ्यूसदेवाचीच.

नारीवृंद : माझी श्रद्धा आहे की –
मानवजातीला, अदृश्यशक्तींना अन् अमर देवांना-
सर्वांनाच तिरस्करणीय वाटणाऱ्या,
मर्त्यलोकात जन्मलेल्या, कुणालाच प्रिय नसलेल्या-
अशा टायफॉनची आकृती ढालीवर मिरवणारा
झ्यूसदेवाचा प्रतिस्पर्धी मिळेल धुळीला

आमच्या प्रवेशद्वाराशी खात्रीने आज.

सैनिक : देव करो खरे ठरोत तुमचे बोल.
आता सांगतो माहिती तुम्हाला पाचव्या योद्धयाची
उभा केला आहे त्याला बॉरीअन द्वाराशी
झ्यूसपुत्र ॲम्फीऑनच्या थडग्याजवळ.
हातातील भाल्याची शपथ घेऊन तो म्हणतो-
आणि उदंड आत्मविश्वासाने जो लेखतो आपल्या भाल्याला
बहुमोल देवाहून स्वतःच्या नेत्रांहून–
शपथ त्याची घेऊन म्हणतो– करीन नष्ट
कॅडमसची नगरी. विरोध केला झ्यूसने तरीसुद्धा
अशी आहे त्याच्या बोलण्याची तऱ्हा.
गुलाबी गालांचा आहे हा छावा रानटी बाईचा
पहाडामधून भटकणाऱ्या.
पुरुष कसला आहे पोरसवदाच.
अहो, आताच कुठे त्याच्या गालांवर
पसरते आहे रसरशीत वासंतिक पीक कुरळ्या केसांचे
पण पुढे तर सरसावतो आहे दिमाखाने-
नावातल्या कुमारिकेच्या बायकी चालीने[11] नव्हे तर दांडगेपणाने
आणि नजर कशी उग्र, करडी !
उभा आहे द्वारापुढती मारीत बढाया.
ब्रॉंझच्या पट्ट्यांनी आवळलेली
अवघ्या देहाला रक्षिणारी त्याची गोलाकार ढाल
करते आहे मानखंडना आमच्या नगरीची. ढालीच्या मध्यभागी
उठावदार हिंस्त्र स्फिंक्सची
चकाकणारी चित्रांकित मूर्ती,
कुशलतेने खिळवलेली, वाटोळी फिरणारी.
तिच्या पायाखाली पडलेला एक वीरपुरुष
आमच्याचपैकी एक कॅडमीआवासी.
आम्हाला खिजवण्यासाठी रेखलेले हे चित्र-
या योद्धयावर ओढवून घेईल आमच्या शस्त्रांचा

पुरेपूर मारा.
मला नाही वाटत
तुरळक शुल्लक लढाया लढण्यासाठी आलेला आहे तो.
आर्केडीआहून आलेला तो वीर करील सार्थक
दीर्घ अंतर आक्रमून आल्याचे.
तुम्हाला हव्या असलेल्या त्या शत्रूवीराचे नाव आहे.
पार्थेनोपीअस– परक्या देशातला असला तरीही
ऑरगॉसमधे मिळाला त्याला निवारा आणि
उच्च दर्जाचे भरणपोषण शिक्षण.
आता त्या ऋणातून मुक्त व्हायला करतो आहे वर्षाव
तटबंदीवर धमक्यांचा
देव करो आणि विफल होवोत त्या साऱ्या.

एटीओक्लीज : त्या सर्वांना, त्यांच्या पाखंडी बडबडींना,
त्यांच्या ढालीवरील गर्विष्ठ चिन्हांना
मिळू दे तडाखा स्वर्गाकडून त्यांच्या त्वेषाइतकाच जोराचा.
त्यांचा शेवट होईल विनाशकारक पापात्मक त्यांच्यासारखाच.
तू वर्णन केलेस ज्याचे त्या आर्केडिअनशी लढायला
आहे आमच्यापाशी एक वीर बढाई पासून अलिप्त
पण हात मात्र कृतीला तत्पर
शेवटच्या निवडलेल्या वीराचा बंधू आहे तो क्रियावान.
वाहू देणार नाही तो कृतिशून्य बडबडीच्या पुराचे पाणी आत
तणांना पोसायला;
येऊ देणार नाही आमच्या दारातून शत्रूला आमच्या तटांखाली
ज्याची ढाल मिरवते आहे ओंगळ राक्षसाचे चित्र.
जेव्हा रेटली जाईल आणि तडाखे खाऊन चेचली जाईल आत
तेव्हा देईल स्फिंक्स आपल्या वाहकाला दोष.
देवाच्या दयेने खरे होवोत माझे एकूण एक बोल.

नारीवृंद : भिडतो आहे आघात माझ्या काळजाच्या गाभ्याला,
भीतीने राहिले आहेत केस ताठ उभे.

ऐकते आहे जेव्हा गर्विष्ठ वल्गना
ह्या केवळ अहंकाराची भाषा बोलणाऱ्या माणसांच्या
देव जर असले खरोखरचे देव–
तर ते करोत नष्ट ह्या असल्या माणसांना लढाईमधे.

सैनिक : आता सांगतो नाव बढाईखोर नसणाऱ्या सहाव्या सैनिकाचे.
तो आहे समर्थ अँफीअँरस, भविष्यवादी पण शौर्याने
लढणारा वीर.
होमोलिअन द्वाराशी नेमलेला तो
करतो आहे शिव्यांचा वर्षाव. 'थोर टायडीअसवर '
खुनी माणूस, सार्वजनिक जीवनात दंगल माजवणारा.
आरगॉसला दुराचरण शिकवणाऱ्यांत हा सर्वांत पुढे.
बडा पुरोहित रक्तपाताचा जागवणारा सूडाच्या प्रवृत्तींना.
या मायेफिरुपणाच्या युद्धाचा सल्ला
अॅड्रॅस्टसला देणारा.'
नंतर नजर लावून वर आकाशाकडे
तुझ्या भावाच्या पॉलीनायसीझच्या नावाने
ओरडतो आहे उच्च स्वराने,
त्याचे अशुभसूचक नाव[११] दोनदा उच्चारुन म्हणतो आहे–
पॉलीनायसीझ, कलह उकरुन काढणाऱ्या पॉलीनायसीझ,
हल्ला करुन वाडवडिलांची नगरी उध्वस्त करायला-
देवादिकांना पार धुळीस मिळवायला
आणतो आहेत तू परक्या शत्रूंचे दळ.
फार संतोष पावतील देव ह्या तुझ्या कृत्याने !!
तरुण पिढीला धडा घालून द्यावे असे, तिने पिढ्यान पिढ्या ऐकावे असे
गौरवशाली कृत्य करतो आहेत तू!!
तुझ्या जीवनाला ज्याने पोसले त्या निर्झराला
योग्य आहे का सांग असे आटवून टाकणे?
जेव्हा गुलाम करशील मत्सरापोटी आपल्याच मायभूमीला आपल्याच
तलवारीने.
तेव्हा तुझे उद्दिष्ट जाणार आहे का सिद्धीस ?

माझ्याबद्दल सांगतो -
ह्याच भूमीची माती करीन मी समृद्ध
माझे धडगे आणि जेथून मी कौल देईन ते स्थान
उभारले जाईल परकीय भूमीवर.
तयार होऊया युद्धाला तर मग
दिसतो आहे मला भावी मृत्यु–
पण नाही धक्का लागणार इभ्रतीला माझ्या.
काढले उद्गार असे त्या भविष्यवाद्याने
हातात धरुन भरीव ब्रॉंझची निश्चल ढाल.
नव्हते जिच्या वर्तुळाकारावर एकही चिन्ह.
कारण शौर्याचा देखावा करण्यापेक्षा
प्रत्यक्ष शौर्य गाजवण्याचीच आहे त्याला तळमळ.
मिळवतो पीक मनाच्या सुपीक भूमीतून –
उद्भव होतो तिथे सुज्ञ मसलतींचा
माझा आहे सल्ला– त्याच्याशी लढायला
पाठवा योद्धा त्याच्या तोडीचा – शूर आणि सुबुद्ध असा.
देवांचा आदर करणाऱ्या वीराला
भिऊनच राहिले पाहिजे.

एटिओक्लीज : धार्मिकाची पाखंड्याशी, सुष्टाची दुष्टाशी –
अशा माणसामाणसांच्या गाठी घालून देणाऱ्या योगायोगाला
शिव्याशाप देऊ लागला माणूस तर ते साहजिकच नाही का ?
कोणत्याही साहसात.
दुष्ट संगतीसारखी नसते दुसरी जास्त वाईट गोष्ट.
व्हायचे नाही त्या साहसाचे फलित कधी कल्याणकारी.
कारण मूर्खांच्या मशागतीतून
मिळायचे फक्त मृत्यूचे पीक.
असे पहा:
दुष्ट हेतू मनात धरुन असणाऱ्या
पापी खलाशांच्या जहाजावर
जर चढली सदाचारी व्यक्ती तर मग

वाट्याला येतात तिच्या देव-तिरस्कृत
लोकांचेच कर्मभोग.
किंवा एखाद्या शहरामधील
परदेशियांना छळणाऱ्या, देवांना विसरलेल्या दुर्जनांमधे
जर येऊन पडली एखादी सदाचारी व्यक्ती
तर निष्पाप असूनही सापडते त्यांच्यासारखीच सापळ्यात.
आणि मग स्वर्गीय शक्तींचा निःपक्षपाती आसूड
ताळ्यावर आणतो तिला अन् लावतो कडक शिस्त.
अगदी तसाच हा नम्र, शूर, नेकीचा, धार्मिक वृत्तीचा,
प्रभावी भविष्यवादी अँफीॲरस.
आपल्या विवेकबुद्धीचा कौल न मानता
सापडला आहे संगतीत बढाईखोर पाखंड्यांच्या
निघाला आहे करायला त्यांच्याबरोबर दीर्घ प्रवास –
इतका दीर्घ की ज्यातून परत मागे फिरणे नाही. –
– तोही मिळेल धुळीस त्या सर्वांबरोबर,
झ्यूस देवाने मनात आणले तर...
मला तर खात्री आहे की
करणार नाही तो द्वारावर चढाईसुद्धा.
निराशेने किंवा भ्याडपणामुळे नव्हे,
तर पुरता जाणून आहे तो आपल्या लढाईचा शेवट –
जर अपोलो देवाचे शब्द खरे व्हायचे असतील तर
मौन धरणे किंवा सत्य बोलणे
ही आहे त्या देवाची रीत.
तरीही आपण त्याच्याशी बरोबरीने लढायला
पाठवू आपला वीर
बलिष्ठ लॅस्थीनीज– आतिथ्याची ओळख
नसलेला द्वाररक्षक
त्याच्यापाशी आहे वृद्धाचे शहाणपण
आणि तरुणाचे मजबूत हाडपेर.
चपळ पावलांप्रमाणेच सावध दृष्टी आहे त्याची.
भाला धरणारा हात इतका शीघ्रगती की त्याच्या शत्रूच्या ढालीजवळ

अरिक्षत असा
शत्रूच्या शरीराचा भाग दिसला की घातलीच झडप.
तरीही – विजय मिळतो मर्त्य मानवांना
अखेर ईश्वरी प्रसादानेच !

नारीवृंद : हे देवतांनो,
ऐका, ऐका आमची प्रार्थना.
पूर्ण करा आमच्या नगरीला.
आमच्या भूमीवर आक्रमण करणाऱ्यांकडे
वळू द्यात आता खड्गांची अरिष्टे.
आमच्या तटबंदीच्या आत येण्यापूर्वीच
करावे ठार त्यांना झ्यूसदेवाने
आपले विजेचे खड्ग हाणून.

सैनिक : आता देतो माहिती
सातव्या द्वाराशी ठाकणाऱ्या सातव्या वीराची.
तो आहे तुमचा स्वत:चा बंधू पॉलीनायसीझ
देतो आहे शाप थीब्सनगरीला आणि तुम्हाला सर्वनाशाचे.
आपल्या या नगरीच्या तटावर उभा राहून,
विजयाची द्वाही फिरवीत,
विजयाच्या बेहोष घोषणांची ललकारी आपल्या भूमीवर पसरवीत.
तुमच्याशी लढावं.
तुम्हाला मारुन पडावं मरुन तुमच्याचजवळ,–
अशी आहे त्याची देवांपाशी प्रार्थना–
आणि शिवाय म्हणतो आहे तो–
मला हद्दपार करुन तुम्ही केलेल्या अपमानाचा सूड
घेईन तुम्हाला तसेच हद्दपार करुन
जर का तुम्ही युद्धानंतर जिवंत राहिलात तर
सांगतो आहे ओरडून असे
कुलदैवतांना, पितृभूच्या देवांना साक्षी रहायला आव्हान करुन

आणि विनवतो आहे त्यांना आपल्या मागण्यांची कदर करायला
आपल्या नावाला जागतो आहे तो
आपले अंत:करण कलह व हिंसाचार यांनी
काठोकाठ भरुन
त्याच्या हातातील ढाल दिसते.
अगदी पूर्ण वाटोळी, नुकतीच घडवलेली.
तिच्यावर आहेत दोन चिन्हे कौशल्याने योजलेली.
दिसतो आहे सशस्त्र वीर सोन्याच्या पत्र्याने घडवलेला,
त्याच्यापुढेच आहे नम्रपणाने चालणारी एक स्त्री
ती म्हणते तिचे नाव आहे 'न्यायदेवता'–
तशीच अक्षरे आहेत कोरलेली ढालीवर–
आपल्या पित्याच्या घरामध्ये.'
अशा चिन्हांनिशी सज्ज होऊन येताहेत ते
आता कुणाला पाठवायचे त्याचा निर्णय तुम्हीच घ्यायचा आहे.
पार पाडीन मी माझे कर्तव्य संदेशवाहकाचे.
पण तुम्हीच आमच्या नगरीचे नायक
तुम्हीच करा निवड योग्य वीराची.

**एटीओक्लीज :** काय ही दुरवस्था आमच्या ईडीपस कुलाची !
देव करतात ह्या कुलाला भ्रमिष्ट,
देव करतात अत्यंत तिरस्कार ह्या कुलाचा,
निरंतर अश्रुपात आहे ह्या कुलाच्या नशिबी !
भोवतो आहे आता तो ईडीपसचाच शाप
त्याच्या मुलांना आम्हा दोघांना !
पण वेळ नाही आता रडायला किंवा विव्हळायला
भय वाटते– या मनोयातनांची अशी वाढ होईल दु:सह
व लवकरच कळेल कितीसे सत्य ठरते
सार्थ नावाच्या पॉलीनायसीझच्या ढालीवर झळकणारे चित्र,
सोन्याने ठसवलेली, ढालीवर चमचम करणारी
ती अक्षरे आणि त्याचा खुळेपणा.
ही देतात का पाहू त्याला हद्दपारीपासून मुक्तता !

जर कधी न्यायदेवतेने – झ्यूसच्या कुवार कन्येने–
अनुग्रह केला असता त्याच्या कृतींवर विचारांवर
तर झाला असता तो विजयी स्वदेशागमनी.
पण गर्भस्थ अंधारातून मुक्त झाला जेव्हा तो,
किंवा त्याच्या बाल्यदशेत
किंवा वयात येणाच्या क्षणी
किंवा दाढीची लव दाट होऊ लागली तेव्हा –
या कोणत्याही वेळी न्यायदेवतेने त्याला म्हटला नाही आपला शब्दांनी वा नजरेने.
आता तर त्याच्याचमुळे त्याची नगरी अत्याचार पीडित असता
मुळीच राहणार नाही न्यायदेवता त्याच्या पाठीशी उभी
जर तिने घेतला अशा मायेफिरु माणसाचा पक्ष
तर ती घेईल मारुन शिक्का असत्याचा स्वत:च्याच भाळी.
असा विश्वास मनात धरुन
उभा ठाकणार आहे त्याच्यासमोर मी हो,– मी स्वत:च.
माझ्याशिवाय दुसऱ्या कुणाला जास्त हक्क आहे त्याच्याशी लढण्याचा?
मी होईन त्याच्या तोडीस तोड –
प्रमुख प्रमुखाशी, भाऊ भावाशी,
शत्रू शत्रूशी अशी होईल ही लढाई !
(आपल्या सेवकास )
धावत जाऊन घेऊन ये माझे पोटऱ्यांचे चिलखत
भाले आणि दगड यांपासून रक्षण करायला.

सैनिक : ईडीपसचे पुत्र, परमप्रिय स्वामी, नका, नका !
कशाला घालता आपल्या मनोवृत्तीचा मेळ
आपल्या बंधूंच्या पाखंडी वृत्तीशी ?
कॅडमिआचे सैनिक आरगॉसच्या सैनिकांशी
हातघाईस येऊन लढताहेत तेवढे पुरे आहे.
शुद्धी करता येईल असल्या रक्तपाताच्या पापाची.
पण तुम्हा दोघांचे रक्त आहे एक.
अशा भ्रातृहत्येच्या पातकाचा कलंक

नाही पुसून काढता येणार युगे लोटली तरीही.

एटीओक्लीज : कर्मभोग भोगायचाच असेल तर
निदान नसू दे त्यामधे काहीही लज्जास्पद.
आहेच काय मृतांच्या जमावात गेल्यावर
अभिमान बाळगावा असे त्याहून दुसरे ?
पण इभ्रत गमावून विनाश झाला तर
निष्फळ ठरणार ती शेवटची आशाही.

नारीवृंद : काय करायचा आहे तुझा निर्धार, माझ्या पुत्रा ?
नको जाऊस.
उफाळणारा विकारावेग आणि युद्धतृष्णा यांच्या आहारी.
आता तुझ्यात जी उसळी मारते आहे ना
ती वृत्ती आहे दुरिताची बाळा–
हाकलून लाव तिला ती वाढण्याआधीच.

एटीओक्लीज : निकराला आले आहे आता हे कृत्य; ईश्वरी इच्छेचे आहे
तशी येऊ दे आता चालून
विनाशाचे वादळ, नरकाचे उधाण आणि फीबसचा[11] द्वेष
होऊ दे या साऱ्यांकडून
लेईअसच्या कुलाचा संहार –
अगदी शेवटचा माणूस मरेपर्यंत.

नारीवृंद : रक्तपाताच्या या यागाची बेफाम लालसा
चेतवते आहे तुला कार्यप्रवृत्त व्हायला.
पण परिणाम होतील भीषण तुझ्या या कृतीचे
कारण तू तोडणार आहेस लचके मानवी मांसाचे.
आणि अशा हत्या रक्तपाताला नाही वैध अनुमती.

एटीओक्लीज : खरे आहे पण–
त्वरित मरणे श्रेयस्कर उशीरा मरण्याहून असे आश्वासित

निष्ठुर कोरड्या डोळ्यांनी माझा पाठलाग करीत
माझ्या पित्याचा दुष्टशाप नियुक्त करतो आहे मला
पार पाडण्यासाठी हा यज्ञविधी.

नारीवृंद : देऊ नकोस लक्ष मुळीच त्याच्याकडे.
स्थैर्य येताच तुझ्या समृद्धीला
म्हणणार नाहीत कोणीही तुला भ्याड.
तुझ्याकडून जेव्हा देवता स्वीकारतील समर्पित हव्यद्रव्ये,
दूर पळेल ना तेव्हा
तुझ्या कुळातले हे कृष्णवस्त्रधारी पिशाच्च?

एटीओक्लीज : देवांनी केव्हाच सोडून दिली आहे
आमच्या बद्दलची आस्था
शंका नाही मला त्याबद्दल.
इच्छिताहेत ते यज्ञीय हव्य आमच्याकडून आमच्या मरणाचे.
आपल्या नियुक्त अंतापासून दूर का सरावे यापुढे विचकून?

नारीवृंद : मागे फिर, सोडून दे तो विचार; अजूनही वेळ गेली नाही.
अजूनही - इतक्या दीर्घकाळानंतरही
ईश्वरी वैरभावाचा वारा बदलील दिशा.
होईल त्याचा श्वास वत्सल, जास्त सौम्य
जरी आहे तो अजून रोरावत पूर्वीसारखाच.

एटीओक्लीज : भडकवला हा प्रकोप ईडीपसच्या शापाने
रोज रात्री माझ्या स्वप्नात येते ज्याची आकृती
तो असला पाहिजे सच्चा भविष्य द्रष्टा -
तो वाटून देतो आम्हाला आमचा वारसा.

नारीवृंद : स्त्रीच्या शब्दाला यश येऊ दे रे
तुझे मन वळवायला, तुझ्या इच्छेविरुद्ध सुद्धा.

एटीओक्लीज : ागून टाक तुला काय सांगायचे आहे ते
नको लावूस लांबण, आणि आटप लवकर.

नारीवृंद : विनंती करते - 'कुठेही जा सातवे दार सोडून.'

एटीओक्लीज : धारदार केला आहे मी माझा निर्धार,
बोथट होणार नाही तुझ्या सहस्त्र शब्दांनीही तो आता.

नारीवृंद : मोठ्या शूरपणाने मिळवला नसला तरीसुद्धा
पसंत पडतो देवांना विजय.

एटीओक्लीज : शस्त्रसज्ज योद्धयाने स्वीकारावे असे नाही हे ध्येयवाक्य.

नारीवृंद : तयार आहेस का तू आपल्या स्वतःच्या बंधूच्या रक्ताची लूट करायला?

एटीओक्लीज : सुटका नसते कोणाचीही
देवांनी कार्यवाहीत आणलेल्या विनाशापासून
(एटीओक्लीज निघून जातो)

नारीवृंद : थरकाप होतो काळजाचा माझ्या विचार करताना
साऱ्या कुळाचा संहार करणाऱ्या शक्तीचा -
भावी संकट अचूकपणे सांगणारी
अन्य देवतांकडून भिन्न अशी ही देवता-इरिनिज-
एका पित्याच्या शापाने जागृत झालेली.
पहा करते आहे ती पूर्ती संतप्त प्रार्थनांची,
ज्या उच्चारल्या ईडीपसने आपल्या उन्मादावस्थेत.
ईडीपसच्या पुत्रांना परस्परनाशाला प्रवृत्त करणारी हीच ती द्वेषभावना.
त्यांच्या वारशाची वाटणी करायला
दूर वरच्या सिथिआहून आलेला कॅलीबस
त्यांची मालमत्ता कठोरपणे विभागून देणारा तो परका मनुष्य
म्हणजेच आहे निर्घृण काळजाची तलवार.

त्याचा पोलादाने टाकले आहेत फासे
आणि दिली आहे त्यांना नेमून भूमी-
मृत माणसे व्यापू शकतील एवढीच.
मात्र नाही त्यांचा वाटा या विस्तीर्ण मैदानांत

माणसे ठार होतात जेव्हा बांधवांच्या हातून,
बंधूचा खून होतो जेव्हा बंधूकडून,
काळवंडणारे, वाळणारे लालकृष्ण रक्त जेव्हा
पिऊ लागते भूमीतील माती
तेव्हा कोण मिळवून देईल शुद्धीचे साधन?
कोण घालवील धुऊन पुसून कलंक त्याचा?
हाय रे वंशा
जुन्या काळची आणि नव्या काळाची
दोन्ही होताहेत एकत्र पापोद्‌भवदु:खे तुझी !

अभिप्रेत आहे मला फार फार पूर्वी पेरलेले पाप
ज्याबद्दल झाले विनाविलंब शासन तेव्हाच त्या पिढीला.
पण अजूनही भोवते आहे ते तिसऱ्या पिढीला
पृथ्वीच्या नाभिस्थानी असलेल्या पिथिआच्या मंदिरात
तीनवेळा कौल देऊन बजावले होते अपॉलोने लेईअसला:[४]
'नगरी सुरक्षित रहायला हवी असेल तर
मरेपर्यंत राहा निपुत्रिक.'
पण मानली नाही लेईअसने अपॉलोची आज्ञा

आहारी जाऊन अविवेकी वासनेच्या
दिला जन्म लेईअसने पुत्राला - आपल्या स्वत:च्या नाशालाच-
पितृहत्या करणाऱ्या ईडीपसला!
वाढला ईडीपस ज्या आपल्या मातेच्या गर्भात
त्याच निषिद्ध भूमीत पेरले त्याने आपले बीज,
आणि मग आपल्या या कृत्याचे अघोरी फळ
चाखावे लागेल त्याला.

कारण हिरावली गेली त्यांची सारासार बुद्धी आणि
एकत्र आणले त्यांना कुठल्या तरी वेड्या प्रवृत्तीने.

कोसळू लागली संकटे मग
उफाळत पुढे पुढे घुसणाऱ्या समुद्र वीचींसारखी..
फुटते एक लाट, दुसरीला उचलते..
उसळतात मग तीन लाटा एकवटून
आणि उफाळतो तो लोंढा आमच्या नगरीच्या जहाजाभोवती..
मरण आणि जीवन यांमधील सरहद्द
राहात नाही मग तटबंदीपेक्षा रुंद..
धास्ती वाटते मला जाईल पार बुडून एकदमच
थीब्स नगरीबरोबर समग्र राजकुल.

प्राचीन दैवी भविष्यवाणीने उच्चारलेला शाप
वर्तमानात उतरु लागला की
किती क्लेशकारक होते ते कर्मभोगाचे ओझे.
विनाशाच्या शक्ती वेग घेऊ लागतात,
करीत नाहीत त्या गय कोणाचीही.
रोटीवर-ऐहिकावर जगणारे जेव्हा बनतात
समृद्ध आणि वाजवीपेक्षा जास्त थोर
तेव्हा जहाजाचा भार हलका करण्यासाठी
द्यावा लागतो त्यांना करभार जहाजाच्या खोल तळभागातून

मानवी देहाची शिकार करणाऱ्या पिशाच्चापासून
मुक्त केला जेव्हा आमचा देश ईडीपसने, तेव्हा-
गर्दीने दाटलेल्या नगरचौकात झाला जयजयकार त्याचा.
केला होता काय असा भव्य सत्कार
कुणाचा कधी, देवांनी किंवा स्वनगरवासियांनी?

पण जेव्हा जाणीव झाली त्या हतभाग्याला
किती अमंगल आपली लग्नगाठ होती त्याची,

तेव्हा मनोवेदनांनी तडफडत, कृतपापाने थरथरत
मनावरचा तोल ढळून
पित्याला ठार करणाऱ्या आपल्या हातांनी
फोडून घेतले त्याने आपले डोळे
दु:सह झाले होते ज्यांना आपल्याच पुत्रांचे दर्शन.

जेव्हा प्रत्यक्ष त्याच्या मुलांना रुचेनाशी झाली त्याची उपस्थिती स्वगृहातली
तेव्हा क्रोधाविष्ट होऊन भिरकावू लागला तो
त्यांच्यावर कटुवाणीने शापावर शाप.
म्हणाला,' लवकरच येईल अशी वेळ
जेव्हा घ्याल तुम्ही विभागून आपला वारसा
तलवारीच्या पात्याने, हिंसाचाराने.
भयकंपित होते आहे मी या विचाराने
की आला की काय तो क्षण द्रुतगतीने आताच
एरिनिजकडून त्याचा शाप फलद्रूप होण्याचा.
(एक दूत येतो.)

दूत : आपल्या मातांच्या गुडघ्यांशी बसून थरथर कापणाऱ्या लेकींनो,
धैर्याची कास धरा.
वाचली आहे आपली थीब्सनगरी दास्यापासून.
त्या गर्विष्ठांच्या दर्पोक्ती मिळाल्या आहेत धुळीस.
शांत सागरी पोचली आहे वादळानंतर थीब्सनगरी
आपले तट उभे आहेत भरभक्कम -
आंत प्रवेश करण्यास एकही फट मिळाली नाही.
त्या धडका देणाऱ्या लाटांना.
शत्रूशी लढले निकराने आमचे विश्वासू सैनिक
पिटाळले त्याला मागे
कारण खडे होते करून छातीचे कोट
आपल्या प्रवेशद्वारांसमोर ते
आता क्षेम आहे सर्वत्र - बहुतांशी सहाद्वारांजवळ.

पण निवडले सातवे द्वार
सातांचा सेनानी असलेल्या भयावह अपॉलो देवाने स्वत:साठी
त्यानेच लावली ईडीपसच्या घराण्याला भोगायला फळे
लेईअसच्या प्राचीन पातकांची.

नारीवृंद : घडले तरी काय?
उभे राहिले आहे का काही नवे अरिष्ट आमच्या नगरीपुढे?

दूत : नगरी तशी क्षेम आहे. परंतु ईडीपसचे दोन पुत्र -

नारीवृंद : काय झाले त्यांना?
सुचत नाही काही मला. भीती वाटते आहे काय कानी पडेल याची

दूत : वा, असे काय करता. हे पहा -
शांत राहा आणि ऐकून घ्या - ईडीपसचे दोन्ही पुत्र -

नारीवृंद : हाय रे देवा! दु:खदायकच दिसते आहे काहीतरी.
वाईटात वाईट असे काही तरी घडले आहे
असा तर्क केल्याशिवाय राहावतच नाही मला.

दूत : दोघेही सारखेच आणि पूर्णपणे -

नारीवृंद : झाला काय त्यांचा दु:खद अंत?
शोकवार्ता असली तरीही सांगून टाक ती आता.

दूत : दोघेही मरण पावले, ठार केले त्यांनी परस्परांना.

नारीवृंद : ठार करण्याच्या लालसेत
प्रत्येकाचे आपल्या भावाशी भलतेच साम्य.

दूत : कार्य प्रवृत्त करणारे प्रत्येकाचे दुर्दैव अगदी दुसऱ्यासारखेच-

त्या दुर्दैवाने आता केला आहे पुरा विनाश
त्यांच्या कमनशिबी वंशाचा.
याप्रमाणे प्रसंग आहे हा आनंदोत्सवाचा
तसाच आसवे गाळण्याचाही.
आपली नगरी आहे उन्नतिमार्गावर
मात्र तिच्या दोन्ही सेनानींनी व प्रमुखांनी
अशी विभागणी केली आहे आपापल्या वारशाची
सिथिआमधे घडवलेल्या पोलादी तलवारींनी.
आत त्यांच्या मालीकीची जागा असेल -
प्रत्येकाच्या थडग्याला पुरेल एवढी.
तिथेच नेत आहे वाहून त्यांना
त्यांच्या दुःखाकुल पित्याच्या शापाचा अनिष्ट वारा.
याप्रमाणे थीब्सनगरी तर वाचली,
परंतु तिचे स्वामी असलेले दोन्ही बंधू नाश पावले.
परस्परांनी वाहवलेले एकमेकांचे रक्त
पिऊन टाकले आहे आता भूमीने.
(दूत जातो)

नारीवृंद : शक्तिशाली झ्यूस देवा,
आमच्या नगरीच्या संरक्षक देवतांनो,
तुम्हीच आहात तारणहार कॅडमसच्या नगरीच्या तटांचे
म्हणूनच बचावली थीब्सनगरी काहीही अपाय न होता.
मानावा का मी आनंद? करावा का मी जयघोष?
की करु मी शोक आमच्या युद्धातील सेनानींसाठी-
दयनीय, हतभागी, निपुत्रिक अशा?
आपल्या नावातील आशयाला जागून[१५]
वैरभावाने ओतप्रोत भरलेल्या
आपल्याच पापी उद्दिष्टांकडून नाश पावलेल्या?

नारीवृंद : हाय रे! घराण्याला मिळालेला शाप -
(पहिला गट) : हाय रे! ईडीपसचा शाप!

काळ्याकुट्ट निराशेने माखलेला
यत्किंचितही, दयामाया न दाखवणारा शाप !
भयंकर गारठ्याने वेढले आहे माझे काळीज,
जेव्हा मी ऐकले माणसाच्या शरीरातून,
रक्ताचे पाट वाहताहेत,
माणसे तडफडून मरताहेत
तेव्हा गेली माझ्या डोळ्यापुढून तरळून
वेड लावणारी दृश्ये
आणि गायिले मी गीत,
ते होतें अंत्यसंस्कार गीत असे गीत युद्धकाळात गाणे म्हणजे
अत्यंत वाईट लक्षण नाही का !

नारीवृंद : असेच काही नाही.
(दुसरा गट) : परंतु त्याच्या पित्याने उच्चारलेल्या शापाने
वसूल केले पुरते आपले येणे
कमी न करता शिक्षा यत्किंचितही.
साऱ्याला कारण झाला लेईअसचा आज्ञाभंग.
नगराची काळजी कितीही दक्षतेने वाहिली तरी
भविष्यवेत्त्यांनी वर्तवलेल्या घटनांना
नाही थोपवू शकणार ती.
बाबांनो, साऱ्यांना शोक करायलाच हवा तुमच्यासाठी
तुम्ही खरेच का केलेत हे अविश्वसनीय कृत्य ?
हे दयनीय सत्य आहे ? नसेल ना ही अफवा ?
( एटीओक्लीज आणि पॉलीनायसीझ यांचे मृत देह घेऊन येणारा जमाव
दिसू लागतो. )
पहा, पहा
हे दृश्यच सांगते आहे सारे स्पष्टपणे,
मुळीच नाही आवश्यकता घोषणा करणाराची
दिसते आहे आम्हाला हे हृदयभेदक दृश्य
दोघांची परस्परहत्येची उद्दिष्टे
समाविष्ट झालेली एकाच दारुण नियतीत.

आता काय उरले आहे येथे दु:खाशिवाय?
दु:खापासूनच झाला ज्याचा जन्म ते लेकरु
आले आहे शेवटी आपल्या हक्काच्या घरी.
तर मग या पुढे सख्यांनो,
होऊ द्या तुमचे उसासे, अनुकूल वारे
अन् कपाळावर हात मारताना होणारा आवाजच
वल्हयांची पाण्यातली सळसळ.
परिचित धार्मिकविधी आहे हा
ॲकेशॅन नदीवरुन ते पवित्र जहाज[१५] पुढेपुढे पाठवण्याचा !
ते काळ्या शिडांचे, पुष्पमालांना अंतरलेले जहाज.
अशा भूमीकडे पाठवायचे आहे की
जिथे अपॉलो देवाचा संचार होऊं शकत नाही
जी भूमी सर्वांचे सारखेच स्वागत असते करीत,
जिथे उदास अंधार उजळत नाही कधी सूर्यप्रकाशाने.

(मृतदेह खाली ठेवण्यात येतात. ॲंटिगॉनी आणि इस्मिनी[१६] प्रवेश करतात )
ह्या पहा आल्या ॲंटिगॉनी आणि इस्मिनी,
पार पाडणार आहेत त्या
आपल्या बंधूंसाठी शोक करण्याचे दु:खद कर्तव्य.
मला ठाऊक आहे, त्यांच्या प्रेमळ अंत:करणातील शोकावेग
पूर्ण तळमळीने व्यक्त होईल
दीर्घ व उचित अशा विलापातून.
पण त्या काही बोलण्याआधीच
पार पाडू आपण आपले कर्तव्य
विनाशाच्या पिशाच्चाचे स्तोत्र उच्चारु स्वर चढवून.
मृत्युदेवाचे तिरस्कृत विजयगीत गात राहू.

हाय !
वक्षस्थळांवर झगे बांधणाऱ्या साऱ्या स्त्रियांहून
तुमच्या नशिबी आले आहे अधिक दु:ख

आपल्या बंधूंपायी,
मी रडते विव्हळते आहे
त्यांत नाही नुसता देखावा मुळीच.
खरोखरच उठतो आहे आर्त आक्रोश माझ्या हृदयातून.

नारीवृंद : हाय रे ! किती अविवेकी वृत्तीचे होता तुम्ही !
(गट पहिला) : प्रिय आप्तजन वळवू शकले नाहीत तुम्हाला.
दुष्कृत्यांचा नाही आला तुम्हाला उद्वेग कधी.
आपले समग्र शौर्य– शोचनीय ठरले ते अखेर !
ते शौर्य वापरुन तुम्ही काय केलेत तर–
उलथून टाकेलत आपल्याच पित्याचे कुल.

नारीवृंद : शोचनीय तर खरेच ! आपल्या कुलाचा नाश करण्यासाठी
(गट दूसरा) : त्यांनी ओढवून घेतले शोचनीय मरण स्वतःवरच

नारीवृंद : अरेरे ! हाय ! हाय !
(गट पहिला) : ( पॉलीनायसीझला )
तू जमीनदोस्त केलेस तट
प्रत्यक्ष आपल्या घराच्याच भिंती.
(एटीओक्लीजला ) मिळवलेस तू राजसिंहासन–
पण परिणामी कुऱ्हाड मारुन घेतलीस स्वतःच्याच पायांवर.
( दोघांनाही )
मिटवलात तुम्ही आपला कलह आता तलवारींनी.

नारीवृंद : तुमच्या पित्याच्या-ईडीपसचा शाप
(गट दुसरा) : तंतोतंत तडीस नेला त्याच्या भीषण इरिनिसने

नारीवृंद : पहा, कुठे वार लागलेत त्यांना,
(गट पहिला) : पहा विद्ध झाल्या आहेत दोघांच्याही कुशी

नारीवृंद : विद्ध झाली आहेत खरीच

(गट दुसरा) : एकाच माऊलीच्या हाडामासातून पोसली गेलेली दोन्ही शरीरे.

नारीवृंद : हाय ! कसले वारे शिरले होते दोघांच्या अंगात !
(गट पहिला) :
नारीवृंद : हाय ! शाप होता त्यांना परस्परहत्येचीच नियती होती त्यांची !
( गट दुसरा )
नारीवृंद : त्यांना बसला दुर्दैवाचा तडाखा –
( गट पाहिला ) झाला अधिक जोरदार त्यांच्या अवर्णनीय विकारावेगाने.
आणि घातक ठरला उभयतांना –
त्यांचा वंश व त्यांचे जीवन यांना.

नारीवृंद : त्या दुर्दैवाला आणखी जोर चढला त्यांच्या पित्याच्या शापाने.
( गट दुसरा ) दोघांच्यात अगदी भेदभाव न करता
भिरकावला त्यांच्यावर देहदंड त्याने.

नारीवृंद : आमच्या भूमीवर पसरत आहे त्यांच्याबद्दलचा शोकस्वर
(गट पाहिला ) नगरीचे बुरुजसुद्धा करताहेत आक्रंदन
हरपलेल्या आपल्या प्रियवीरासाठी
शोकाविष्ट होते नेहमीच भूमी.
जिच्यासाठी त्यांनी दिले आपले प्राण ती थीब्जनगरी
करते आहे आता प्रतीक्षा नव्या वारसाची–
कोणीच सध्या हक्क नाही सांगू शकत तिच्यावर.

नारीवृंद : थीब्जनगरीसाठीच तर त्यांनी मांडला होता कलह–
( गट पाहिला ) : तो दीर्घ कलह संपला शेवटी त्या दोघांच्या मृत्यूने.

नारीवृंद : अधीर मनाने त्यांनी घेतला वाटून वारसा
आपल्या योग्य हिश्श्यासाठी जागरुक राहून.
त्यांच्यावर प्रेम करणारे दोष देताहेत
निर्णायकाला – त्या तलवारीला.

नारीवृंद : दर्शवीत नाही कुणीच कृतज्ञता ॲरीजला– त्या युद्धदेवाला.
(गट दुसरा) :

नारीवृंद : ते पहुडले आहेत आता जिथे त्या स्थानी
(गट पहिला) : पोचवले त्यांना तलवारींच्या लोखंडी पात्यांनी जिथे.
तलवारीची लोखंडी पातीच देतील लवकरच विभागून
त्यांना त्यांची पितृभूमी.
–कुठली भूमी ? कशी विभागणार ? विचारण्याजोगे प्रश्न !
दोघेही घेतील वाटून थडगे आपल्या पित्याचे.

नारीवृंद : देताना त्यांना अखेरचा निरोप
(गट दुसरा) : फाटून जाताहेत आमची काळजे
आमच्या उच्चरवातील आक्रोशाने.
आमचे आक्रंदन आहे उत्स्फूर्त,
आमचे दु:ख आमचे स्वत:चे.
आमच्या व्यथित विचारांत जागा नाही आनंदाला.
ह्या दोन राजपुत्रांसाठी शोक करताना
आमची काळजे कणाकणांनी झिजताहेत.
जशाजशी त्यांच्यातून झरताहेत डोळ्यांवाटे आसवे.

नारीवृंद : दु:खी जीव दोघेही नमूद करू एवढेच त्यांच्याबद्दल की
(गट पहिला) : आपल्या नगरवासियांना आणि सर्व थराच्या परदेशियांना
दिली त्यांनी
मृत्यूची विध्वंसक बहुमूल्य मेजवानी !

नारीवृंद : मुलांच्या माता म्हणवणाऱ्या अन्य कोणत्याही स्त्रियांहून
(गट दुसरा) : त्यांच्या आईचा कर्मभोग होता किती खडतर.
स्वीकारले होते तिने आपल्या पुत्रालाच पती म्हणून.
हे ते दोघे तिने नंतर जन्म दिलेले पुत्र.
आणि हा असा झाला त्यांचा शेवट.
एकाच बीजातून निर्माण झालेल्या हातांनी

नष्ट केली आहेत परस्परांची जीविते.

नारीवृंद : एकाच बीजातून वाढलेली दोघेही
(गट पहिला) : एकत्र पेरले आहेत आता भूमीमधे,
त्यांच्याबरोबर त्यांचा वंशही पहुडला आहे आता
कायमचा भूमीवर
वैराच्या धारदार टोकाने अलग केले एकमेकांपासून
त्यांनी आपले जीवित.
आणि माथेफिरु मत्सरात झाली परिणती
त्यांच्या कलहाची.

नारीवृंद : संपले त्यांचे वैर आता.
(गट दुसरा) : एकमेकांत मिसळताहेत आता त्यांची जीवने.
रक्ताचे तळे जिरत आहे मातीत त्या स्थानी.
आता मात्र झाले ते खरोखरच एकाच रक्ताचे.
कठोर पद्धतीने भांडण मिटवणारा होता तो–
तो अपरिचित, समुद्रातून आलेला.
आगीतून बाहेर झेपावणारा–
घासून धार लावलेला लोहखंड,
मालमत्तेची वाटणी कडक निष्ठुरतेने करणारा
आहे तो पित्याचा शाप प्रत्यक्षात आणणारा ॲरीज.

नारीवृंद : गरीब बिचारे हे जीव ! मिळाला त्यांना त्यांचा हिस्सा
(गट पहिला) : मानवदेहाच्या मोजमापाइतका– ईश्वर देतो माणसांना तेवढा.
परंतु असेल त्यांच्या शरीराखाली
पृथ्वीचा अमर्याद खोल खोल विस्तार.

नारीवृंद : हाय रे ! मढवलात तुम्ही आपला वंश
(गट दुसरा) : अगणित दुःखांच्या पुष्पमालांनी.
दिवसाच्या अखेरी जय मिळतो तो शापदेवतेला
कर्कश किंचाळते ती मग विजयोन्मादाने

पराभूत घराण्याची संपूर्ण वाताहत झाली म्हणून.
लढले जिथे ते त्या दाराशी उभे आहे
विध्वंसाचे जयचिन्ह.
त्यांच्या दुर्दैवाने त्या दोघांना केले होते पराभूत.
आणि मगच त्याने आवरला आपला हात.
( अँटिगॉनी आणि इस्मीनी रंगभूमीच्या मध्यभागी येऊन मृतदेहांजवळ जाऊन विलाप करु लागतात )

**अँटिगॉनी :** तू त्याला जखमी केलेस,
पण त्यानेही तुला जखमी केले.

**इस्मीनी :** तू मरण दिलेस तसेच मरण तुलाही मिळाले.

**अँटिगॉनी :** तू ठार केलेस भाल्याने-

**इस्मीनी :** तू मारला गेल्यास भाल्याने-

**अँटिगॉनी :** दयनीय होती तू केलेली जखम

**इस्मीनी :** दयनीय होत्या तुझ्या यातना त्याच्या भाल्याने झालेल्या.

**अँटिगॉनी :** उठू दे आक्रोशाचा स्वर

**इस्मीनी :** पडू देत आसवे

**अँटिगॉनी :** मृत झालेल्या तुझ्यासाठी

**इस्मीनी :** ठार करणाऱ्या तुझ्यासाठी

**अँटिगॉनी :** हुंदक्यांनी प्रक्षुब्ध झाले आहे माझे हृदय.
विव्हळत आहे माझा आत्मा माझ्या शरीरात.

ॲंटिगॉनी : बंधो, आक्रंदन करते आहे तुझ्यासाठी

इस्मीनी : बंधो ! किती शोचनीय अवस्था तुझी ही

ॲंटिगॉनी : तू मारला गेलास स्वतःच्या बंधूकडून

इस्मीनी : तू मारलेस स्वतःच्याच बंधूला

ॲंटिगॉनी : या दुहेरी दुःख बोलण्याचे नशिबी आले.

इस्मीनी : हे दुहेरी दुःख पाहण्याचे नशिबी आहे.

ॲंटिगॉनी : एका दुःखाच्या सन्निधच दुसरे दुःख !

इस्मीनी : एक दुःख दुसऱ्या दुःखाचे भावंड !

नारीवृंद : हे दैवा! तुझ्या देणग्या असतात क्रूर आणि दुःखदायक !
हाय रे ! ईडीपसच्या वंद्य कृष्णछायादेहा,
किती मोठे आहे तुझे सामर्थ्य, हे अगम्य सूडदेवते !

ॲंटिगॉनी : किती शोककारक, भयानक दृश्य हे !

इस्मीनी : हद्दपार झालेला, आला स्वगृही माझा बंधू.
त्याचे स्वागत अशा तऱ्हेने करायची वेळ यावी ना ?

ॲंटिगॉनी : त्याने हत्या केली तरीही
आपले घर परत मिळवू शकला नाही तो.

इस्मीनी : आणि त्याने आपले घर वाचवले पण तेव्हाच आपुले प्राण गमावले.

ॲंटिगॉनी : त्याने आपला जीव गमावला

इस्मीनी : आणि आपल्या बंधूचा घेतला

ॲंटिगॉनी : किती अविचारी दोघेही पुत्र !

इस्मीनी : अखेर दोघांचीही किती तीव्र आशाभंगात !

ॲंटिगॉनी : दोघांनाही उद्देशून तेच दुःखी अभिमान उच्चारावयाचे !

इस्मीनी : तेच अश्रू तिहेरी यातनांसाठी गाळावयाचे !

नारीवृंद : हे दैवा, तुझ्या देणग्या असतात क्रूर आणि दुःखदायक ! हाय रे ईडीपसच्या वंद्य कृष्णछायादेहा, किती मोठे आहे तुझे सामर्थ्य, हे अगम्य सूडदेवते !

ॲंटिगॉनी : आता उमगते आहे तुला आपल्याहातून घडले पाप

इस्मीनी : तुला पण त्याच क्षणाला झाले ते ज्ञान.

ॲंटिगॉनी : जेव्हा तू आलास परतून थीब्ज नगरीला.

इस्मीनी : जेव्हा तू आपल्या भावाशी लढायचे ठरवलेस.

ॲंटिगॉनी : किती भयानक कहाणी आहे ही !

इस्मीनी : किती भयानक आहे दृश्य हे !

ॲंटिगॉनी : अरेरे ! केवढया ह्या यातना !

इस्मीनी : अरेरे ! केवढा हा अन्याय

ॲंटिगॉनी : राजकुलावर आणि थीब्जनगरीवर !

इस्मीनी : त्यांच्याहूनही माझ्यावरचा अन्याय जास्त !

अँटिगॉनी : हाय ! हाय ! केवढी ही परमावधी मूर्खपणाची आणि यातनांची !

इस्मीनी : हाय रे ! झाला नसेल इतका छळ कुणाचा कधीही मानवजातीत.

अँटिगॉनी : त्यांची मूर्खपणाची वागणूक

इस्मीनी : होती झपाटलेल्या माणसांसारखी.

अँटिगॉनी : कोणती जागा निवडूया त्यांचे दफन करण्यासाठी ?

इस्मीनी : जिथे त्यांना जास्तीत जास्त मानवंदना मिळेल अशी

अँटिगॉनी : हाय ! हाय ! त्रास होईल त्यांच्या पित्याला
जर ते पहुडले त्यांच्याचजवळ तर
( घोषणा देणारा येतो )

घोषणा देणारा : कॅडमिआ नगरीच्या कार्यवाही राज्यकर्त्यांचे
मनोगत आणि निर्णय
घोषित करीत आहे मी समस्त लोकांपुढे.
असा हुकूम करण्यात आला आहे की—
' एटीओक्लीजचे शव पुरावे त्याच्या स्वदेशभूमीत
त्याच्या नगरीबद्दलच्या निष्ठेची कदर करून
कारण नगरीच्या कामासाठी त्याने
स्वखुशीने दिली शत्रूशी टक्कर
स्वतःच्या प्राणाचे मोल देऊन.
वाडवडिलांच्या देवांची मंदिरे
उध्वस्त होऊ देण्याचा कलंक
घेतला नाही त्याने आपल्या माथ्यावर.
तरुण माणसांना मरण यायला हवे अशाच जागी

मानाचे मरण आले त्याला.'
हा आहे निरोप त्याच्याबाबतचा.

इथे पडला आहे त्याचा भाऊ पॉलीनायसीज.
फेकून द्यायचे आहे त्याचे प्रेत-दफन नाही करायचे त्याचे.
कुत्र्यांना खाऊ द्या त्याला फाडून तोडून.
केला असता नाश ह्याने कॅडमस नगरीचा
जर प्रतिकाराला उभा ठाकला नसता त्याच्या मार्गात कुणी देव
त्याच्या भावाच्या भाल्याच्या रुपाने.
तर याने नाश केला असता या कॅडमस नगरीचा.
नगरीचा विनाश करण्याच्या हेतूने
परकीय सेना गोळा करुन हल्ला करायला आला होता हा.
आपल्या पित्याच्या देवांच्या अवहेलनेच्या कलंकाचे पाप
मृत्यूनंतरही करील त्याचा पाठपुरावा.
इनाम म्हणून होईल त्याची मानखंडना–
भटके पक्षीच केवळ होतील त्याचे एकमेव थडगे !
गुलामांच्या समूहाकडून रचली जाणार नाही
मातीची राशी त्याच्या शवावर.
गायिले जाणार नाही उच्च स्वरातले शोकगीत
त्याच्या सन्मानासाठी.
त्याच्या निकटच्या आप्तांनी करता कामा नयेत.
त्याचे अंत्यसंस्कार.
सत्ताधाऱ्यांच्या आज्ञेने हेच ठरले आहे त्याचे भवितव्य.

ॲंटिगॉनी : थीब्जचे ' सत्ताधारी ' म्हणवणाऱ्यांना हे आहे माझे उत्तर.
कोणी आला नाही मला साथ द्यायला त्याच्या दफनासाठी तरी
मी एकटीच पार पाडीन ते कार्य
परिणामी जे अरिष्ट माझ्यावर कोसळेल
त्याला तोंड द्यायला तयार आहे मी.
मी देणार आहे मूठमाती माझ्या भावाला
शासनसंस्थेची अवज्ञा करुन याप्रमाणे

तिला विरोध करणार आहे उघडपणे मी.
शरम मानीत नाही मी या गोष्टीची.
अशीच दुहेरी कर्तव्याची हाक आली
आम्हा दोघांना जन्म देणाऱ्या एकमेव हाडामासाची –
दुःखी आईची, कमनशिबी पित्याची –
तर तिलाही ओ द्यावीच लागेल मला.
म्हणून म्हणते–
' माझ्या हृदया, रहा उभा त्याच्या पाठीशी तत्परतेने
सच्च्या भगिनीच्या नात्याला जागून त्याच्या दुश्चित्त अवस्थत.
जिवंत व्यक्तीने द्यायला हवा मृताला आधार.
पोट खपाटी गेलेल्या लांडग्याला
तोडू देणार नाही मी माझ्या बंधूच्या शरीराचे लचके.
देता कामा नये कुणीही व्यक्तीने कधीही असला हुकूम.
बाईमाणूस असले तरीही
करीन मी थडग्याची तजवीज त्याच्यासाठी
जमीन खणून माती वाहीन माझ्या उंची तलम झग्यातून
आणि देईल त्याला मूठमाती माझ्या हातांनी.
कुठलाही हूकूम रोखू शकणार नाही मला.
तुम्ही नका करु फिकीर, काढीन शोधून माझा मार्ग मी कसाही.

घोषणा देणारा : इशारा देतो आहे तुला
सत्ताधाऱ्यांनी विरोध करता येईल या भ्रमात राहू नकोस.

अँटिगॉनी : मीच बजावते तुला
तुझे घोषणा देण्याचे काम इथे नको माझ्यासमोर ;
फुकट घालवू नकोस आपला वेळ.

घोषणा देणारा : नुकतेच स्वतंत्र झालेले हे लोक बिथरतील तुझ्याविरुद्ध;
फार विपरीत परिणाम होईल त्याचा

अँटिगॉनी : होऊ दे तर मग विपरीत परिणाम

त्या भीतीने काही थडग्याची उणीव
माझ्या भावाला मी नाही पडू देणार.

घोषणा देणारा : सार्‍या नागरिकांच्या शत्रूचा सन्मान करणार तू
त्याला मूठमाती देऊन ?

ॲंटिगॉनी : प्राचीन काळापासूनच ठरवले आहेत देवांनी
त्याच्या हक्काचे मानसन्मान काय आहेत ते.

घोषणा देणारा : संपला त्याचा तो जन्मजात हक्क
पूर्वीपासून निश्चित झालेला.
जेव्हा त्याने लोटले देशाला जीवघेण्या भयाच्या विवरात.

ॲंटिगॉनी : झाला होता त्याच्यावर अन्याय,
देत होता तो उत्तर एका अन्यायाला दुसर्‍या अन्यायाने.

घोषणा देणारा : अन्याय केला त्याच्यावर एकाने,
म्हणून काय चढाई करावी त्याने आम्हां सार्‍यांवर ?

ॲंटिगॉनी : सर्व देवात कलहदेवच माजवतो दीर्घकाळ वादविवाद.
बसू नकोस आता आणखी लांब भाषणे करीत.
निश्चय केला आहे मी त्याला मूठमाती देण्याचा.

घोषणा देणारा : दिली आहे मी तुला भयसूचना आधीच.
वाग आता तुझ्या मनाला येईल तशी.
( घोषणा देणारा निघून जातो.)

नारीवृंद : अरेरे ! हाय ! हाय ! हे इरिनीईज !
गर्विष्ठ, विजयोन्मत्त, कुलसंहारक दुष्ट शक्तींनो !
तोडून टाकलेत तुम्ही अशाप्रकारे
इडिपसच्या वंशवृक्षाच्या फांद्या आणि मुळे.

आता घडणार आहे तरी काय ?
कोणाची बाजू घेऊ मी ?
कोणता उपाय सापडेल मला या समस्येवर ?
तुझ्यासाठी शोक केल्यावाचून,
तुझ्यामागून तुझ्या थडग्याकडे आल्यावाचून
कसे राहवेल मला ?

तरीही भयभीत होत आहे अंतःकरण माझे
नागरिकांच्या रागाला तोंड द्यायचा धीर नाही होत मला.
एटीओक्लीज,
असंख्य माणसे करतील शोक तुझ्यासाठी.
पण त्या बिचाऱ्या जीवासाठी, तो हा लोक सोडतांना
त्याच्या बहिणीखेरीज कोणीच म्हणणार नाही शोकगीत ?
कोण खपवून घेईल अशी ही गोष्ट ?

नारीवृंद : (गट पहिला)

शासनसंस्था करो वा न करो काहीही आपल्या मर्जीनुसार
आम्ही मात्र सोबत करणार पॉलीनायसीझला
त्याच्या थडग्यापर्यंत आणि
घेणार भाग त्याच्या दफनात.
हा शोकप्रसंग आहे कॅडमसच्या सर्व वंशाचा.
उचलून धरते शासनसंस्था ज्याला न्याय्य म्हणून
त्याचे स्वरुप बदलत असते बदलत्या काळानुसार.
आणि आम्ही जाणार एटीओक्लीज सोबत.
कारण येथे
शासनसंस्था आणि न्यायदेवता बोलताहेत एकाच सुरात.
दुसऱ्या कुणी नाही पण त्यानेच–
पुण्यश्लोक देव आणि सर्वशक्तिमान झ्यूस
यांची मदत अर्थात होतीच –
पण त्यानेच कॅडमसनगरीचा मार्गदर्शक बनून
वाचवले आम्हाला उलथेपालथे होण्यापासून
चढाई करणाऱ्या शत्रूंच्या.

थीब्जवर सातांची चढाई

( एकाचे प्रेत उजवीकडे आणि दुसऱ्याचे प्रेत डावीकडे नेले जाते. नारीवृंदाचा एकेक गट एकेकाच्या मागून जातो )

— समाप्त —

## थीब्सवर सातांची चढाई

### आवश्यक टिपा

१) **कॅडमसच्या पुत्रांनो–** कॅडमसने थीब्स नगरीची स्थापना केली अशी आख्यायिका आहे. त्यामुळे कॅडमिआ हे नाव मिळाले. इ.पू.पाचव्या शतकात कॅडमिआनगरी थीब्सनगरीचा बालेकिल्ला होती. प्रारंभी कॅडमिआला तटबंदी होती. अॅथेन्सच्या लोकांना ते नाव अत्यंत अप्रिय होते. हे नाटक रंगभूमीवर आले त्यापूर्वी बारा वर्षे ( म्हणजे इ.स. पूर्वी ४७९ मध्ये ) प्लटीआची लढाई झाली. त्या लढाईत थीब्सचे नागरिक पर्शियन आक्रमकांच्या बाजूने लढले. ईस्किलसने कॅडमिआ हे नाव वापरुन दोन गोष्टी साधल्या. त्याने आपल्या नाटकाचा काळ सुचवला, अथेसन्सच्या श्रोत्यांना अप्रिय वाटणारे थीबज् हे नाव टाळले. 'थीब्सवर सातांची चढाई' या नावाने हे नाटक बहुधा रंगभूमीवर प्रथम आले नसावे. सुमारे साठ वर्षानंतर अॅरिस्टॉफेनीजने ह्या नावाचा उपयोग केला.

२) **आमचा द्रष्टा–** ईस्किलसला येथे निश्चितच टायरेसीअस अभिप्रेत आहे. टायरेसिअस सात पिढ्यांहून अधिक काळ जगला अशी आख्यायिका आहे.

३) **ईडिपस राजाच्या शापामधून –** शब्दश: माझ्या वडिलांचे शाप आणि प्रबळ इरिनिज. इरिनिस ( अनेकवचन ' इरिनीईझ' ) हा शब्द नाटकात वारंवार येतो. इरिनिस म्हणजे प्रायश्चित्ताच्या कल्पनेशी निगडित अशी सूडदेवता. प्रत्येक व्यक्तीची सूडदेवता स्वतंत्र असते. सूडदेवतेला मानवी जीवनात नाही पण नीतिकल्पनेत स्थान आहे. इरिनीईझ काळे झगे घातलेल्या, पंख असलेल्या ओंगळ व घृणास्पद स्त्रियांच्या रुपाने दाखवल्या जात ( ईस्किलसच्या ओरेस्टीआ नाटकत्रयीत ह्या विशेषत्वाने दाखवलेल्या आहेत ) मातृहत्येसारखा एखादा संबंधित रक्त सांडण्याचा विशेष गुन्हा करणाऱ्याचा त्या

पाठलाग करु लागतात. ईडीपसने मुलांना शाप दिला त्याप्रमाणे एखाद्या पित्याने आपल्या मुलांना शाप दिला तर तो अमलांत आणण्याचे कार्य ईरिनीईझ करतात. ह्या नाटकातील इरिनिस एका व्यक्तीची ईडीपसची सूडदेवता आहे. अशी इरिनिस अन्याय झालेल्या व्यक्तीच्या वतीने अन्याय करणाऱ्याला पाठलाग करणारी दुष्ट शक्ती वा पिशाची म्हणून कल्पिली जात नाही.

४) **अथीनी** : राणी ग्रीक नाटकात या ठिकाणी अथीनी ऐवजी ऑङ्.का आहे. ऑङ्.का ही देवता मुळात फिनिशिअन होती. थीब्समधे ती अथीनी नावाने ओळखली जाऊ लागली. तिचे देऊळ नगरीबाहेर एका द्वाराजवळ बांधलेले होते.

५) **ठेचतील त्याला दगड मारुन** : एखाद्या व्यक्तीला अपराधी किंवा निर्दोषी ठरवण्यासाठी एका पात्रात काळे ( किंवा सफेद ) दगड टाकून निर्णय घेत. या पद्धतीचा इथे उल्लेख आहे. पुढील ओळीत मृत्यूला कारणीभूत होणाऱ्या दगडावर श्लेष आहे.

६) **इक्लेजपुत्र द्रष्ट्यावर टायरेसीअस नव्हे.** अँफीऑरस (सहावा सैनिक) पहा.

७) **रुजून आलेल्या मानवांपैकी** : कॅडमस जेव्हा प्रथमच थीब्स नगरीच्या जागेवर आला तेव्हा त्याने त्या जागेचे रक्षण करीत असलेल्या ड्रॅगनला मारले. अॅथीनीच्या आज्ञेनुसार त्याने ड्रॅगनचे दात जमिनीत पुरले. त्या दातांतून सशस्त्र योद्धे बाहेर पडले आणि त्यांनी आपापसात लढाई केली. जिवंत राहिलेल्या योद्ध्यांनी कॅडमसला नगरी वसवायला मदत केली. हे योद्धे थीब्जनगरीतील उच्चवर्गाचे पूर्वज होत.

८) **कॅपॅन्यूस** : हे नाव Kapnos हा शब्द सुचवते. Kapnos म्हणजे धूर. निष्फळ शब्दांसाठी धुराची प्रतिमा वापरतात. हल्ल्याच्या वेळी कॅपॅन्यूसवर विजेचा आघात झाला ही गोष्टही त्याचे नाव सुचवते.

९) **आमचे कैवारी आर्टेमिस आणि :** आर्टेमिस देवतेचा इथे खास उल्लेख का केला आहे ते स्पष्ट होत नाही. कदाचित इलेक्ट्रनद्वार हे तिला समर्पित असे पवित्र स्थान असावे किंवा पॉलिफॉन्टीज तिचा पुजारी असावा.

१०) **ॲथीना ऑंका–** टीप ४ पहा

११) **नावातल्या कुमारिकेच्या बायकी चालीने–** पार्थिनोपीअस ह्या नावाचा उल्लेख इथे अभिप्रेत आहे. पॉर्थिनॉस म्हणजे कुमारिका. अथीनीदेवीच्या नावापुढे हा शब्द ( Parthenos ) कुमारिका या अर्थी योजिला जातो. पार्थिनोपीअस हा ॲटलांटा ह्या कुमारिकेचा मुलगा होता.

१२) **त्याचे अशुभसूचक नाव–** शब्दश: अनुवाद नावाच्या शेवटच्या भागाचा दोनदा उच्चार करीत. पॉलिनायसीझ म्हणजे " वैराने भारलेला "

१३) **फीबसचा द्वेष :** फीबस म्हणजे सूर्यदेव अपॉलो. या बद्दलचे अधिक स्पष्टीकरण नारीवृंदाच्या गीतातील ४ थ्या कडव्यात आढळेल. टीप १४ पहा

१४) **अपॉलोने लेईअसला–** अपॉलोने लेईअसला बजावले होते की तू अपत्यहीन राहिलास तरच नगरीचा बचाव होईल. ती आज्ञा लेईअसने मोडली म्हणून अपॉलोचा त्याच्यावर कोप झाला.

१५) **आपल्या नावातील आशयाला जागून–** हे शब्द एटीओक्लीजला उद्देशून आहेत. तसेच पॉलिनायसीझलाही उद्देशून आहेत. एटीओक्लीज म्हणजे 'सत्कीर्ती' आणि पॉलिनायसीझ म्हणजे 'वैराने भरलेला '

१६) **पवित्र जहाज–** आत्म्यांना घेऊन मृत्यूची नदी पार करणारे जहाज

आणि मिनिटॉरने राक्षसावर विजय मिळवायला थीसीअसला मदत करणाऱ्या अपॉलो देवाचे आभार मानण्याच्या धर्मकार्यासाठी दरवर्षी अथेन्सहून डेलॉस बेटाकडे निघणारे पवित्र जहाज या दोघांतील विरोध या ठिकाणी नारीवृंद दाखवीत आहे. डेलॉसचा अर्थ ' सुदर्शन ' डेलॉस बेट अपॉलोचे पवित्र स्थान होते. धर्मपालन करणाऱ्या पवित्र लोकांनाच त्या ठिकाणी उतरण्याची आज्ञा असे.

१७) **अँटिगॉनी आणि इस्मिनी**– आक्रोश माझ्या हृदयातून ह्या सर्व ओळी प्रक्षिप्त आहेत. त्या दोघी बहिणी एकामागून एक अशा ज्या शोकगीताच्या ओळी गातात त्या खरे तर नारीवृंदासाठीच लिहिलेल्या आहेत. तसेच घोषणा देणारा येतो येथूनच सगळा भागही प्रक्षिप्त आहे असे काही समीक्षक मानतात.

समाप्त

# शरणार्थी

( " The Suppliants"
या पुस्तकाचा अनुवाद )

लेखक

इस्किलस

अनुवाद

प्रा.आ.ना.पेडणेकर

# शरणार्थी

पात्रयोजना

नारीवृंद : डॅनॅअसच्या[१] पन्नास कन्या[२]

**डॅनॅअस** : झ्यूस आणि आयो यांचा वंशज

पेलॅस्गसः आरगॉसचा राजा

इजिप्शिअनांचा अग्रदूत

**दुसरा नारीवृंदः** डॅनॅअसच्या पन्नास कन्यांच्या परिचारिका

यांशिवाय इतर सैनिक आणि सेवक

( पेलॉपोनीज[३]च्या किनाऱ्याजवळील स्थळ. झ्यूस[४], ॲपॉलो[५], पॉसिडोन[६], हर्मीझ[७] इत्यादी देवांच्या असंख्य प्रतिमा व वेदी असलेल्या तृणाच्छादित टेकडीभोवती असलेले कुरण पलीकडे पृष्ठभागी दूरवर आरगॉसचे[८] तट आणि मनोरे दिसत आहेत. डॅनॅअसच्या कन्या प्रतिमांजवळ जमलेल्या दिसत आहेत. )

पहिला नारीवृंदः शरणार्थ्यांचा देव झ्यूस आम्हां सर्वांवर कृपादृष्टी ठेवो.
आम्ही आलो आहेत जहाजातून
नाईल नदीच्या बाहेरच्या मुखाशी असलेल्या
बारीक रेतीच्या टेकड्यांचा प्रदेश सोडून.
आम्ही सोडून आलो ती सीरीआ[९]च्या कुरणात सामावलेली भूमी
आवडती आहे झ्यूस देवाची.
पण नाही आलो आम्ही येथे
मानवी हत्येच्या कलंकामुळे बहिष्कृत होऊन.
नाही हाकलले कोणी नगरीने आम्हाला शिक्षा हद्दपारीची देऊन.
ईजिप्टसच्या पुत्रांशी निंद्य आणि पापी असा संबंध टाळण्यासाठी
आणि पुरुषांच्या वासनेपासून दूर निसटण्याच्या आशेने
आम्ही आपण होऊन पत्करला विजनवास.
आमचा पिता डॅनॅअस करतो नेतृत्व
आमच्या ध्येयसिद्धीच्या कार्यात.

करतो मार्गदर्शन आपल्या प्रत्येक निग्रही हालचालीस.
पुढे उभे राहिलेल्या अरिष्टातून निवडानिवड करताना
सुरक्षिततेसाठी समुद्र उल्लंघून आरगॉसच्या भूमीकडे धाव घेणे,
हाच मार्ग त्यातल्या त्यात बरा असा निर्णय घेतला त्याने.
इथेच प्रादुर्भूत झाला आमचा वंश आणि आता
पूर्णपणे विकास झाला आहे त्याचा.
दावा आहे त्याचा आपली उत्पत्ती झाली–
प्रत्यक्ष झ्यूसच्या स्पर्शाने आणि श्वासाने
सगर्भ झालेल्या त्या अतिपीडित पशूपासून.

लोकरीने सजवलेल्या फांद्यांच्या शस्त्रांनी
सज्ज होऊन आलो आम्ही याचक या आरगॉस भूमीत.
हिच्याहून अधिक वत्सल भूमी मिळणार होती कुठे आम्हाला?
हे नगरी ह्या देशाच्या मृतिके !
हे चमचमणाऱ्या जलराशींनो !
वातावरणाच्या अधिष्ठात्या देवांनो !
भूतळीच्या काळोख्या गुहात वसणाऱ्या आणि
गंभीर विधींनी सन्मानित होणाऱ्या भूतात्म्यांनो!
आवाहन करतो आहोत आम्ही तुम्हाला.
आणि आता करणार आहोत ज्यांची प्रार्थना तिसऱ्या क्रमांकाने
त्या तारणहार झ्यूस देवा !
तुझेच हात फिरवतात सुकाणू साऱ्या सत्पक्षीयांचे
आश्रय दे आम्हां याचक स्त्रियांच्या समूहाला.
सौम्य वाऱ्याच्या झुळुकेप्रमाणे
स्वागत करो आमचे आरगॉसची करुणा.

ईजिप्टसच्या हिंसाचारी पुत्रांना मात्र देऊ नको थारा.
या दलदलीच्या किनाऱ्यावर ते पाऊल ठेवण्यापूर्वीच
फेकून दे त्यांचा पुरुषी अहंकार-
आमचा पाठलाग करणाऱ्या त्यांच्या जहाजांसकट
दूर समुद्राच्या मध्यभागी.

## शरणार्थी

न्यायनीतीला झुगारुन, आमच्या शय्येवर
आमच्या संमतीविरुद्ध आक्रमण करण्यासाठी
आमच्यावर- आपल्याच चुलतबहिणीवर-
त्यांनी हात टाकण्याआधीच ते ठार मारले जाऊ देत
वादळाचे भयंकर आघात,
मेघगर्जना, वीज, वारा आणि खवळलेल्या समुद्रावरील पाऊस
यांजकडून

आमच्या रक्षणासाठी सागरातील जलराशींवरुन
हाक घालते आहे मी
फुलांमध्ये वाढलेल्या त्या वत्साला
झ्यूसपासून जन्मलेल्या !*,
आमच्या वंशाच्या मातेच्या-गाईच्या उदरातून.
झ्यूसच्या श्वासाने आणि कुरवाळण्याने.
म्हणूनच दिले गेले त्याला यथार्थ नाव,
भविष्य वर्तवल्याप्रमाणे आले आकारास त्याचे जीवन
जन्मला जेव्हा मातेच्या पोटी ' एपॅफॉस' म्हणजेच 'स्पर्शसुत'.

त्याचाच धावा करते आहे मी.
ह्या कुरणामधे, ज्याच्या चाऱ्यावर पोसली गेली
आयो-आमची आदिमाता- त्या ह्या कुरणामधे
त्यावेळी जे जे सोसले त्याचा पुनरुच्चार करुन
देईन आता असंदिग्ध प्रमाणे आम्ही जे हक्काने मागतो आहो त्याला.
प्रगट होतील अल्पावधीत भक्कम आधार
असेच आणखी, ध्यानीमनी नसताना.
कारण काळ पुढे पुढे सरकतो तसतसा
होत जातो सत्याचा अविष्कार.

योगायोगाने असलाच जर जवळपास
इथल्या किनाऱ्यावरचा कोणी रहिवासी तर-
पक्ष्यांचे तारस्वर ऐकता ऐकता

पडेल त्याच्या कानांवर जेव्हा
आम्हा शरणार्थी स्त्रियांचे शोकाकुल गीत,
तेव्हा वाटू लागेल त्याला की-
ऐकतो आहोत आपण आवाज-
टीरीअस''च्या पत्नीचा-
-अश्रू ढाळणाऱ्या डॉलिअनचा-
-ससाण्याची शिकार झालेल्या बुलबुलाचा
रडत रडत हिरव्या पर्णराशीखालून
स्वगृहाला मुकलेल्या वनवासी जीवनाने दु:खीकष्टी होत
सांगत  असते ती आपल्या गीतामधून
आपल्या पुत्राच्या मृत्यूची  कथा.
सांगत असते कसा नाश झाला आपल्या पुत्राचा
आपल्याच हातून.
पडला कसा बळी हो आपल्या आईच्या दुर्दम्य भावनावेगाला.

आयोनीआ''ची शोकगीते गाऊन
विलाप करण्यास प्रवृत्त झालेली मी
नाइल नदीने श्यामल बनलेल्या माझ्या गालांची'' मृदुता
आणि अश्रुपाताला अनभिज्ञ असे अंत:करण
यांचा चोळामोळा करुन टाकीत आहे माझ्या शोकाने.
भयभीतीच्या कळपाला चरवता चरवता
खुडते आहे मी यातनांची फुले.
स्वदेशापासून इतक्या दूरवर पळ काढलेल्या आम्हाला
येईल का कोणी मदत करायला ?

विवाहमंगलाच्या अधिष्ठात्या देवांनो, ऐका आमची प्रार्थना–
होऊ दे विजय न्यायाचा.
फलद्रूप होऊ देऊ नका बेफाम तरुणांची दुष्ट वासना.
दमन करा गर्वाचे तुम्ही आपल्या घृणेने.
घडवून आणा आमच्यासाठी उचित असा विवाहसंबंध.
जे काढतात पळ लढाईच्या चेंगराचेंगरीपासून

## शरणार्थी

त्यांच्यासाठीही असते उपलब्ध
विनाशापासून वाचवून आश्रय देणारी वेदी;
देवांबद्दलच्या आदरामुळे तेथे सुरक्षितता लाभते त्यांना.
सत्य आहे वचन :

कोण काढू शकेल माग झ्यूसच्या दृढसंकेताचा ?
तो असतो गूढ अगम्य !
विनाशाच्या वाटेवर असलेल्या मानवांच्या डोळ्यांपासून
दडवून ठेवतो झ्यूसदेव जरी काळोखात साऱ्या गोष्टी,
तरी त्या साऱ्या लख्ख दिसत असतात त्याला.
झ्यूसने मान डोलावून
' ही घटना घडू दे ' असा निर्णय देताच
ती घटना पाय घट्ट रोवून खडी राहतेच.
त्याच्या हृदयातील संकल्पांची वाटचाल
आहे गुंतागुंतीची, घनांधकाराने व्याप्त.
अनाकलनीय आहे ती मानवाच्या विचारशक्तीला आणि दृष्टीला.

भिरकावून देतो तो मर्त्य मानवांना विनाशाच्या गर्तेत
त्यांच्या आशांच्या उत्तुंग मनोऱ्यांवरून.
प्रगट केली जर कुणी अमर देवाने
सहजविजयी दैवी शक्ती त्याच्याविरुद्ध, तर–
झ्यूस निमिषार्धात करतो गर्वपरिहार त्याचा–
मग तो कितीही उच्च पूजास्थान असेना का मानवांचे !
यास्तव घेऊ दे झ्यूसला दखल मानवी औद्धत्याची
आणि पाहू दे त्याला.
म्हातारी खोडे कशी बनतात तरुण
आमच्या शरीरांशी संबंध जोडण्याच्या लालसेने
आणि कशी फुलून येतात विकृत वासनांनी–
पागल निश्चय डोसून ढकलीत असताना पुढे अव्याहत त्यांना
आणि भ्रामक गोष्टींची भुरळ पडून सुरु होतो दुराचार
पण त्या दुराचारामागोमाग येते दुःख – फक्त दुःख.

## ग्रीक शोकनाट्ये

आळवीत आहे मी अशी गीते बेसूर, कलाहीन–
माझा रडवा आवाज होतो आहे कधी कर्कश, कधी भरड.
अंत्यविधीसमयीच्या विलापि केसासारखीच ही गीते
आहेत आक्रंदनानी परिपूर्ण.
साजरा करते आहे मी माझा मृत्यू
ह्या जित्या जीवाच्या विव्हल ध्वनींनी
एपिआ[१०]च्या ह्या पहाडीप्रदेशाकडे भाकते आहे करुणा उच्चस्वराने
( हेलासच्या भूमी, क्षमा कर माझ्या विदेशी विचित्र वाणीला )
पुन्हा पुन्हा फाडून माझी सायडॉन[११] प्रांतीय ओढणी
मी करते आहे तिची विद्रूप लक्तरे.

सुरळीत चालू असते जेव्हा सगळे जीवन
मुळीच उरलेली नसते जेव्हा मृत्युची दहशत;
तेव्हा देवांसमोर फेडले जातात नवसामागून नवस.
पण गोंधळले आहे मी मात्र संकटांनी अडचणींनी.
कुठे घेऊन जाणार आहे हे वादळ माझ्या जीवननौकेला ?
एपिआच्या ह्या पहाडीप्रदेशाकडे भाकते आहे करुणा उच्चस्वराने
( हेलासच्या भूमी, क्षमा कर माझ्या विदेशी विचित्र वाणीला )
पुन्हा पुन्हा फाडून माझी सायडॉन प्रांतीय ओढणी
मी करते आहे तिची विद्रूप लक्तरे.

अजूनपर्यंत तरी आमच्या नौकेच्या वल्ह्यांनी
आणि पाणी आत शिरू नये म्हणून मेणाने लिंपलेल्या
नौकेच्या सांगाड्याने
आणले आम्हाला अनुकूल वाऱ्याबरोबर सुरक्षित.
वादळाचा तडाखा बसला नाही आम्हाला, कृतज्ञ आहे मी यासाठी.
आमच्या प्रवासाचा शेवट होईल आता भूमीवर पाय ठेवताच.
आमच्या इच्छेनुसार सर्वसाक्षी पिता झ्यूस
मार्गदर्शन करो या पर्यटनाचे
आणि त्याची पवित्र वधू आयो हिचे वंशज नसलेल्या आम्हाला
स्पर्शही न होवो पुरुषजातीचा,

आणि ठेवता येवो आम्हाला आमचे कौमार्य अपराजित
त्याच्या अनुग्रहाने.

ओपिसबद्दलची ओरायन[13]ची विषयवासना
प्रतिबद्ध केली जिने
ती झ्यूसकन्या. पवित्र्यप्रेमी आर्टेमिस[14]
कृपावती होऊन आदर करो माझ्या निर्मल प्रवृत्तीचा.
आपल्या सर्वसामर्थ्यानिशी त्या कुमारिकेने
यावे या कुमारिकेच्या सुटकेला.
आणि करावा प्रतिकार
आमचा पाठलाग करणाऱ्या या विषयवासनेचा.
म्हणजे मग झ्यूसवधू आयोचे वंशज असलेल्या आम्हाला
स्पर्श टाळता येईल पुरूषजातीचा
आणि ठेवता येईल अनाघात आम्हाला आमचे कौमार्यपुष्प.

आणि असे घडले नाही तर-
सूर्य ज्याची घृणा करतो त्या गृहाकडे-
असंख्य अतिथींचे स्वागत करणारा
अधोलोकाचा झ्यूस-मृतांचा स्वामी-याच्याकडे आम्ही येऊ
आम्हा शरणार्थ्यांच्या शाखांसह.
कारण ऑलिम्पस[15]वरील देवांनी आमची प्रार्थना ऐकायला
नकार दिला तर- तर मग
आम्ही करू आत्महत्या फास लावून घेऊन

अरेरे ! आयो !
रागावलेले देव शोधताहेत तुला शिक्षा करण्यासाठी,
मी ओळखून आहे स्वर्गस्थ देवांचा एकवटलेला मत्सर
रागाने वाहणाऱ्या वाऱ्याचे होईल मग वादळात रूपांतर
स्वत:च जन्माला घातलेल्या गाईच्या पुत्राला
झ्यूसनेच झिडकारले प्रथम, आणि आता
त्याच पुत्राच्या अपत्यांवरून नजर घेतो आहे वळवून

आम्ही त्याला प्रार्थीत असताही
याबद्दल करता येणार नाही त्याला आता आपला बचाव वाजवी रीत्या
कारण ऐकू येत आहे त्याला स्पष्टपणे आमचा आक्रोश
जरी तो असला कितीही उच्च आसनावर बसलेला

अरेरे ! आयो !
रागावलेले देव शोधताहेत तुला शिक्षा करण्यासाठी.
मी आळखून आहे स्वर्गस्थ देवांचा एकवटलेला मत्सर.
रागाने वाहणाऱ्या वाऱ्याचे होईल मग वादळांत रुपांतर.
( एवढ्यात डॅनॅअस किनाऱ्यावरुन प्रवेशतो )

डॅनॅअस: बाळांनो, वागले पाहिजे आपण, शहाणपणाने.
नौकांतून इथपर्यंत येताना पाहिलेत तुम्ही
तुमचा वृद्ध पिता किती विश्वसनीय, कुशल कर्णधार होता ते.
आता जमीनीवर देखील वाहीन तुमची काळजी,
करीन तुमचे संरक्षण.
मात्र मी सांगतो ते कोरुन ठेवा आपल्या हृदयात.
( समोर पाहत आरगॉसकडे बोट दाखवतो )
मला दिसते आहे धूळ वर उठताना.
मूकपणानेच घोषित करते आहे ती सैन्याचे आगमन
जरी त्याच्या रथांच्या चाकांचा आणि आसांचा खडखडाट
ऐकू येत नाहीय अजून.
मला दिसतो आहे ढाल आणि भाला घेतलेल्या सैनिकांचा समूह;
दिसताहेत त्यांचे घोडेदेखील आणि त्यांचे बाकदार रथ.
आम्ही किनाऱ्यावर उतरल्याचे समजताच
खात्रीने ह्या देशाचे राज्यकर्ते
येताहेत स्वत:च आम्हाला दृष्टीखालून घालायला.
त्यांच्या ह्या उग्र आगमनाचा हेतू
असेल निरुपद्रवी
किंवा असेल त्याला रानवट क्रोधाची धार.
काहीही असले तरीही माझ्या मुलींनो,

तुम्ही बसा ह्या उंचवट्यावर
या क्रीडोत्सवाच्या अधिष्ठात्या देवांच्या शरणार्थी म्हणून.
अधिक समर्थ असते रक्षणाच्या कामी दुर्गाहूनही ही वेदी
अभेद्य अशी ढालच जणू.

या या लवकर, घेऊन या
दयाशील झ्यूसची प्रतीकेच अशा शाखा शुभ्र लोकरीने सजवलेल्या,
विधिपूर्वक धरा त्या आपल्या डाव्या हातात;
आरगॉसच्या ह्या नागरिकांना उत्तरे द्या
नवागतांनी द्यावी तशी.
तुम्ही योजलेल्या शब्दांनी अश्रू उभे रहावेत त्यांच्या डोळ्यांत
आणि दाटून यावी हृदयात करुणा तुमच्या अडचणींबद्दल.
स्पष्टपणे सांगा तुम्ही का पळून आलात या ठिकाणी ते
आणि सांगा त्यांना तुमच्या हातून कधी झाली नाही हत्या कुणाचीच.
आणि या सर्वांआधी ही एक गोष्ट लक्षात घ्या,
की तुमच्या बोलण्यात अथवा तुमच्या मुद्रेवर
दिसता कामा नये धिटाई अथवा ढिलाई;
निश्चय दृढ असू दे पण मुद्रा मात्र ठेवा लीन, विनम्र.
फाजील धृष्टता नको बोलण्यात, पण बोलू की नको असा संदेहही नको.
जमात आहे ही शीघ्रकोपी
लक्षांत ठेवा तर मग – नमते घेणेच आवश्यक आहे इथे.
तुम्ही सगळ्या आहात येथे परकीय आणि स्वदेशातून पळून आलेल्या
असहाय्य अशा
आणि ज्यांचा पक्ष दुर्बळ असतो,
त्यांनी उद्धट भाषा वापरणे अस्थानीच होय.

पहिला नारीवृंद : पिताजी, तुमच्या सुजाण सूचना मानण्याइतपत आहोत आम्ही शहाण्या.
आमच्या वंशाचा जनक झ्यूस आमचा साक्षी राहो !

डॅनॆअस : तर मग नका वेळ गमावू,
धरा दृढ आपली जागा ठामपणे रहा आपल्या आश्रयस्थानी.

पहिला नारीवृंद : तयार आहे मी; बसू द्या मला इथे तुमच्या शेजारी.
हे झ्यूसदेवा, आमच्या दु:स्थितीची येऊ दे तुला दया ;
मृत्युमुखापासून वाचव आम्हाला.

डॅनॅअस : झ्यूसदेवा, वळव आपली स्नेहमयी दृष्टी निश्चितपणे आमच्यावर.
तू राहिलास आमच्या पाठीशी तर होईल सुखान्तजीवन
आमचे साऱ्यांचे.
हा आता झ्यूसपुत्र अँपॉलो; करा आवाहन त्याला.

पहिला नारीवृंद : आम्ही करतो आवाहन संरक्षक सूर्यकिरणांना
आणि शुद्ध, पवित्र अशा अँपॉलो देवाला.
एकदा स्वर्गातून हद्दपार झालेला हा देव अँपॉलो
हा करील आदर मर्त्यांच्या एकेकाळी त्याने अनुभवलेल्या दु:खाचा.

डॅनॅअस : तथास्तु ! तो राहो आमच्या पाठीशी
आमच्या सत्साध्याचा कैवारी होऊन

पहिला नारीवृंद : ह्या देवांतील आणखी कोणाला आता करु मी आवाहन ?

डॅनॅअस : हा पहा दिसतो आहे त्रिशूल पॉसीडोनदेवाचा

पहिला नारीवृंद : त्यानेच दिले होते आशीर्वचन आमच्या जलप्रवासाला.
आता करावे त्याने भूमीवरही आमचे स्वागत.

डॅनॅअस : आणि हा आहे इथे हर्मीझ आपल्या ग्रीकदेशीय स्वरुपात.

पहिला नारीवृंद : बरे झाले त्याचे दर्शन झाले ते,
अग्रदूत होवो तो आमच्या सद्भाग्याची घोषणा
आमच्यासाठी करणारा.

डॅनॅअस : थोडक्यात सांगावयाचे म्हणजे आवाहन करा.

## शरणार्थी

या वेदीवर पूजिल्या जाणाऱ्या साऱ्या देवांनाच त्यांची नावे घेऊन;
आणि ससाण्यांच्या भीतीने दबून बसणाऱ्या
कबुतरांच्या थव्याप्रमाणे
हक्काने मागा पवित्र आश्रयस्थान
तुमचा वंश भ्रष्ट करू पाहणाऱ्या, शत्रू झालेल्या
आपल्याच बांधवांपासून संरक्षणासाठी.
पक्ष्यांचेच मांस खाणारा पक्षी राहू शकेल का पवित्र ?
तसेच स्त्रीच्या आणि तिच्या पित्याच्या इच्छेविरुद्ध
तिच्याशी शरीरसंबंध करणारा पुरुष राहू शकेल का पवित्र ?
मरणानंतरही हेडीझ''मधे अशा कृत्याला सुटका नाही
शिक्षा भोगल्यावाचून. असे म्हणतात की त्याठिकाणीही
मृतात्म्यांमधे आहे
दुसरा एक झ्यूस
जो करतो मानवांच्या पापांचा अंतिम निवाडा.
म्हणून शहाणपणाने वागा.
ह्या लोकांच्या नेत्याला अशी उत्तरे द्या की
ज्यायोगे होईल यशस्वी आज तुमचे अंगीकृत बिकट कार्य.
( राजा पॅलॅसगस'' आपल्या शरीर रक्षकांसह प्रवेश करतो )

राजा : तुमचे स्वागत असो. कोणत्या देशातून आला तुम्ही ?
आरगॉस किंवा हेलास येथल्या स्त्रिया कधीच वापरीत नाहीत
असे घट्ट विणीचे, मुलायम पण रानटी झगे; हा तुमचा वेष
विचित्र वाटतो आम्हाला.
पूर्वसूचना न देता, कुणाचीही ओळखदेख न सांगता,
कोणाही मित्राला किंवा मार्गदर्शकाला बरोबर न घेता,
पाय ठेवलात तुम्ही ह्या आमच्या किनाऱ्यावर न भिता,
आश्चर्य वाटते आम्हाला तुमच्या धाडसाचे.
शरणार्थ्यांची निशाणी अशा ह्या शाखा
आपल्या बाजूला ठेवून बसला आहात खऱ्या ह्या उत्सवांच्या अधि
ष्ठात्या देवांसमोर.
फक्त ह्या चिन्हाचाच अर्थ लावू शकतो आम्ही.

इतर गोष्टींबाबत मात्र आम्ही अखंड अंदाजच बांधत राहू
निश्चित सत्य सांगणारे उत्तर देणारा आवाज
उपलब्ध नसला तर.

पहिला नारीवृंद : महाशय,
अगदी खरा आहे तुमचा तर्क आमच्या वस्त्रांवरुन केलेला.
आणि आपण ह्या नगरीचे कुणी रहिवासी आहात का ?
का आपण निशाणीचा दंड धारण करणारे अग्रदूत आहात असे मानू ?
आणि त्या पदाला साजेल अशा प्रकारे बोलू का मी तुमच्याशी ?
की आपण ह्या नगरीचे राजे आहात असे समजून
बोलू मी तुमच्याशी ?

राजा : बोला माझ्याशी पूर्ण विश्वासाने; मी आहे पेलॅसग्स
भूमीजात पॅलीक्थॉन[१३]चा पुत्र, ह्या देशाचा राजा.
राजावरुन-माझ्या नावावरुन-मिळाली आहे
यथार्थ संज्ञा ' पेलॅसगिअन ' ही भूमी कसणाऱ्या वंशाला.
ज्यातून वाहत आहे. हॅलिॲक्मन [१४] नदी
त्या पश्चिमेपर्यंत पसरलेल्या प्रदेशावर मीच करतो आहे राज्य.
पिंडस[१५] पर्वतापलिकडील आणि केओनीस[१६]जवळील भाग,
डोडोनीअन[१७] पर्वतराजी आणि सर्व पेऱ्हीबीअन[१८] प्रदेश–
या साऱ्यांवर आहे माझाच ताबा.
मात्र संपते माझे साम्राज्य जिथे भिडते जमीन समुद्राला.
मधल्या सगळ्या भूभागावर माझेच आहे राज्य.
प्राचीन काळी रोग बरे करण्याच्या कौशल्यासाठी प्रसिद्ध होता
एपिस[१९].
त्याच्याच नावावरुन पडले आहे नाव ह्या सपाट प्रदेशाला
'एपिअन प्रदेश'
रोगोपचार आणि शकुन कथन यांवर
प्रभुत्व असलेला ॲपॉलोचा पुत्र एपिस
आला इथे नॉपॅक्टस[२०]हून जलराशी ओलांडून.
त्याने केली सुटका या भूमीची

मानवांची शिकार करणाऱ्या हिंस्त्रपशूंपासून,
भ्रष्ट झालेल्या भूमीने क्रूर सावत्र मातेप्रमाणे
उत्पन्न केले होते हे पशू असंख्य क्रूर सर्प
मानवाच्या वारशात सहभागी होण्यासाठी उद्युक्त केलेले.
अशा या अरिष्टांवर एपिसने योजिले औषधोपचार
आणि सुरु केले पापविमोचनाचे विधी.
त्यामुळे झाला आमचा देश संपूर्ण सुखी
आणि उच्चारतो त्याचे नाव उपकाराची परतफेड म्हणून
नैमित्तिक प्रार्थनांच्या दिनी.

सांगून झाले सारे, मला सांगायचे होते ते.
आता तुमच्यापैकी कोणी तरी जाहीर करा आपले कुल
आणि बोला स्पष्टपणे, मोजक्या शब्दात.
आरगॉसला आवडत नाही. लांबलचक भाषण.

पहिला नारीवृंद : तर मग बोलते आता मी
थोड्या शब्दात आणि असंदिग्धपणे.
आमचा आहे दावा –
वाहत आहे आमच्या धमन्यातून आरगॉसचे रक्त.
झ्यूसने केली गर्भिणी ज्या गाईला,
तिच्या आम्ही वंशज;
थांबा, ऐका. मी जे म्हटले ते सारे सिद्ध करीन
अगदी दृढतेने माझ्या आणखी बोलण्याने.

राजा : हे स्त्रियांनो,
विश्वास बसत नाही तुमच्या या कहाणीवर;
कसा असू शकेल तुमच्या सारखा वंश आरगॉसच्या कुलातील ?
दिसत नाही तुम्ही आमच्या देशच्या स्त्रियांसारख्या निश्चितच.
तुम्ही तर दिसता लिबीआच्या रहिवाशांसारख्या.
नाइल नदी वाढवीत असेल कदाचित असा वंशवेल
तो पुरुष- कारागीर स्त्रियांच्या रुपाला जेथे देतो आकार

त्या तुमच्या मुद्रांवर हुबेहूब छाप उमटला आहे सायप्रसचा[११].
आणि मी एकले आहे की –
तुमच्या सारख्या स्त्रिया असतात ' भटक्या जातीच्या, जसे आम्ही फिरतो घोड्यांवरुन
तशा त्या स्वारी करतात उंटांच्या पाठींवर
आणि भटकतात आरामात इथिओपिआच्या[११] जवळील प्रदेशातून
जर का असती तुमच्याजवळ धनुष्ये
तर वाटले असते मला की तुम्ही आहाता त्या प्रसिद्ध अॅमेझॉन[११] बाया
– मांसावर जगणाऱ्या , पुरुषसहवासाशिवाय आयुष्य व्यतीत करणाऱ्या
पण मला सांगा अचूकपणे–
तुमचा वंश कसा झाला प्रसृत आरगॉसपासून ?
कसे त्याच्याशी तुमचे रक्ताचे नाते ?

**पहिला नारीवृंद :** या ठिकाणी आरगॉसमधे एकेकाळी
आयोच्या स्वाधीन होत्या किल्ल्या हीरा[१४]च्या मंदिराच्या;
सांगितली जाते का ही गोष्ट कधी इथे ?

**राजा :** निश्चितच होती आयो हीरामंदिराची विश्वस्त –
सर्वश्रुतच आहे ही गोष्ट.

**पहिला नारीवृंद:** विव्हल झाला होता झ्यूसदेव आयोविषयींच्या प्रेमाने–
सांगतात का लोक असेही काही आणखी ?

**राजा :** होय. आणि त्याचे प्रेम समजताच
जागृत झाला मत्सरभाव हीराच्या मनात

**पहिला नारीवृंद :** काय झाला शेवट परिणाम ह्या राजकुटुंबातील वैराचा ?

**राजा :** आरगॉसच्या देवीने स्त्रीचे रुपांतर केले गाईत.

**पहिला नारीवृंद :** आणि मग झ्यूसदेव ?

तिचा शोध घ्यायला उद्युक्त झाला नाही का तो ?

राजा : झाला होता म्हणतात –
सोयीस्कर असे वृषभाचे रुप स्वत: धारण करुन

पहिला नारीवृंद : मग काय केले त्यानंतर हीराने ? –
मोठी हटवादी आहे ती.

राजा : गाईवर ठेवला पहारा एका सर्वदर्शी पहारेकऱ्याचा.

पहिला नारीवृंद : एकच गाय वळवणारा हा सर्वदर्शी गुराखी होता तरी कोण ?

राजा : तो होता, हर्मीझने ज्याला नंतर ठार केले तो भूमिपुत्र आरगस[१५].

पहिला नारीवृंद : त्या दुर्दैवी गायीविरुद्ध हीराने
दुसरी कोणती योजली क्लुप्ती ?

राजा : गुरांना छळणारी,
त्यांना कधीच एका जागी स्वस्थपणे चैन पडू न देणारी माशी.

पहिला नारीवृंद : होय, नाईलकाठचे रहिवाशी म्हणतात तिला ईस्ट्रस[१६]

राजा : काय ?
पिटाळीत नेले का त्या माशीने त्या गायीला नाईल नदीपर्यंत?

पहिला नारीवृंद : अर्थातच
माझ्या प्रश्नांमागच्या हेतूला पोषक अशीच आहेत
तुमची उत्तरे.

राजा : तर मग ती गाय आली का कॅनोपस[१७]कडे ?
आणि नंतर मेम्फीस[१८]कडेही ?

पहिला नारीवृंद : होय, तिथेच स्पर्श केला झ्यूसने तिला आपल्या हाताने
आणि गर्भ स्थापन केला आपल्या अपत्याचा.

राजा : कोणता मनुष्य मग म्हणून घेतो स्वत:ला
झ्यूसच्या गायीचा गोऱ्हा असे ?

पहिला नारीवृंद : त्याचे नाव एपॅफॉस[१५]. योग्य दिले गेले त्याला नाव.
कारण झ्यूसने प्रस्थापित केला होता आपल्या स्पर्शाने
पितृत्वाचा हक्क.

राजा: आणि मग एपॅफॉसची संतती कुठली ?

पहिला नारीवृंद : त्याला आहे एक कन्या लिबीआ नावाची. –
पृथ्वीवरील सर्वात विशाल भागांतून पीक घेणारी.

राजा: तिला झाले का काही मूलबाळ ?
त्याचे नाव तर उच्चारले नाहीस अजून ?

पहिला नारीवृंद : तिच्या मुलाचे नाव बेलस;
त्याला होते दोन मुलगे आणि तो होता माझ्या या पित्याचा पिता.

राजा: आता सांग तुझ्या पित्याचे नाव –
त्याच्या शहाणपणाला साजेल असेच असणार ते !

पहिला नारीवृंद : त्याचे नाव डॅनॅअस; त्याला आहे एक भाऊ पण –
पन्नास पुत्रांचा पिता असलेला.

राजा: मग सांग नाव त्याचेही काही आशंका न बाळगता.

पहिला नारीवृंद : त्याचे नाव ईजिप्टस.
आता कळलीच आहे तुम्हाला आमच्या वंशाची दीर्घतम कथा

म्हणून विनविते तुम्हाला –
कैवारी व्हा या आरगॉसवंशीय चमूचे.

राजा : असे दिसते खरे आता की
प्राचीन काळापासून तुम्ही आहात आरगॉसचे वंशज,
शंका नाही आता याबद्दल मला.
पण आपल्या पितृभूचा त्याग करण्याची इच्छा कशी झाली तुम्हाला
? कसा झाला धीर असे करण्याला ?
कुठला दैवाचा टोला बसला तुमच्या शिरांवर ?

पहिला नारीवृंद : पेलॅस्गीअनांच्या राजा,
विविध रंगी असतात मानवी आपत्ती त्यांना
अरिष्टाच्या पंखांमध्ये असत नाही एक पीस दुसऱ्या पिसासारखे.
कुणाला वाटले होते कधी की
इजिप्तमधील पापी बलात्काराच्या घृणेने हादरून
तडकाफडकी करू आम्ही असे पलायन
आणि हाकारू नौका
रक्ताच्या प्राचीन नात्याने आमच्याशी निगडित झालेल्या
आरगॉसभूमीकडे ?

राजा : शुभ्र लोकरीने मढवलेल्या या ताज्या शाखा घेऊन
शरण आलेल्या तुम्ही हया देवांना, –
कोणती मागणी करताहात माझ्याकडे ?

पहिला नारीवृंद : आम्हाला होऊ देऊ नका गुलाम इजिप्टसच्या पुत्रांच्या.

राजा : कां बरे ? तिरस्कार करता का तुम्ही त्यांचा ?
अनुचित वाटते का तुम्हाला त्यांच्याशी लग्न करणे ?

पहिला नारीवृंद : कोणती मुलगी हुंडा देऊन** विकत घेईल
स्वत:च्याच कुटुंबाचा स्वामी ?

**राजा :** स्वकीयांमधे जडलेला लग्नसंबंध
वृद्धिंगत करतो सामर्थ्य कुटुंबाचे.

**पहिला नारीवृंद :** खरे आहे ते !
आणि जर सारे काही सुरळित न झाले तर
संबंधही तोडून टाकता येतो किती सहज !

**राजा :** हक्काने शरणार्थ्यांच्या साहाय्यासाठी केलेल्या
तुमच्या याचनेचा कसा करू मी सन्मान ?

**पहिला नारीवृंद :** ते आमचा ताबा मागतील तेव्हा
त्यांना द्या स्पष्ट नकार.

**राजा:** आणि विनाशक युद्धाचा स्वीकार करू ?
भलतीच मागणी करताहात तुम्ही.

**पहिला नारीवृंद :** न्यायासाठी लढणारांचे नेतृत्व करील
प्रत्यक्ष न्यायदेवता.

**राजा:** हं ! पण प्रारंभापासून जर असता या प्रकरणात
माझा हात.
तरच ठरले असते खरे, म्हणणे तुमचे.

**पहिला नारीवृंद :** मान राखावास तू
या प्रकारे पल्लवमाला धारण केलेल्या तुमच्या
नगरीच्या या कर्णधार देवांचा.

**राजा:** दिसते आहे मला शाखांनी आच्छादित हे पवित्र स्थान,
आणि उठतो आहे माझा थरकाप.

**पहिला नारीवृंद :** शरणार्थ्यांच्या रक्षणकर्त्या झ्यूसचा कोप

असतो महाभयंकर.
पॉलिक्थॉनच्या पुत्रा – पेलॅस्गिअनांच्या राजा –
आस्थेने ऐक मी काय सांगते ते –
निर्वासित शरणार्थी मी, बघ, कशी
उंच, निमुळत्या खडकांवरून धावते आहे सैरभैर,
लांडग्याने पाठ धरलेल्या आणि
गुराख्याच्या सहाय्याच्या आशेने
आपल्या संकटाची वर्दी त्याला हंबरून देणाऱ्या गाईसारखी.

राजा : नुकत्याच खुडलेल्या पानांच्या आवरणाखाली
सारे उत्सवमूर्ती देव माना हलवून संमती देताना
दिसताहेत मला.
आमच्या नगरीशी संबंध आहे तुमच्या रक्ताच्या नात्याचा,
म्हणून तुमच्या कार्याखातर संकट न येवो.
आमच्या नगरीवर.
बेसावध असताना आम्ही, कोसळू नये आमच्यावर
अज्ञात ठिकाणांहून युद्ध.
आम्हाला नको आहे घडायला तसला काही प्रकार.

पहिला नारीवृंद : शरणार्थ्यांकडे मित्रभावाने पाहाणारी,
प्रत्येकास त्याचे न्याय्य हक्क मिळवून देणारी,
झ्यूसकन्या थेमिस[१२] कृपा करो आमच्यावर.
आणि न उद्‌भवोत विघ्ने आमच्या इथे धाव घेतल्यामुळे.
ज्ञानवृद्ध तू शिकून घे आम्हां अल्पवयी व्यक्तींकडूनही.
आदर करशील शरणार्थ्यांचा तर
तुझा हा कृतियाग ठरेल सर्वोत्तम-यज्ञ –
देवांच्या कृपाशील वेदीवर
निष्कलंक चारित्र्याचा मानवच फक्त करू शकेल असा.

राजा : जेथील गृहाग्नीजवळ बसली आहेस तू
ते हे नव्हे माझे व्यक्तीगत घर

आणि जर आर्गाइव्ह राज्य ठरले या कार्यात दोषास्पद
तर आरगॉसच्या लोकांनाच एकत्र येऊन
करावी लागेल उपाययोजना.
यास्तव माझ्या सर्व नागरिकांच्या सभेत
करीन या प्रश्नांची परस्पर चर्चा.
त्यापूर्वी नाही देणार कसलेही आश्वासन.

**पहिला नारीवृंद :** तूच आहेस राज्य; तू म्हणजेच प्रजानन; तूच आहेस
सर्वाधिकार असलेला राज्यकर्ता –
कोण जाब विचारणार आहे तुला ?
तुझेच आहे स्वामित्व तुझ्या देशाचा गृहाग्नी असलेल्या या वेदीवर.
विरूद्ध मतांची नाही धास्ती तुला
एकमेव सत्ताकेंद्र अशा सिंहासनावरून
मानेच्या फक्त इशाऱ्यानिशी लावतोस निकाल सर्व प्रश्नांचा.
म्हणून म्हणते –
तूच खबरदारी घे, स्वत: दोषास्पद न ठरण्याची.

**राजा:** दोषास्पद ठरोत माझे वैरी; तरीही कळत नाही मला
कशी मी करणार मदत तुम्हाला, अरिष्ट ओढवून न घेता.
उलटपक्षी तुमची ही विनवणी अव्हेरली तर
ठरेन मी अनुदारवृत्तीचा
मी करू तरी काय? कुठल्या बाजूला वळूं ?
भीती वाटते मला कृती करायला आणि तटस्थ राहायलाही
घडू देता या घटनांना जसे त्याना घडायचे असेल तसे.

**पहिला नारीवृंद:** सावध रहा :
देवांच्या रक्ष नजरेपासून जी दखल घेते मानवी दु:खांची;
त्यांच्या दृष्टीतून सुटत नाहीत
अन्यायाच्या यथायोग्य परिमार्जनार्थ साहाय्य
नाकारले गेल्याने
शेजाऱ्याच्या गृहाग्निजवळ असहाय्य बसलेली माणसे.

## शरणार्थी

शरणार्थ्यांना झिडकारलेले पाहून
सतत धगधगत राहतो झ्यूसचा क्रोध;
शमत नाही मुळीच त्याचे बळी होणाऱ्यांच्या अश्रूंनीही.

राजा: तुमचे जवळचे आप्त असा दावा करून
इजिप्तटसचे पुत्र तर तुमचे स्वामी ठरतील
तुमच्या देशाच्याच कायद्यांप्रमाणे,
तर कोण येईल त्यांच्या मागणीच्या आड?
तुमच्याच कायद्यांनुसार चालायला हवा तुमचा अभियोग.
आणि सिद्ध व्हायला हवे की –
ह्या पुरूषांचा नाही हक्क कोठलाही तुमच्यावर.

पहिला नारीवृंद: हक्क असो अगर हक्क नसो,
मी नाही होणार जबरदस्तीने गुलाम पुरूषाची.
ह्या निर्दय, उद्धटाच्या बलात्कारापासून
पळ काढीन मी दूरवर
पृथ्वीवर विस्तारलेल्या तारकांगणापर्यंत.
तर मग आता कर पसंत न्यायदेवालाच स्नेही म्हणून
आणि दे पवित्र निर्णय देवांना संमत असा.

राजा : निर्णय देणे नाही इतके सुलभ;
नको निवडूस मला न्यायाधीश म्हणून.
मघाशीच सांगितले मी तुम्हाला
की जरी असलो मी एकमेव राजा
तरी नाही करता येत काहीच कृती मला तुमच्या बाबतीत
माझ्या नागरिकांच्या संमतीवाचून.
ओढवले जर काही अरिष्ट तर –
माझ्या नागरिकांनी म्हणता कामा नये कधीही मला-
'तू केलास नाश आरगॉसभूमीचा परक्या लोकांखातर!'

पहिला नारीवृंद : आमचा आणि त्यांचाही पूर्वज आहे थोर झ्यूस

त्याने बनवला आहे अचूक तराजू;
करतो विचार दोन्ही बाजूंचा.
सत्याला धरून शासन करतो दुर्जनाला,
वरदान देतो सज्जनाला.
आता तर सर्व काही नि:पक्षपातपणे समतोल झालेले असताना
का घाबरतोस माझ्या प्रकरणात न्याय्य निर्णय करायला ?

राजा : आम्हा सर्वांना वाचवण्यासाठी गरज आहे सखोल चिंतनाची,
सागरतळाचा शोध घेणाऱ्या पाणबुड्यासारख्या
वेध घेणाऱ्या डोळ्यांची –
स्पष्ट निरखणाऱ्या, स्थिर राहाणाऱ्या,
तरच ह्या द्विधा मन:स्थितीतून
गाठता येईल सुखी पथ्यकर शेवट,
आधी आरगॉससाठी आणि नंतर माझ्यासाठी.
असा विचार केला पाहिजे प्रथम की
युद्ध आणि लुटालुट तर नाही ना
कोसळणार आमच्यावर, बदला घेण्यासाठी म्हणून ?
आमच्या देवांच्या वेदीपाशी
शरणार्थी म्हणून आलेल्या तुम्हाला
जर आम्ही त्यांच्या स्वाधीन नाही केले तर –
परिणामी सूडदेव घसरेल आमच्यावर –
ते विनाशक दैवत –
जे पीडील आमच्या जीवनांना;
मरणांनीही आपल्या शिकारीला
आपल्या तावडीतून जाऊ देत नाही तो सूडदेव.
आम्हाला केले पाहिजे खूप सखोल चिंतन
नाहीतर झाले पाहिजे नष्ट.
हे स्पष्टच झाले नाही का आता ?

पहिला नारीवृंद : कर, कर विचार !
आणि न्यायाला जागून, धर्माला स्मरून

वागव मित्रत्वाने आम्हाला.
पळवून लावले आमच्याच धरातून नास्तिकांनी आम्हाला,
नको देऊस या गृहहीनांना अंतर.
आरगॉसमधील सर्वशक्तिमान राजा,
अनेक देवांच्या या पवित्र अधिष्टानांतून
मला फरफटत नेऊ देऊ नकोस त्यांना.
जाणून घे या लोकांचा हेतू – या गर्विष्ठांचा दुष्टपणाच आहे तो
आणि सावध रहा झ्यूसच्या क्रोधापासून.
तुला शरण आलेल्या मला
भालावरील पट्ट्याला धरून
घोड्याला खेचावे तसे खेचीत –
न्यायाला ठोकरून या पवित्र प्रतिमांपासून
दूर खेचीत नेतील ते
पकडून आपल्या हातात माझा उंची तलम झगा.
करू नकोस मुळीही सहन ती त्यांची कृती.
लक्षात घे परिणाम होणार आहे.
तुझ्या निर्णयाचा तुझ्या मुलांवर, तुझ्या कुलावर,
मग तो असो आम्हाला अनुकूल किंवा प्रतिकूल.
आमच्याबाबत केलेली तुझी कोणतीही कृती –
बरी वा वाईट –
घडवणार आहे भवितव्य तुझ्या मुलांचे.
विचार कर नीट; हा आहे न्याय झ्यूसचा;
आणि राहायलाच हवे त्याचे वर्चस्व.

राजा : केला आहे मी नीट विचार,
आणि आता माझ्या मार्गात उभी ठाकली आहे ही धोंड
उभयपक्षी युद्ध आहे अनिवार्य;
दोरांनी घट्ट आवळलेल्या नौकेच्या सांगाड्यात
खिळा बसावा भक्कम तशी ठाम झाली आहे वस्तुस्थिती ही.
दिसत नाही कुठेही सुरक्षित, संकटमुक्त निवारा मला.
जहाजावरून फेकल्या जातात

मौल्यवान वस्तू समुद्रामध्ये वादळाच्या प्रसंगी
तेव्हा देईल संपत्तीत भर घालणारा कृपावंत झ्यूस
अधिक मौल्यवान वस्तू,
आणि भरून जाईल मालाने काठोकाठ
त्याहून मोठे जहाज.
जेव्हा अकाली सुटतात वाकबाण तेव्हा
शब्दांची जखम भरून येईल शब्दांनीच,
अपमानित जीवाचे सांत्वन करतील मोहन मंत्रोच्चार.
पण रक्तपात करणारी यादवी रोखण्यासाठी
द्यायला हव्यात आहुती प्रार्थना म्हणून.
अनेक देवांना द्यायला हवेत अनेक बळी शापनिवारणार्थ.
खरे तर मी उतरलो आहे ह्या कलहात
माझ्यावर विनाश ओढवून, घेण्यासाठी,
पण विनाशाचे भविष्य वर्तवण्यासाठी
मी पसंत करतो ज्ञानापेक्षा अज्ञानाचा आश्रय.
माझे सुदैव माझे हे भाकीत ठरवू दे असत्य.

पहिला नारीवृंद: खूपच बोलले मी तुझ्या दयाबुद्धीला आवाहन करायला.
पण आता शेवटचा म्हणून बोलते एकच शब्द.

राजा: इच्छा असेल तर बोलून टाक, ऐकतो आहे मी लक्षपूर्वक.

पहिला नारीवृंद: आहेत आमच्याकडे .
झग्यांवरती बांधायचे रेशमी कमरपट्टे आणि शेले.

राजा: काय सांगितलेस विशेष असे त्यात ?
सगळ्याच स्त्रियांच्या यथायोग्य पोषाखात असतातच ना ते ?

पहिला नारीवृंद: सांगते ते ऐक – पडतील ते आमच्या चांगलेच उपयोगी –

राजा: हे बघ स्पष्ट बोल,

काय सांगायला बघते आहेस तू ?

पहिला नारीवृंद : जर तू आम्हाला शपथपूर्वक मनापासून
दिले नाहीस आश्वासन तर–

राजा : ते ठीक – पण तुमच्या कमरपट्ट्यांचे काय ?
कशासाठी पडतील ते चांगलेच उपयोगी ?

पहिला नारीवृंद : ह्या प्रतिमांना भीषण अशा समर्पित अलंकारांनी सजवण्यासाठी

राजा : तू तर अजूनही बोलते आहेस कूटभाषा,
सांगून टाक स्पष्ट तुझ्या बोलायाचा अर्थ.

पहिला नारीवृंद : पवित्र पूजास्थानांवर फास लावून घ्यायला
उपयोगी पडतील ते आम्हाला.

राजा : फास लावून घ्यायला .....?
तो शब्द फटकारतोय् माझ्या काळजाला आसुडाप्रमाणे !

पहिला नारीवृंद : आता उघडले तुझे डोळे; घडवले तुला मी सत्यदर्शन !

राजा : होय !
दिसताहेत मला सर्वत्र दडपून टाकणारी अरिष्टे,
नदीच्या पुराप्रमाणे कोसळताहेत माझ्यावर
संकटांमागून संकटे.
सापडले आहे माझे जहाज,
जिथे विनाश दबा धरून बसला आहे.
त्या खवळलेल्या खोल समुद्रामधे.
दिसत नाही जवळपास सुरक्षित बंदर......
तुम्ही मागितलेले साहाय्य मी देऊ शकलो नाही तर –
अमर्याद प्रदूषण वेढून घेईल आम्हाला. –

अशी देताहात धमकी मला तुम्ही.
अथवा तुमच्या चुलतभावांशी – इजिप्तसच्या पुत्रांशी –
मी ठाकलो लढायला निर्भयपणे, आमच्या तटांपुढे
आणि जर दिली झुंज निर्णायक अशी
तर अखेरीस केवढी दुर्धर किंमत मोजावी लागेल आम्हाला.
येणार नाही का आक्षेप की –
'बायांखातर पुरुषांनी पृथ्वीला घातले रक्तस्नान' असा ?
तरीही भीती वाटते मला शरणार्थ्यांना संरक्षण देणाऱ्या झ्यूसच्या रागाची. –
बाळगायलाच हवी भीती सर्वांहून अधिक त्याच्या कोपाची !
जा, वृद्ध डॅनॅअस, जा लवकर,
ह्या तुझ्या कन्यांनी घेतल्या आहेत तशाच
शरणार्थ्यांच्या शाखा कवेत घेऊन.
स्थापन कर त्या आर्गाइव्ह देवतांच्या अन्य वेदींवरती
म्हणजे दिसेल साऱ्या नगरवासियांना
तुमच्या या विनवणीचा पुरावा.
मात्र बोलू नकोस चकारशब्दसुद्धा माझ्याविषयी –
शासनाचे दोष हुडकणे आवडते साऱ्याच नागरिकांना
कदाचित ही चिन्हे पाहून काहींना वाटेल करूणा,
येईल सात्त्विक कोप त्या उद्धट माणसांचा;
मग आरगॉस ओ देईल त्वरित तुमच्या मदतीच्या हाकेला.
दौबल्य जागवते औदार्याला प्रत्येक अंत:करणात.

डॅनॅअस : आम्हाला लाभला आहे.
आमच्याबद्दल आस्था बाळगणारा, देवांना भिणारा मित्र.
सर्वांत मोलाची गोष्ट आम्हाला वाटते ही.
पण पाठव तुझी काही आरगॉसवासी माणसे माझ्या रक्षणाला –
माझ्या मार्गदर्शनाला.
म्हणजे मला सापडतील तुमच्या देवांच्या वेदी
तुमच्या नगरीतील देवळांतल्या
तुमच्या किल्ल्याच्या तटांवरल्या.

आणि मी जाईन सुखरूप तुमच्या नगरीच्या पथांतून –
कारण माझा वेष, माझे रूप सुचवताहेत माझे विदेशीपण.
इनाकस''च्या वंशाहून भिन्न अशा वंशाला
वाढवीत असते नाईलनदी.
सावधगिरी बाळगणे सर्वांत उत्तम,
अविचारी साहसाने उद्‌भवते भयावह परिस्थिती क्षणातच.
यापूर्वी ठार केले आहे माणसांनी अज्ञानापोटी
आपल्याच मित्रांना,

राजा : चांगला आहे सल्ला. जा रे सैनिकांनो
त्याच्याबरोबर,
घेऊन जा त्याला नगरीतील देवालयांकडे
आणि पवित्र पूजा स्थानांकडे.
पथांवर, चौकांत राहू नका उभे बोलत या खलाशांबद्दल
ज्याला शरणार्थी म्हणून फिरवणार आहा तुम्ही
देवळा देवळातून.
( राजाच्या काही शरीरसंरक्षकांसमवेत डॅनॅअस आर्गॅसिच्या दिशेने जातो. )

पहिला नारीवृंद : आमच्या पित्याला सांगितले तू काय करायचे ते,
जाऊ दे त्याला; पण आम्ही आता काय करावे ?
कसा धीर देणार आहेस आम्हाला तू?

राजा : आपल्या मागण्या दर्शवण्यासाठी
ठेवून द्या तुमच्या शाखा देवांसमोर.

पहिला नारीवृंद : हे पहा, केले तुझ्या आज्ञेप्रमाणे

राजा : आता चला या इकडे सपाटीवरील राईकडे.

पहिला नारीवृंद : ही सार्वजनिक राई कसा देणार आम्हाला आश्रय ?

राजा : फेकणार नाही मी तुम्हाला बळी म्हणून गिधाडांपुढे

पहिला नारीवृंद: मग काय करणार? देणार का आमचे बळी
विषारी सर्पांहून निष्ठुर अशा नराधमांना ?

राजा: बोललो आहे मी तुमच्याशी दयार्द्र शब्दात;
तुम्हीही उच्चारा सौजन्यशील शब्द.

पहिला नारीवृंद: धास्तीपोटी जन्मते औद्धत्य – याचे वाटते का तुला आश्चर्य ?

राजा: धास्तीवर मात केली पाहिजे नृपतीबद्दलच्या आदरभावाने.

पहिला नारीवृंद: तर मग हे नृपते, धीर दे आम्हाला आणि सहाय्य कर
शब्दांनी तसेच कृतींनीही.

राजा: खात्री बाळगा,
तुमचा पिता तुमच्यापासून दूर राहाणार नाही दीर्घकाळ.
दरम्यान मी जातो माझ्या साऱ्याच प्रजाजनांना
एकत्रित करायला,
म्हणजे मग करू शकेन निर्माण तुमच्याबद्दल स्नेहभाव
आर्गॅसिच्या मनात.
तुमच्या पित्यालाही सांगेन
त्याने कशा तऱ्हेने बोलणे उत्तम ठरेल ते.
थांबा इथेच तुम्ही,
आमच्या देशाच्या देवतांना विनवा
पूर्ण करायला तुमच्या मन:कामना.
जातो मी आता मी म्हटले तशी सर्व व्यवस्था करायला.
देव करो. आणि मिळो माझ्या शब्दांना यश
त्यांचे मन वळवण्यात आणि नंतरच्या कार्यात.

( राजा पेलॅस्गस आणि त्याचे शरीररक्षक जातात. )

## शरणार्थी

पहिला नारीवृंद: ज्यूसदेवा, पुण्यश्लोक श्रेष्ठा,
सर्वसत्ताधीशांहून अधिक सत्ता गाजवणाऱ्या राजाधि राजा
अखंड आनंदमग्न ज्यूसदेवा!
आमची प्रार्थना ऐक,
यश दे आम्हाला जनमन वळवण्याच्या आणि नंतरच्या कार्यात.
ज्याच्याबद्दल वाटतो तुला तिरस्कार
ती पुरूषी उद्धटपणा टाक समूळ उखडून
आमचा पाठलाग करणाऱ्या क्रोधीपिशाच्चाला
त्याच्या कृष्णवर्णी खलाशांसकट
खोल बुडवून टाक जांभळ्या समुद्राच्या वावळकुंडात.
पण दयार्द्र दृष्टी वळव आमच्या प्राचीनकुलावर –
आम्हां स्त्रीजातीवर.
स्मरून पुराणी कोमल प्रीतिकहाणी
तुझ्या प्रेयसीची – आम्हा सर्वांच्या मातेची.
आठव सारे, सारे –
तूच हस्तस्पर्श केला होतास आयोला !
ज्यूसदेवा, तू आमचा निर्माता, आमचा जनक.
असा आहे दावा आमचा,
जसा आहे दावा आमचा की
आरगॉस आहे आमचे पुरातन गृह म्हणून.

इजिप्त सोडून आले आहे मी इथे –
हया कुरणांमधे , जेथे फारपूर्वी माझी आई
उभी ठाकली होती.
फुलांफुलांमधून चरत, करड्या नजरेखाली.
गोमाशीच्या हल्ल्याने वेडीपिशी झालेली आयो
धूम पळत सुटली याच जागेवरून,
आणि मानवांच्या अनेक जमातीतून भटकत, भटकत
युरोप व आशिया मधील समुद्रलाटांवरून
आपला मार्ग कापीत पाहिली तिने
दोन्ही बाजूंचे शेजारी भूमीखंडे.

तिथून ती पळाली पुढे आशियाच्या भूमीवरून
फ्रिजिय"'मधील मेंढरांच्या कुरणाकुरणांतून पार होत
ती पोचली मिशिअनां"च्या ट्यूथ्रस" राजाच्या नगरीत,
मग ती चढली लिडिआच्या दऱ्यांवर
आणि नंतर सिलिसिआ"च्या आणि
पॅम्फिलिआच्या टेकड्यांवरून
धावत सुटली ती पुढे पुढे, सतत पोचेपर्यंत
गव्हाच्या शेतांनी समृद्ध असलेल्या,
विपुल पाण्याच्या नद्या आणि सुपीक भूमी यांसाठी
प्रसिद्ध असलेल्या भूमीला ॲफ्रोडायटी"च्या.
तिला हाकलत राहाणाऱ्या त्या पंखधारी गोमाशीच्या दंशाने
वेडीपिशी होऊन गरगर फिरत
येऊन पोचली ती इजिप्तच्या सुपीक भूमीत-झ्यूसच्या उद्यानात.
वितळणाऱ्या हिमावर पोसल्या जाणाऱ्या,
आणि चक्री वादळाने झोडपल्या जाणाऱ्या कुरणांमधे,
रोगजंतूंचा नाश करणाऱ्या जलाच्या नाईलजवळ पोचली ती;
आणि मग हीराच्या क्लेशकारक पराणीने
क्षुब्ध बनलेली ती
थकून आणि शरमून झाली वेडीपिशी.

दिसताच हे दृश्य अश्रुतपूर्व आणि अस्वाभाविक
थरकाप उडाला इजिप्तमधील त्या वेळच्या
रहिवाशांच्या काळजांचा;
पांढरे फटक पडले ते भीतीने
त्यांनी पाहिला तो प्राणी — मानव तसाच पशूही असलेला.
अंशत: स्त्री, अंशत: गाय असा अद्‌भुत प्राणी.
आणि झाले अवाक् ते सगळे.
आणि नंतर — नंतर कोणी केले तिचे सांत्वन ?
कोणाला आली करूणा तिच्या प्रदीर्घ भटकंतीच्या क्लेशांची?
— गोलचकरा मारीत माशीने दंशिलेल्या त्या
वेदनापीडित आयोची ?

## शरणार्थी

अमर्याद एकछत्री सत्ता गाजवणाऱ्या झ्यूसला आली करूणा
वत्सल सामर्थ्याने झ्यूसने तिच्यावर सोडला देवांश श्वास
आणि मिळवून दिले तिला विश्रांतिसुख,
मग गाळले तिने अश्रू विश्रांती अनुभवीत
आणि दिली वाट करून अवघ्या दुःखांना, अपमानांना.
ग्रहण केले तिने स्वशरीरात
झ्यूसचे वीर्य — जणू बहुमोल माल गुणी गलबतावरचा
(किती योग्य वर्णन!) आणि दिला जन्म एका निष्कलंक अपत्याला.

त्या तिच्या मुलाला प्राप्त झाले दीर्घायुष्य
आणि सर्व तऱ्हेची समृद्धी.
म्हणूनच उच्चस्वरात सांगते सगळी जीवनदात्री इजिप्तभूमी
—'निश्चितच आहे ही झ्यूसची संतती,
कारण हीराच्या कपटामुळे जडलेले पिसे
कोण नष्ट करू शकले असते झ्यूसशिवाय ?
झ्यूसच्या हस्तातच आहे सामर्थ्य या रोगनिवारणाचे.
हे मूल आहे झ्यूसचे बीज —
एवढे म्हणा म्हणजे सत्याप्रत पोचेल तुमचा अंदाज.'

आमचे हे कार्य करण्याचा निर्विवाद अधिकार कोणत्या देवाला
असावा?
त्यासाठी कोणत्या देवाचा धावा करणे होईल उचित ?
देवाच्या राजा, तू आहेस आमचा पिता.
तुझ्याच हातांनी लावलास तू आमचा वंशवृक्ष.
करू दे याची आठवण तुझे अंतःकरण आता.
हे थोर निर्मात्या सुखदात्या,
परमश्रेष्ठ पुण्यश्लोक देवा !
स्वसिंहासनस्थ असा तू मानीत नाहीस
कोणाही वरिष्ठांची आज्ञा.
तू नाहीच आहेस कनिष्ठ श्रेणीचा सत्ताधारी
नियुक्त केलेला कोणा राजाधिराजाने.

तू झुकत नाहीस तुझ्याहून उच्चपदावर असलेल्या
कोणाच्या लहरीपुढे.
आपल्या मनोगर्भातले सारे काही हेतू
तू त्वरित घालतोस जन्माला
आणि करतोस कृतार्थ स्वसामर्थ्यांने.
तू कोणतीही गोष्ट उच्चारायचाच अवकाश –
तत्क्षणीच येते तिला मूर्तस्वरूप.
(पुन्हा डॅनॅअस प्रवेश करतो. )

**डॅनॅअस :** आनंदाची वार्ता, माझ्या मुलींनो !
आरगॉसच्या भरगच्च सभेत घेतले गेले आहेत
आम्हाला अनुकूल असे ठाम निर्णय.

**पहिला नारीवृंद:** तात, स्वागत असो तुमचे,
कोठलाही दूत इतका प्रिय वाटला नव्हता कधीही आम्हाला!
आधी एक गोष्ट सांगा आम्हाला-
काय म्हणतो आहे त्यांचा निर्णय ?
मताधिक्याने दिला गेला आहे कोणत्या कृतीचा आदेश ?

**डॅनॅअस :** आरगॉसच्या नागरिकांनी निश्चित केले आहे
अगदी वाद घातल्याशिवाय अगदी स्पष्टपणे
एकमताने ठरवले आहे.
त्यामुळे पुन्हा तरुण झाले आहे माझे वृद्ध हृदय.
काय सांगू दाटी झाली होती वातावरणात
अगदी सगळ्या नगरीतील उजव्या हातांची.
त्यांनी घेतला तो निर्णय असा–
आम्ही राहायचे आहे, आरगॉसमधे
स्वायत्त, निर्बाधित असे नागरिक म्हणून;
वचन दिले आहे त्यांनी आम्हाला
मानवी द्वेषापासून सुरक्षित ठेवण्याचे.
हात लावणार नाही आम्हाला

## शरणार्थी

आरगॉसचा अथवा कोणत्याही विदेशाचा नागरिक,
आमच्याविरुद्ध आमच्या शत्रूंनी जर केला बळाचा वापर
आणि नागरिक असूनही जर कुणी झाला नाही पुढे
मदत करायला आम्हाला,
तर तो गमावून बसेल नागरिकत्वाचे हक्क आणि
होईल हद्दपार.
किती प्रभावी वक्तृत्व केले राजा पेलॅसासने आमच्या बाजूने !
बजावले त्याने आपल्या प्रजाजनांना—
यापुढे कधीही चेतवू नका शरणार्थ्यांच्या देवाची सूडभावना
पाहुणे आणि नागरिक या नात्यांनी
त्यांचा आहे दुहेरी हक्क आपल्यावर.
जर आपण अव्हेरले यांना
तर उठेल आपणास भेडवण्यास
दुहेरी पापोद्भव कलंक
विनाशावर ताव मारणाऱ्या हावऱ्या पिशाच्चासारखा.'
या शब्दांसरशी उतावळ्या अधीरतेने आरगॉसच्या नागरिकांनी
हात उंचावून घेतला निर्णय मी मघा सांगितला तसा.
वक्तृत्वकलेतील सारे चतुर बारकावे
आणि मन जिंकण्याच्या खुब्या वापरल्या राजाने
अशी केली यशस्वी अखेर झ्यूसदेवाने या प्रकरणाची.

पहिला नारीवृंद : या,या, आपण करु या प्रार्थना आता
आरगॉसच्या नागरिकांसाठी;
आमच्यावर त्यांनी केलेल्या उपकारांची
करुया फेड या प्रकारे
त्यांच्या शुभासाठी देवांना आळवून.
परकीय अभ्यागतांचा मित्र झ्यूसदेव
पाहो कृपादृष्टीने आणि करो सफल
आम्ही कृतज्ञ विदेशीयांनी आपल्या यजमानांसाठी
त्याला घातलेले साकडे.
त्यायोगे आमच्या शब्दांना प्राप्त होईल त्यांचे इप्सित साध्य.

स्वर्गात जन्म घेतलेल्या देवांनो, ऐका माझा आवाज आता,
प्रार्थनांची अर्घ्ये मी अर्पिते आहे तुम्हाला,
उठू देऊ नका कधीही भक्षक अग्निज्वाला
या पेलॅस्गिअनांच्या नगरीत.
कापून नेतो जो इतरांनी पेरलेले मानवी शेत
त्या युद्धपिपासू एरीजला इथे करु देऊ नका
भेसूर गोंगाट.
कारण आमची दया येऊन आरगॉसच्या नागरिकांनी दिली आहेत मते
आम्हाला अनुकूल अशी.
करतात ते आदर झ्यूसला शरण गेलेल्या जनांचा –
आमच्या या दुःखी, दयनीय चमूचा.
नाही दिली त्यांनी साथ आपल्या मतप्रदर्शनात
स्त्रियांची इप्सिते लाथाडणाऱ्या पुरुषांना.
त्यांनी जाणीव ठेवली झ्यूसच्या क्रोधाची –
जो शांत होतो सूड उगवूनच,
ज्याच्याशी झुंज घेऊ शकत नाही कुणीही,
संकटाचा भार घेऊन भेटीस येणाऱ्या,
छपराला अमंगळ करणाऱ्या
अशुभसूचक पक्ष्यासारख्या
तो कुठल्याही कुटुंबाला नकोसाच वाटतो.
आरगॉसचे नागरिक मान ठेवतात रक्ताच्या बंधनाचा
आणि झ्यूसच्या पवित्र मंदिरातील शरणार्थ्यांचा.
म्हणूनच राहतील त्यांची स्थंडिले निर्मळ
आणि स्वीकारतील देव आनंदाने त्यांनी दिलेल्या आहुती.
ह्या पल्लवमालांनी पवित्र झालेल्या माझ्या ओठातून
त्वरित उच्चारली जावो तळमळीची प्रार्थना.
भयानक रोगराई न घेवो बळी आरगॉसच्या नागरिकांचे.
न होवो आरगॉसची भूमी कलंकित
यादवी युद्धात तिच्या नागरिकांनी परस्परांचे रक्त सांडून.
या भूमीच्या तरुणांचे यौवनपुष्प
फुलत राहो, खुडले न जाता.

## शरणार्थी

ॲफ्रोडायटीचा प्रियकर मानवसंहारक एरीज[४८]
त्यांच्या यौवनाचा ऐन बहर संपुष्टात न आणो.

मंत्रणासभेतील वृद्धांची आसने शोभविली जावोत.
लांब दाढी वक्षावर रुळत असलेल्या वंद्य वृद्धांकडून;
आणि मग सुव्यवस्थित चालो त्यांची राज्ययंत्रणा
जोवर ते योग्य मान राखतील झ्यूसचा–
जो आहे विशेषकरुन परकीय अभ्यागतांचा स्वामी आणि
जो करतो सत्पक्ष प्रस्थापित
अतिप्राचीन न्याय नियमान्वये

करतो आम्ही प्रार्थना
सुफलित होवोत भूमीची विविध धनधान्ये निर्विघ्नपणे
नवप्रसवांवर शरसंधान करणारी[४९] आर्टेमिस
कृपा करो प्रसूतिसमयी त्यांच्या स्त्रियांवर.

अश्रूंचा जनक असलेल्या एरीजच्या हातात
तलवार देण्यासाठी,
यादवी युद्धाच्या कोलाहलाने
नृत्य आणि संगीत यांना हुसकावून लावण्यासाठी,
आणि ह्या नगरीचे लचके तोडण्यासाठी
कधीही इकडे न फिरकोत हिंसा, लुटालूट या आधी
आरगॉसवासियांच्या घराघरापासून दूर करोत वसती
व्याधींच्या त्या दुःखदायक झुंडी.
आणि ॲपॉलो देवाची दयार्द्रदृष्टी
राहो त्यांच्या साऱ्या तरुणांवर.

झ्यूसदेव करो त्यांची भूमी सुपीक,
म्हणजे फेडील ती बदलत्या ऋतुचक्रानुसार
आपले वाजवी ऋण
फळफळावळ आणि धनधान्य यांचे.

कुरणांमधून चरणारी त्यांची खिल्लारे
जन्म देवोत विपुल पाडसांना.
देवांच्या वरदानाने
लोकांची होवो समृद्धी सर्व क्षेत्रांत.
देवांच्या वेदींसमोर गावोत गायक श्रद्धापूर्वक
निरागस ओठांतून उठू दे आवाज
तंतुवाद्यांशी मिलाप साधून.

यंत्रणामंडळाचे आजीव सदस्य नजर राखोत
दूरदृष्टीने आणि विचारपूर्वक त्या शासकांवर
ज्यांची चालते सत्ता अवघ्या राज्यांवर.
तलवारी उपसल्या जाण्याआधी आणि दुर्घटना घडण्याआधीच
यंत्रणा मंडळाने घ्यावी दाद.
नगरीतील परकीय अभ्यागतांच्या न्याय्य गाऱ्हाण्यांची
आणि करावी योग्य कार्यवाही झालेल्या करारांची.

स्वदेश रक्षिणाऱ्या देवांचा राखावा त्यांनी निरंतर मान
आपल्याच भूमीवर आपल्याच पूर्वजांपासून
शिकून घेतलेल्या धर्मविधींनी,
लॉरेलच्या शाखा धारण करुन आणि
वृषभांचे बळी देऊन.
कारण मान राखला पाहिजे जिचा सर्वांनी, त्या न्यायदेवतेच्या कायद्यांमधे
मातापित्यांचा आदर करण्याच्या
कर्तव्याच्या कायद्याचा क्रमांक आहे तिसरा.

डॅनॅअस : प्रिय बाळांनो,
आवडल्या मला तुम्ही केलेल्या सूज्ञ, श्रद्धापूर्ण प्रार्थना.
आता काय सांगतो ते ऐका—

नका भीतीने थरथरु ऐकताच माझ्याकडून

## शरणार्थी

अनपेक्षित आणि अप्रिय अशी वार्ता,
शरणार्थ्यांच्या ह्या आसनावरुन
माझ्या ह्या टेहळणीच्या जागेवरुन
दिसते आहे मला एक जहाज !
त्या जहाजाची डोलकाठी, शिडे आणि
त्याच्या बाजूंना लावलेले कातड्यांचे पडदे –
नि:संशय आहे ते इजिप्तचेच जहाज.
पुढचा मार्ग निरखणाऱ्या डोळ्यांसह
सरकते आहे नाळ अगदी व्यवस्थित रीतीने
वरामावरील मार्गदर्शक सुकाणूच्या आशेत.
आम्हा बळींना अप्रिय भासणाऱ्या रीतीने.
अरे ! ती पहा ! दिसताहेत मला जहाजावर माणसे –
उठून दिसताहेत त्यांची काळी शरीरे त्यांच्या पांढऱ्या कपड्यांमुळे ;
आता आली इतर जहाजेही पूर्ण टप्प्यात दृष्टीच्या–
आणि आता तर सगळाच जहाजांचा तांडा.
नेतृत्व करणारे जहाज
भूमीच्या अगदी समीप येऊन
गुंडाळून शिडे
येत आहे झपाट्याने किनाऱ्याकडे वल्हयांच्या मदतीने.
चला तर मग आणि हे बघा
तुम्ही वागायला हवे धीमेपणाने, विचारपूर्वक;
तोंड द्या आल्या प्रसंगाला एकाग्रचित्त करुन, या देवांवर.
मी जातो मदतीसाठी, आणतो सैनिकांना
आमच्या अंगीकृत कार्याच्या समर्थनार्थ झुंजण्यासाठी.
कदाचित एखादा अग्रदूत अथवा त्या माणसाचे हस्तक..
आपली मालमत्ता समजून तुमच्यावर हात टाकण्याचा प्रयत्न..
नका बाळगू त्यांची भीती.
तरीही लक्षात ठेवणे उत्तम की –
जर विलंब झाला आमच्या सैनिकांना
मदतीसाठी येण्यास तर ..
विसरु नका कधीही इथे मिळू शकणारे संरक्षण;

धीर धरा !
देवांना न जुमानणाऱ्या प्रत्येक पातक्याचा न्याय
करतील योग्य काळ आणि हिशेब चुकवण्याचा दिवस.
तात, भयभीत झाले आहे मी !
किती वेगाने आली आहेत त्यांची जहाजे
आम्हाला पकडण्यासाठी
आता एका क्षणातच गाठतील ते आम्हाला
थरकाप उडाला आहे माझा भीतीने
घरापासून इतक्या दूरवर पळून आल्याने
काय झाला लाभ खरोखर ?
तात, शुद्धबुद्ध हरपते आहे माझी !

**डॅनॅअस:** बाळे, आगरगॉसच्या लोकांनी
केले आहे शिक्कामोर्तब आपल्या ठाम निर्णयावर.
तर मग धर हिम्मत,
खात्री आहे मला लढतीलच ते तुमच्याखातर.

**पहिला नारीवृंद :** इजिप्टसचे पुत्र बनले आहेत पिसाट, विवेकशून्यतेने
आणि विषयलालसेने हपापलेले आहेत लढाईसाठी.
मी सत्यच बोलते आहे ते तुम्ही चांगले जाणता.
त्यांच्या जहाजांचे लाकूड आहे भरभक्कम,
त्यांच्या नाळी आहेत चकाकत्या धातूच्या,
ते निघाले आहेत आमच्या शोधाला आणि
त्यांच्या पाठीशी आहेत हजारो कृष्णवर्णी माणसे.

**डॅनॅअस:** आणि त्यांना तोंड द्यावे लागेल.
बलशाली बाहूंच्या सडपातळ शरीरयष्टीच्या
हजारो सैनिकांशी—
ज्यांचे स्नायू झाले आहेत दणकट दुपारची उन्हे खाऊन.

**पहिला नारीवृंद :** तात, गुडघे टेकते तुमच्यासमोर,

नका सोडून जाऊ मला एकटीला.
कुठून असणार बाईमाणसाच्या अंगी धैर्य ?
काय करणार ती एकटी ?
आणि या माणसांना ठाऊक ही नाही विवेक,
ते आहेत माथेफिरु, पाखंडी–
उकिरड्यावरच्या अभक्ष्यावर
उपजीविका करणाऱ्या पक्ष्यांसारखे
त्यांनाही वेदीबद्दल नाही काही पूज्यभाव

डॅनॅअस: बाळांनो, तुमच्या वैराचे सकारण लक्ष्य झालेले ते
जर झाले देवांच्या वैराचेही सकारण लक्ष्य,
तर आहे त्यात तुमचाच फायदा.

पहिला नारीवृंद : वाटते का तुम्हाला की
देवांच्या, त्रिशूळांच्या आणि वज्रपातांच्या भीतीने
घेतील ते मागे आमच्यावर हल्ला करणारे हात ?
मी सांगते तुम्हाला नाही घडणार असे.
ते आहेत उद्धट, विषयासक्त,
उन्मादाच्या जोरात तत्काळ हात उगारणारे,
शिकारी कुत्र्यांसारखे निधड्या छातीचे
आणि देवांची कुचेष्टा करुन
त्यांना निष्क्रिय बनवण्यात तत्पर असे.

डॅनॅअस: अशी आहे लोकोक्ती की
'लांडग्यांना असते ताकद शिकारी कुत्र्यांच्या तिपटीने'
बिब्ब्याची बोंडे[१४] नाही करु शकत स्पर्धा गव्हाच्या लोंब्यांशी.

पहिला नारीवृंद : त्यांची वृत्तीच आहे केवळ उन्मत्त, बेबंद पशूंची
रक्षण करायला हवे आम्हालाच आमचे–
चालणार नाही आता विलंब करुन.

डॅनॅअस : वेळ लागतो जहाजांच्या तांड्यास
सागरपृष्ठी मार्गस्थ होण्यास
आणि तसाच वेळ लागतो किनाऱ्याशी स्थिर होण्यास.
नांगर टाकले तरीही करीत नाही कोणताही कप्तान
फाजील घाई
जहाजांच्या कुशीतील दोरखंडे किनाऱ्यावर आवळण्याची–
बंदर नसलेल्या किनाऱ्याला –
ते देखील रात्र पडत असताना–
वळवावे लागते जहाज अगदी काळजीपूर्वक –
मेंढपाळ मेंढरे वळवतो तसा.
सूर्यास्त होऊन रात्र पडू लागली कुशल सुकाणूधारकही घामाघूम होतो–
जसा काही प्रसववेदनांनी व्यथितच.
जहाचे व्यवस्थित नांगरली गेल्यावाचून सैन्याला
नाही उतरता येत सुरक्षितरीतीने किनाऱ्यावर.
म्हणून वागा सूज्ञपणाने
आणि देवांवर एकाग्रचित्त करुन मिळवा त्यांचे सहाय्य.
मीही करीत विनवणी तुमच्यासाठी
आवाज वृद्ध असला तरीही असेल
शब्दांमधे यौवनाचा जोम.
करील प्रशंसा तुमच्या दूताची आरगॉसची जनता.

( डॅनॅअस जातो )

पहिला नारीवृंद : पर्वतमय प्रदेशा,
ज्याचे राजघराणे करते आहे आमचे रक्षण
आमचे आता होणार तरी काय ?
कुठे पळून जायचे आम्ही ?
कोठली अंधारी गुहा लपवून ठेवील आम्हाला ?
वाटते, श्यामल धुराप्रमाणे वर चढत जाता यावे
झ्यूसच्या तेजस्वी मेघांसन्निध.
नाहीतर अदृश्य बनून, पंखांशिवाय उड्डाण करीत

## शरणार्थी

नाहीसे व्हावे– हरवून जावे धूलिकणांसारखे.
पण निरर्थक आहे पलायन,
यापुढे सुटका होणे नाही आमची !
थरथर कापते आहे माझे निराशेने काळवंडलेले
भयभीत हृदय.
माझ्या पित्याच्या मागावर असलेल्या शिकाऱ्याने
शेवटी गाठले माझेच सावज.
आहे मी अर्धमेली झाले भीतीने,
पत्करेल मला स्वीकारणे माझे भवितव्य
आवळलेल्या फासात.
पण नाही देणार मी माझे शरीर घृणास्पद पुरुषाला.
त्याआधीच कवटाळू दे मला मृत्यू.

जिथे इतस्तत: विहरणारे पावसाळी मेघ हिम बनतात.
त्या निळ्या आकाशात मला आसरा मिळेल तर
किती छान होईल !
किंवा एखाद्या उंच निमुळत्या पर्वतशिखरावर
जिथे बकऱ्यांनाही चढता येत नाही त्या ठिकाणी
मिळावी जागा मला, दृष्टीच्या टप्प्यापलीकडील
एकाकी अशी.
गिधाडे जिथे घिरट्या घालतात असा
घेरी आणणारा कडा साक्षीला असावा,
मी खोल गर्तेत उडी घेताना
माझ्यावर लादलेले मला अंत:करणापासून नको असलेले
लग्न टाळण्यासाठी.
ताव मारतील मग माझ्या मृत शरीरावर रानटी कुत्रे,
पुष्ट होतील दरीतील गिधाडे, त्यांचे समाधान वाटेल मला !
कारण मृतदेह असतो मुक्त
वेदना आणि अश्रू यांपासून.
मृत्यूने धरावा चांगला नेम
आणि ताब्यात घ्यावी आपली शिकार,

शय्या आणि आलिंगन यांचे मी भक्ष्य होण्यापूर्वी.
मुक्त होण्यासाठी कुठे घेऊ मी धाव ?
कुठे जाऊ या शरीराचे बंधन झुगारुन देण्यासाठी ?
स्वर्गाला भिडतील अशा उच्च स्वरात घाला हाक
करा प्रार्थना संकट मुक्तीसाठी–
समर्पण द्रव्येच आहेत ही–
देव देवोत तिकडे ध्यान आणि अनुकूल प्रतिसाद.
हे तात, झ्यूस देवा, पहा हा लढा.
न्याय वसतो तुझ्या दृष्टीने,
देऊ नकोस उत्तेजन हिंसाचाराला,
हे पृथ्वीच्या स्वामी, सर्वशक्तिमान झ्यूस देवा !
दया कर तुला शरण आलेल्या आम्हांवर;
ईजिप्टसचे पुत्र करताहेत आमचा पाठलाग;
धावताहेत आम्हाला गाठण्यासाठी युद्धगर्जना करीत
पाठलाग करणाऱ्या पुरुषांच्या नेहमीच्या
पाशवी मग्रूरीने,
आम्हाला जबरदस्तीने पकडण्यासाठी.
झ्यूसदेवा, केवळ तुझ्याच हाती आहे
न्यायाच्या तराजूची दांडी;
तुझ्याशिवाय सिद्धीस जात नाही कोणतीही गोष्ट.

पहा पहा इकडेच येताहेत ते चाचे !
कशाला आलात तुम्ही किनाऱ्यावर ?
काय हवे आहे तुम्हाला ?
( इजिप्तचा अग्रदूत अनेक सशस्त्र सैनिकांसह प्रवेश करतो )
धावा धावा ! आम्हाला हवी आहे मदत !
मदतीसाठी साद घालतो आहोत आम्ही !
हं ! आताच कुठे सुरुवात होते आहे,
नांदीच आहे ही आमच्या गुलामगिरीची –
आमच्या यातनांची !
( इजिप्तचे सैनिक पुढे सरसावतात, त्याबरोबर डॅनॅअसच्या कन्या

प्रतिमांकडे धाव घेतात )
वाचवा, वाचवा आम्हाला !
मदतीसाठी धाव घ्या देवांकडे
पेलॅस्गस राजा,
या रानटी आणि विषयी माणसांना शिक्षा कर नष्ट कर.
( मूर्ती पाहताच सैनिक प्रथम जरा थबकतात )

अग्रदूत : व्हा लवकर पुढे, चला जहाजांकडे,
चला, चला त्वरित चढा जहाजांवरती !
पाय उचला अगदी शक्य तेवढ्या वेगाने.
जर असे करण्याचे नाकारलेत तर—
झिंज्या उपटून काढू तुमच्या; भोसकू खंजिरांनी तुम्हाला
अगदी तुम्ही रक्ताने न्हाऊन निथळून निघेपर्यंत
जिकडे तिकडे रक्तच रक्त होईपर्यंत
मग उडवून टाकू मुंडकी तुमची.
चला, चला, महामारी पडो तुमच्यावर,
जाऊ द्यात तुमच्या धिंडका जहाजांवर !

पहिला नारीवृंद : तुम्ही इकडे येत असतानाच
तुम्हाला आणि तुमच्या उन्मत्त जुलमी धन्यांना,
आणि तुमच्या पितळी पट्ट्यांनी सांधलेल्या जहाजाला,
खाऱ्या समुद्राच्या प्रचंड लोटाने गिळंकृत केले असते तर
किती छान झाले असते— अगदी माझ्या मनासारखे !
आणि मग राहिलो असतो आम्ही सुखात
राहिलो असतो सुरक्षित विटंबनेपासून.
विनवते तुम्हाला— सोडून द्या हिंसाचार,
सोडून द्या हे माथेफिरूपणाचे कृत्य;
चला निघा, बाहेर व्हा या मंदिरामधून.
जा परत आपापल्या जहाजांवर,
आणि ठेवा मान आरगॉस नगरीचा.

पुन्हा कधीही दिसायला नको मला ती नाईल नदी–
तो भूमी सुपीक करणारा प्रवाह–
इजिप्तच्या लोकांच्या जोमदार धमन्यातील
उसळत्या रक्ताला पोसणारी नाईल नदी !
आम्ही आहोत आर्गाइव्हांच्या कुलातील –
एका प्राचीन वंशातील - प्रत्यक्ष राजकुलातील
एका राणीच्याच - वंशज आम्ही!

अग्रदूत : चालू दे चालू दे बडबड हवी तितकी!
पण चढावेच लागेल जहाजात तुम्हाला,
मग असो तुमची इच्छा किंवा नसो.

पहिला नारीवृंद : आरगॉसच्या नागरिकांनो,
धावा लवकर, चला या आमच्या मदतीला

अग्रदूत : तुम्हीच चला, व्हा पुढे, नाहीतर पस्तावाल -
जेव्हा अंगावर हात टाकून नेईन तुम्हाला फरफटत.

पहिला नारीवृंद : ह्या वादळी समुद्रावरुन फरफटत
नेले जावो तुलाच आणि तुझ्या ह्या दुष्ट हातांना,
सिरिआच्या वादळाने न्यावे हाकलत तुम्हाला
वालूकामय किनाऱ्यावर सार्पेडॉन''च्या थडग्याशी.

अग्रदूत : हं! चालू दे -
किंचाळा, ओरडा, आक्रोश करा देवांच्या नावाने.
इजिप्तच्या जहाजाशी असा धरसोडीचा खेळ
खेळता येणार नाही तुम्हाला.
चालू द्या आक्रोश करा आरडा ओरडा आणखी जोराने,
याहूनही जास्त दयनीय सूर काढता येत नाहीत का तुम्हाला ?

पहिला नारीवृंद : (रडत,रडत) वृक्षाच्छादित अशा सायप्रसच्या टोकाला

तुम्ही वळसा घालत असताना
गिळून टाकू दे तुम्हाला समुद्र
दुष्टपणा करण्यासाठी तुम्हाला इकडे पाठवणाऱ्या
जबरदस्त नाइलनदीकडून
नोंद होवो तुमचा दुष्टपणा निष्फळ होऊन निमाल्याची.

अग्रदूत : आमच्या जहाजांची नाळ फिरवलेली आहे समुद्राच्या दिशेला
पुन्हा सांगतो अधिकवेळ न गमावता चढा जहाजांवर
झिंज्या धरुन फरफटत नेणे
हा काही खेळ नव्हे सौम्यपणात जमा होणारा.

पहिला नारीवृंद : तात, अहो तात,
मानवी स्वरुपातला हा सैतान
आपल्या भक्ष्यावर टपलेल्या कोळयाप्रमाणे
आपले जाळे विणतो आहे मला पकडण्यासाठी
स्वप्नातल्यासारखा प्रकार आहे हा, हे पृथ्वी माते,
भूमीमाते ग, धाव मदतीला,
हे भूमाते, हे झ्यूसपित्या,
नाहीसे करुन टाक हे भयंकर दु:स्वप्न!

अग्रदूत : मला नाही भीती वाटत तुमच्या ह्या देवांची
त्यांचे कसलेच ऋण लागत नाही मी--
ना जन्माचे ना जीवनक्रमाचे.

पहिला नारीवृंद : वाचवा, वाचवा मला
माझ्यावर चालून येणाऱ्या ह्या मानवरुपी घातक प्राण्यापासून
माझ्या पायाला विळखा घातलेल्या
ह्या शुध्द सापापासून.
दूर हो जनावरा! धाव सहाय्याला भूमाते! पृथ्वीमाते, धाव
बचाव कर माझा ह्या भयंकर पशूच्यापकडीतून
अगे पृथ्वीमाते! धावरे तात झ्यूसदेवा!

**अग्रदूत :** तरमग सांगतो ते ऐका मुकाट्याने
आणि चढा बघू जहाजांवर.
नाहीतर माझ्यासारखा वाईट नाही कुणी!
फाडून फेडून टाकीन तुमची तलम ऐटबाज वस्त्रे.

हे आरगॉसच्या राज्यकर्त्यांनो आणि नेत्यांनो,
धावा मदतीला
पळवून नेताहेत बघा हे आम्हा सर्वांना!

**पहिला नारीवृंद :** मिळतील लवकरच तुम्हाला पुरेसे राज्यकर्ते,
चालवतील सत्ता तुमच्यावर इजिप्टसचे पुत्र !
मग हाकारणार नाही तुम्ही राज्यकर्त्यांना!
अगदी खात्री बाळगा!

**अग्रदूत :** हाय! पराभूत झालो आम्ही!
( इजिप्तचे सैनिक डॅनॅअसच्या कन्यांना पकडून फरफटत नेऊ लागतात. एकाएकी पेलॅस्गस राजा सशस्त्र शरीररक्षकांसह येत असताना दिसू लागतो. तो अजून दूरवर असतानाच डॅनॅअसच्या कन्या त्याला हाक घालतात. )

**पहिला नारीवृंद :** राजा रे!
पहा पहा. हे आम्हाला वेदीपासून ओढून काढताहेत.

**अग्रदूत :** शेवटी झिंज्या ओढूनच तुम्हाला न्यावे लागेलसे दिसते,
कारण माझे तिळमात्रसुध्दा ऐकून घेत नाही तुम्ही.

(पेलॅस्गस प्रवेश करतो)

**राजा :** कोण तुम्ही, काय चालले आहे?
पेलॅस्गिआच्या प्रजेला तिच्याच भूमीवर
न जुमानण्याचा काय हा उध्दटपणा?

तुम्हाला काय वाटते की
तुम्ही बायकांच्या देशात आला आहात?
आम्ही आहोत ग्रीसचे नागरिक,
परदेशीयांनी वागले पाहिजे आमच्याशी यापेक्षा जास्त आदराने.
असे प्रमाद केलेत तर
काहीच भले व्हायचे नाही तुमचे
येईलच हे आढळून तुम्हाला.

अग्रदूत : प्रमाद?
असमर्थनीय अशी कोणती गोष्ट घडली माझ्याहातून?

राजा : प्रथम म्हणजे
शिकला नाही तुम्ही विदेशवासीयांनी कसे वागावे ते.

अग्रदूत : गैरवर्तन केले मी? ते कसे?
माझी हरवलेली वस्तु मला इथे सापडली म्हणून?

राजा : आपली बाजू पुढे मांडायला
आरगॉसमधले प्रवक्ते मिळवायचा केलात का तुम्ही प्रयत्न?

अग्रदूत : श्रेष्ठ हर्मीज आहे माझा कैवारी प्रवक्ता
हरवलेल्या वस्तू सापडण्याच्या भाग्याचा
तोच आहे अधिष्ठता देव.

राजा : हक्क सांगता तुम्ही देवांच्या मदतीवर,
आणि तरीही करता अतिक्रमण त्यांच्याच
पवित्र आलयांवर?

अग्रदूत : मी पूजते ते देव राहातात नाईलनदीच्या तीरावर.

राजा : आणि आमचे देव?

तुझ्या मते काहीच नाही का महत्व त्यांना?

अग्रदूत : पहातो कोण घेतो हिसकावून
हया बायांना माझ्यापासून ते!

राजा : हात लावून तर पहा त्यांना,
तत्क्षणीच पावशील पश्चात्ताप त्याबद्दल.

अग्रदूत : तुझे शब्द करीत नाहीत विदेशवासीयाचे स्वागत.

राजा : स्वागताचा शब्द एकही नाही माझ्यापाशी
देवांच्या वेदीवर अत्याचार करणाऱ्यांसाठी.

अग्रदूत : इजिप्टसच्या पुत्रापर्यंत नेऊन पोचवीन मी
हे इत्थंभूत वर्तमान.

राजा: तसे केलेस तरी नाही वाटणार किंचितही चिंता मला.

अग्रदूत : पण दूताने सांगायला हवी सगळी हकीकत
प्रत्येक मुद्दा स्पष्ट करुन--
म्हणून मलाही जास्त तपशीलवार माहिती पूरवायला हवी. तुम्ही
तर सांगा मला आधी विचारतो ते
माझ्या स्वामींनी मला पाठवले आणण्यासाठी
हया स्त्रियांना - आपल्या चुलतबहिणींना.
तर मग कोणी मला भाग पाडले म्हणून सांगू
रिक्त हातांनी मागे परतायला?
अर्थात या बाबतीत आवश्यकता नाही म्हणा
न्यायालयाची वा साक्षीपुराव्याची.
न्याय देणारा आहे एरीज
तो निर्णय देतो अशा दाव्यात.
नुकसान भरपाई द्रव्याने करण्याचा नसतो त्याचा आदेश

तर तो करतो भरभक्कम दण्ड
ठार झालेल्या सैनिकांच्या आणि
रक्तबंबाळ मृत्यूच्या पंजात तडफडणाऱ्या अवयवांच्या रुपाने.

राजा : का म्हणून सांगावे मी माझे नाव तुला?
तुला आणि तुझ्या साऱ्या खलाशांना कळेलच ते योग्यवेळी.
या स्त्रियांच्या बाबतीत बोलायचे तर -
जर त्या झाल्या आपण होऊन तयार,
जर सामोपचाराच्या गोष्टींनी मिळवलीस त्यांची संमती
तरच घेऊन जावेस तू त्या सर्वांना.
मात्र या नगरीने ठरवले आहे भरगच्च सभेत एकमताने
की नाही करायचे त्यांना तुमच्या स्वाधीन
जबरदस्तीने बळी पडून.
हा त्यांचा ठराव अगदी अचल आहे -
जसा काही भक्कमपणे कायमचा खिळवलेला.
मी जे आता बोललो ते काही
कोरलेले नाही मेणावर.
किंवा ते चर्मपटावर लिहून त्याच्यावर नाही
केलेले शिक्कामोर्तब.
तू ऐकलेस ते आहे स्वायत्तमुखाचे सरळ सत्यकथन.
नाहीसा हो त्वरित आता माझ्या नजरेपुढून.
करावी लागणारशी दिसते आम्हाला घनघोर लढाई
मिळो पुरुषांच्या पक्षाला विजय आणि सत्ता.

राजा: पाहशील तू - या भूमीचे पुत्रही आहेत पौरुषसंपन्न
आणि पोसले गेले आहेत ते
आंबवलेल्या जवाच्या मद्यमिश्रित पेयाहून
जास्त कडक अशा पेयावर.

(अग्रदूत आणि त्याचे सैनिक निघून जातात)
बायांनो, घाबरु नका

चला सगळयाजणी - आपल्या सोबतिणीसह
बुरुजांनी आणि खुबीदार संरक्षणक्लुप्त्यांनी
अभेद्य केलेल्या भक्कम तटाच्या आमच्या नगरीमधे.
(हे भाषण चालू असतातनाच डॅनॅअसच्या कन्यांच्या परिचारिका रंगमंचावर गोळा होतात.)
राखून ठेवले आहेत आम्ही निवास
सार्वजनिक आतिथ्यासाठी.
माझ्याही निवासाचा इतमाम काही कमी नाही
राहू शकता तुम्ही इतरांबरोबर
आरगॉसमधील प्रशस्त निवासांतून.
अथवा वाटल्यास राहा एकेकट्या वेगवेगळ्या घरात.
निवडा तुम्हास आवडेल ते सोयीचे घर,
मोल काहीच नाही पडणार तुम्हाला.
तुमचे येथील जीवनाधार म्हणून स्वीकारा
मला आणि माझ्या नागरिकांना.
आम्ही सर्वच संपूर्णपणे तडीस नेत आहोत
आमचा निश्चय अशाप्रकारे.
तुमचा कैवार घेण्यास कोणाला आहे आमच्याहून
अधिक अधिकार?

पहिला नारीवृंद : राजा पेलॅस्गस,
तुझ्या सत्कृत्यांचे पारितोषिक मिळो तुला.
साऱ्या कल्याणकारक गोष्टीचा वर्षाव होवो तुझ्यावर!
आणि कृपा करून आमच्यावर, बोलावून घे आमच्यापाशी
विश्वासाचे जणू केंद्रस्थान असे आमचे तात
डॅनॅअस यांना.
आमची काळजी वाहतील, करतील आम्हाला मार्गदर्शन ते.
आम्ही नव्हे तर त्यांनीच ठरवले पाहिजे आधी -
कुठे राहायचे आम्ही ते
आणि कुठले स्थान आमचे सुस्वागत करील ते.
भिन्न स्वराघाताने बोलणाऱ्या परदेशीयांकडे

लोक चटकन पाहतात दोष दृष्टीने.
सारे पार पडो सुरळीत-
आरगॉसवासीयांमधे आमच्या लौकिकाला न होवो स्पर्श
निंदा आणि तिरस्कार यांचा.

(राजा पेलॅस्गस शरीररक्षकांसह निघून जातो.)

परिचारकांनो तुमच्यामधील प्रत्येकीला
डॅनॅअसने दिली आहे, स्त्रीधनाचा भाग म्हणून
आपल्या प्रत्येक मुलीला, तिची सेवा करण्यासाठी.
राहा बघू सर्वजणी उभ्या आपापल्या मालकिणिजवळ.

(पहिला नारीवृंद रंगमंचावरुन खाली उतरुन वाद्यवृंदामध्ये येतो तिथे परिचारिका त्यांच्याजवळ येऊन उभ्या राहतात. डॅनॅअस प्रवेश करतो आता त्याच्याही समवेत सशस्त्र सैनिक आहेत.)

डॅनॅअस : माझ्या बाळांनो,
आहूती देऊन, अर्घ्यप्रदान करुन करा प्रार्थना
आरगॉसच्या नागरिकांची -
जशी आलिम्पिआच्या देवतांची करतात तशीच.
त्या नागरिकांनीच मिळवला आहे निर्णायक जय
आपल्या ध्येयसिध्दीसाठी.
ह्या नगरीवर राज्य करणाऱ्या आपल्या मित्रांनी
ऐकली माझी विनवणी,
क्रोध आला त्यांना आमच्या चुलत बंधूंचा,
ज्यामुळे झाली असती ही भूमी प्रदूषित अक्षयशापाने
अशा संभाव्य प्राणघातक हल्ल्यापासून मला बचावण्यासाठी
आणि माझे अधिकार आणि मानाचे स्थान
निश्चित करण्यासाठी
त्यानी दिले आहे माझ्या दिमतीला
हे भालाईत शरीररक्षकांचे दल.

अशा या उपकारांनंतर आमच्या अंत:करणात
कृतज्ञतेने घ्यावी मुख्य जागा मानाची - हे उचितच आहे.
आता हे लिहून ठेवा स्मृतिपटावर -
माझ्या अनेक उपदेशपाठात मिळवा हा आणखी एक उपदेशपाठ
कालांतराने कळतो अपरिचितांचा स्वभाव.
परक्याविरूद्ध असतात प्रवाद प्रत्येकाच्या जिभेच्या टोकावर.
सहज उच्चारलेल्या एका शब्दानेही होते
कायमची बदनामी.
डोळे वळवावेत लोकांनी असा सुंदर तारुण्यबहर
लाभला आहे तुम्हाला
म्हणून बजावतो मी की होऊ देऊ नकोस माझी अप्रतिष्ठा.
कठीण असते संरक्षण करणे
पक्वफळांनी भरगच्च अशा फलवाटिकेचे
अशा वाटिकेने चेतवले पुरुषांच्या धूर्ततेला
आणि बनवले त्यांना लालची
आणि मोह घातला शिवाय पक्षधारी आणि
चतुष्पाद लुटारुंना तर
त्यात आश्चर्य ते काय?
घडते खरे अगदी असेच!
त्याच प्रमाणे जेव्हा सताड उघड्या टाकलेल्या फलवाटिकेत
लोभसपूर्ण यौवनाने मुसमुसलेले देह
दिसतात अॅफ्रोडाइटला,
तेव्हा ती प्रसृत करते ते वर्तमान
परिणामी तिथून जाणारा प्रत्येक पुरुष होतो
पर्युत्सुकतेने पीडित
आणि टाकतो हृदय विरघळवणारे कटाक्ष
अशा अनाघ्रात लावण्यावर.
विसरु नका तर मग. जे टाळण्यासाठी केला
खडतर प्रवास ओलांडीत भूमी आणि समुद्र
त्यालाच बळी पडू नये आम्ही.
आपणच आपल्या अब्रूला काळिमा फासून

शरणार्थी

सुखवता कामा नये माझ्या शत्रूंना.
देऊ करताहेत ते तुम्हाला दोन निवासस्थाने
एक पेलॅस्गस देतो आहे आणि दुसरे नगरी
दोन्हीही मिळणार आहेत मोल दिल्याशिवाय
भाग्य मोठे आहे तुमचे!
मात्र माझ्या साऱ्या उपदेशापासून ढळू नका मुळीही
आणि कौमार्य माना अधिक मौल्यवान आपल्या प्राणांहूनही.

पहिला नारीवृंद : ऑलिम्पिआच्या देवांच्या कृपेने
उजळू दे भाग्य आमचे अन्य संबंधित बाबतीतही.
आणि तात, बाळगू नका धास्ती मुळीही
माझ्या लावण्यमय कौमार्याबाबत.
अढळ आहे निर्धार माझा,
पूर्वीपासून निश्चित केलेला मार्ग.

या ग या, चला आरगॉसच्या द्वारापाशी
गाऊया स्तुतिस्तोत्रे
सर्व सत्ताधीश आनंदमय देवांची
नगरीवर राज्य करणाऱ्या
आणि एरॅसिनस[११]च्या अनादि प्रवाहानजीक
वास करणाऱ्या देवांची
आणि परिचारिकांनो,
तुम्हीही गाऊ लागा आमच्याबरोबर.

गाऊ या गीते आरगॉसची आणि पेलॅस्गसच्या प्रजेची,
नाही गायची यापुढे प्रार्थना
अनेक मुखांनी वाहणाऱ्या नाइलच्या स्त्रोतांची.
ह्या तृषार्त भूमीला संततीची देणगी देण्यासाठी
आणि तिची मृत्तिका, संपन्न करणाऱ्या ओलाव्याने
मृदू करण्यासाठी,
आपल्या सौम्य जलराशी प्रसृत करणाऱ्या

नद्याची गीते गाऊ या आपण.
वळू दे पवित्र आर्टेमिसची दयार्द्रदृष्टी आमच्यावर
नको पडू दे लग्नबंधन आमच्याभोवती
ॲफ्रोडायटीच्या बळजबरीने.
माझ्या शत्रूंच्या पदरी पडू दे ते तसले इनाम!

परिचारिकावृंद: पण आमच्या विहित विधिगीतांनी
न विसरता केला जातो सन्मान ॲफ्रोडायटीचाच.
झ्यूसच्या सिंहासनानंतर सत्ताधारित्वात
लागतो तिचाच क्रमांक, हीरासमवेत.
पण ही देवता आहे विविधरूपी आणि धूर्त
पूजिली जाते ही फक्त अतिगंभीर विधींनी -
ज्यात आपल्या प्रिय मातेशी सहभागी होऊन
प्रथम अवतरते अभिलाषा
आणि नंतर मार्दवयुक्त मनधरणी,
ज्यांच्या मोहजालांना काहीही नसते दुष्प्राप्य.
दरम्यान संगीतदेवी आणि
कुजबुजत प्रेमाचे खेळ खेळणाऱ्या प्रीतिदेवता
याना त्यांच्या भूमिका नेमून देते ॲफ्रोडायटी.

पहिला नारीवृंद : तरीपण भीती वाटते मला अजूनही
त्या सैनिकांच्या दुर्दम्य हिंसकवृत्तीची,
त्यांच्या घोर निर्दयतेची,
ते देत असलेल्या रक्तपाती युध्दांच्या धमक्यांची
जलप्रवासाला वेग आणणाऱ्या वाऱ्याच्या मदतीने
का व्हावेत ते इतके यशस्वी आमचा पाठलाग करण्यात?

परिचारिकावृंद: होईलच आता जे काही व्हायचे असेल ते
झ्यूसदेवाचा संकल्प म्हणजे एक दृढ दुर्गच!
कुणीही करु शकणार नाही त्याच्या सीमांचे उल्लंघन.
ह्या विवाहाची परिणती होईल कदाचित परम सौख्यात -

स्त्रियांनी आजवर अनुभवलेल्या सुखाहून
किती तरी अधिक अशा.

पहिला नारीवृंद : सर्वशक्तिमान झ्यूसदेव करो माझे संरक्षण
इजिप्तसच्या पुत्रांशी होऊ घातलेल्या विवाहापासून.

परिचारिकावृंद : कोण जाणे, कदाचित अत्युत्तम ठरेल ती घटना.
पण अटळ घटना घडूच नये असा दिसतो तुमचा हट्ट.

पहिला नारीवृंद : का म्हणतेस अटळ आहे ती घटना, म्हणून?
तुला ग काय ठाऊक भविष्यात काय होणार आहे ते?

परिचारिकावृंद : तेही खरेच म्हणा, मी तर पामर
कसा लागणार ठाव मला झ्यूसच्या अथांग मनाचा?
तरीही पाळा संयम तुमच्या प्रार्थनात.

पहिला नारीवृंद : कोणती पाळावी मर्यादा मी तुमच्या मतानुसार?

परिचारिकावृंद : देवांच्याबाबत कधीही नसावे दुराग्रही.

पहिला नारीवृंद : जगावर राज्य करणारा झ्यूसदेव
ज्या माणसाचा तिरस्कार करते मी
त्याच्या अदय गुलामगिरीपासून वाचवा मला
संजीवक हाताचे मार्दवपूर्ण सामर्थ्य वापरुन
आयोला यातनामुक्त करुन तिला पुनर्जीवन देणाऱ्या
झ्यूसदेव
मिळवून देवो विजय स्त्रियांच्या सत्पक्षाला.
वाईटातून निघेल जे काही चांगले ते स्वीकारीन मी
आणि जर चांगले वाईटातून अधिकांश ठरले,

जर माझ्या प्रार्थनेतून सुटकेचा मार्ग लाभला
आणि जर न्यायाच्या बाजूचा निर्णय झाला
तर त्यात वाटेल मला समाधान!

• • •

# शरणार्थी

## आवश्यक टीपा

१) **डॅनॅअस** - बेलसचा मुलगा, पॉसिडोनचा नातू, ईजिप्तचा राजा इजिप्तस याचा जुळा भाऊ, पन्नास मुलींचा पिता, आरगॉसचा राजा.

२) **डॅनॅइड्स** - डॅनॅअसच्या पन्नास कन्या. इजिप्तसच्या पन्नास पुत्रांशी चुलत भावांशी लग्न केले व नंतर त्यांना यानी ठार केले.

३) **पेलॉपोनीन**: ग्रीसच्या दक्षिणेकडील द्वीपकल्प.

४) **झ्यूस**: प्राचीन ग्रीकाचा सर्वश्रेष्ठ देव. (रोमनांचा ज्यूपिटर)

५) **अॅपॉलो**: स्वास्थ्य,कला, प्रकाश, संगीत, सौंदर्य यांचा अधिष्ठाता ग्रीक देव, झ्यूस व लेडा यांचा पुत्र.

६) **पॉसिडोन**: भूकंप व भूमी सुपीक करणाऱ्या नद्या यांवर आणि समुद्रावर अधिसत्ता गाजवणारा ग्रीक देव. झ्यूसचा बंधू, अश्वांचा देव. त्याला पांढरे बैल बळी दिले जात. त्रिशूल त्याची खूण.

७) **हर्मीझ**: देवांचा अग्रदूत, व्यापार, रस्ते, शोध, चोरी यांवर अधि -सत्ता असलेला धूर्त देव.

८) **आरगॉस**: आग्नेय ग्रीसमधील एक प्राचीन नगर.

९) **सीरिआ**: पॅलेस्टिनचा उत्तर व वायव्य भाग.

१०) **त्या वत्साला झ्यूसपासून जन्मलेल्या** - आयो ही इनॅकसची कन्या, तिच्यावर झ्यूसचे प्रेम जडले. त्याने हीराच्या मत्सराला भिऊन आयोचे शुभ्र गायीत रुपांतर केले. नंतर हीरा (झ्यूसची पत्नी आणि बहीण)

हिच्या इच्छेनुसार आरगस (शताक्ष राक्षस) याने तिच्यावर पहारा ठेवला. गोमाशीकडून तिचा पाठलाग करवला. गोमाशीच्या दंशाने वेडीपिशी होऊन ती पळत सुटली. झ्यूसच्या आज्ञेने हर्मीझने आरगसला ठार केले. ती इजिप्तला पोचली तेव्हा तिचे रुप तिला परत मिळाले आणि नाईल नदीच्या तीरावर तिने इपॅफस या झ्यूसपुत्राला जन्म दिला.

११) **टीरीअस** - टीरीअसने प्रॉक्नीशी (डॉलिअन) लग्न केले. तिच्यापासून त्याला इटीस हा पुत्र झाला. टीरीअसने प्रॉक्नीला दूरवनांत ठेवून तिच्या बहिणीशी - फिलॉमेलाशी लग्न केले. फिलॉमेलाची जीभ कापून टाकली तरीही तिने कपड्यात चित्र विणून त्यामार्फत बहिणीला कळविले. डॉलिअनने टीरीअसला त्याच्याच मुलाचे मांस शिजवून वाढले. टीरीअस कुऱ्हाड घेऊन त्या दोघी बहिणीचा पाठलाग करु लागला तेव्हा देवाने त्यांची प्रार्थना ऐकून त्याना ससाणा (टीरीअस) बुलबुल (प्रॉक्नी) आणि पाकोळी (फिलॉमेला) अशी रुपे दिली. डॉलिअस आपल्या निर्वासित दशेबद्दल व आपल्या हातून पुत्रवध घडल्याबद्दल शोकार्त गाणे गाते.

१२) **आयोनीआ**: आशिया मायनरच्या पश्चिम किनाऱ्यावरील आणि ग्रीस व तुर्क यांमधील भूमध्यसमुद्रातील (इजिअन समुद्रातील) बेटावरील प्रदेश.

१३) **नाईलनदीने बनवलेल्या माझ्या गालांची** - डॅनॅअसच्या कन्या इजिप्शिअन असल्याने त्यांचा वर्ण श्यामल होता.

१४)**एपिआच्या**: आरगॉसचे एपिआ हे प्राचीन नाव.

१५) **हेलास** - हेलेनीज (म्हणजे ग्रीक) त्याची भूमी ग्रीस.

१६) **सायडॉन प्रांत** - मूळ ग्रीक नाटकात सिडोनिअन असे आहे. हा प्रांत कापडाबद्दल सामानाबद्दल व इतर अनेक गोष्टीच्या व्यापाराबद्दल प्रसिध्द आहे.

१७) **ओरायन** - शिकारी देखणा राक्षस. आर्टेमिसने विषयवासने बद्दल शिक्षा म्हणून त्याला मारले असे एक मत. मृत्यूनंतर तो तारा झाला.

१८) **आर्टेमिस** - झ्यूसकन्या, शिकारीची व कौमार्याची ग्रीकदेवता अँपॉलोची जुळी बहीण.

१९) **ऑलिम्पस** - देवांचे वसतिस्थान मानले जाणारे ग्रीस आणि आशियामायनरमधील उंच पर्वत.

२०) **क्रीडोत्सवाच्या अधिष्ठात्या देवांच्या** - रंगमंचावर दिसणारे देव म्हणजे झ्यूस, अँपॉलो, पॉसिडोन, व हर्मीश हे सर्व धार्मिक क्रीडोत्सवांशी संबंधित.

२१) **हेडीस** - मृतात्मे जिथे राहातात तो पाताळलोक.

२२) **राजा पेलँसग्स** - ग्रीसमधील प्राचीन लोकांचा राज्यसंस्थापक.

२३) **पॅलिक्थॉन** - पेलँसगसचा पिता.

२४) **हॅलिॲॅक्मन** - एक नदी.

२५) **पिण्डस** - मध्य ग्रीसमधील उंच पर्वतरांग.

२६) **केऑनीस** - ग्रीसमधील एका पर्वतराजीचे नाव.

२७)**डोडोनीअस** - डढोना हे वायव्य ग्रीसमधील झ्यूसचे मंदिर देववाणीचे एक अधिष्टान त्यावरुन हे त्या प्रदेशाचे नाव पडले.

२८)**पेऱ्हीबीअस** - थेसलीतील एका प्रदेशाचे नाव.

२९) **एपिस** - आरगॉसचा राजा त्याच्या राज्याला एपिजन हे नाव पडले.

३०) **नॉपॅक्टस** - आजचे लेपन्टो. कॉरिन्थिअन गल्फमधील एक चांगले बंदर.

३१) **सायप्रस** - भूमध्यसमुद्रतील बेट.

३२) **इथिओपिआ** - ईशान्य आफ्रिकेचा इजिप्त व तांबडासमुद्र यांच्या हद्दीलगतचा प्राचीन प्रदेश.

३३) **ॲमेझॉन** - पूर्वी काळ्यासमुद्राजवळ लढाऊ स्त्रिया राहात अशी समजुत होती. त्यांचे नाव.

३४) **हीरा** - झ्यूसची पत्नी व बहीण.

३५) **आर्गस** - शताक्ष राक्षस, याने आयोवर पहारा ठेवला होता हर्मीझने याला ठार केले. मेल्यानंतर त्याचे डोळे मोराला दिले गेले.

३६) **ईस्ट्रस** - गोमाशी.

३७) **कॅनोपस** - अलेक्झांड्रियाच्या पूर्वेस पंधरा मैलावर असलेले समुद्रतीरावरील शहर, पूर्वी ग्रीकांचे व्यापारकेंद्र.

३८) **मेम्फीस** - इजिप्तची नाईलवरील जुनी राजधानी.

३९) **एपॅफॉस** - झ्यूस व आयो यांचा पुत्र, इजिप्तचा राजा. झ्यूसच्या स्पर्शाने आयोच्या ठिकाणी गर्भसंभव होऊन हा जन्मला म्हणून त्याचे नाव एपॅफॉस म्हणजे स्पर्शोद्भव असे ठेवले.

४०) **कोणती मुलगी हुंडा देऊन** - जवळच्या नात्यात लग्न झाले की वारसा एकत्र होऊन कुटुंबाचे सामर्थ्य वाढते. परंतु लग्न झालेल्या स्त्रीची परिस्थिती अधिक दुबळी होते. पतीशी वा सासरशी भांडण झाले तर तिच्या पाठीशी राहाणारे स्वतंत्र कुटुंब उपलब्ध नसते. हा असल्या

विवाहापासून तोटा.

४१) **थेमिस** - प्रस्थापित कायदा, रुढी, समतोल न्याय यांची अधिष्टात्री देवता.

४२) **इनाकस** - आरगॉसचा पहिला राजा. आयोचा पिता.

४३) **फ्रिजिया** - मध्य व वायव्य आशिया मायनरमधील प्रदेशाचे प्राचीन नाव. नंतर तो प्रदेश.

४४) **मिशिअन** - वायव्य आशिया मायनरमधील प्राचीन प्रदेश मिशिआ तेथील लोक.

४५) **ट्यूप्रस** - आर्टेमिसला पवित्र असलेले डुक्कर मारणारा मिशिअन राजा. त्याला शिक्षा म्हणून रोग झाला.

४६) **सिलिसिआ** - आग्नेय आशिया मायनरमधील प्रदेशाचे प्राचीन नाव. नंतर तो प्रदेश रोमनांचा झाला.

४७) **ॲफ्रॉडायटी** - सौंदर्य व प्रीती यांची प्राचीन ग्रीकदेवता. (ही रोमनांमधे व्हीनस या नावाने ओळखली जाते)

४८) **एरीज** - प्राचीन ग्रीक युध्ददेव. झ्यूस व हीरा यांचा पुत्र. (रोमनांमधे त्याचे नाव मार्स)

४९) **नवप्रसवांवर शरसंधान** - आर्टेमिसच्या बाणांमुळे स्त्रिया प्रसूतिकाळात मरतात असे मानले जाई.

५०) **बायब्लस फळे** - नेमका अर्थ मिळाला नाही ह्यासाठी बिल्व्याची बोंडे, असा अर्थ लक्षात घेऊन शब्दप्रयोग केला आहे.

५१) सार्पेडॉन - झ्यूस व यूरोपा यांचा पुत्र, लिसियाचा राजा. झ्यूसने त्याला तीन पिढ्यांचे आयुष्य दिले होते. त्याने ग्रीकांविरुध्द ट्रॉयला मदत केली परंतु ॲकिलीजचा मित्र पॅट्रोक्लीज याने त्याला ठार केले.

५२) एरॅसिनस - नदी.

— समाप्त —

# श्रृंखलाबद्ध प्रोमिथ्यूस

इस्कीलस कृत

अनुवाद

प्रभाकर उर्ध्वरेषे

# शृखंलाबध्द प्रोमीथ्यूस

पात्रे :

शक्ती

हिंसाचार

हेफीस्टस (अग्नीदेव)

प्रोमीथ्यूस

गायिकावृंद (ओसिआनसच्या कन्या)

ओसिआनस (सागरदेव)

आइओ (आरगॉसची पुजारीण)

हर्मीज (झ्यूसचा दूत)

(स्थळ : जेथून सागर सहज दृष्टीस पडेल असा खडकाळ डोंगरमाथा)

शक्ती व हिंसाचार प्रवेश करतात. त्या प्रोमीथ्यूसला ओढून आणीत आहेत. त्यांच्या पाठोपाठ हेफीस्टस प्रवेश करतो.

शक्ती : येथे आपण येऊन पोचलो आहोत
पृथ्वीवरील एका अतीदूरच्या प्रदेशात,
हे आहे सिदियावासियांचे आश्रयस्थान नेहमीचे,
ओसाड माळ, नाही जिथे एकही ठसा पावलांचा.
हेफीस्टस, लाग तुझ्या कामाला.
कर स्मरण पित्याने तुला केलेल्या आज्ञेचे.
हा इथे आहे तो बंडखोर प्रोमीथ्यूस –
खिळे ठोकून जखड त्याला खडकाला.
खिळवून टाक त्याला त्या अत्युच्च शिखरावर
वज्रसदृश श्रृंखलांच्या भक्कम मगर मिठीत.
चोरला होता त्याने तुझाच अमोल निधी –
सर्व वस्तूमात्राला आकार देणाऱ्या अग्नीचा वैभवशाली फुलोरा,

अन् देऊन टाकला तो मानवांना!
अक्षम्य अपराध ठरला तो देवांच्या लेखी,
आता शिक्षा भोगलीच पाहिजे त्याने त्या अपराधाची–
चांगला धडा शिकेपर्यंत – मान वाकवण्याचा
सार्वभौम सत्तेपुढे झ्यूसच्या,
आणि मानववंशाच्या कैवाऱ्याची भूमिका घेण्याचा नाद सोडण्याचा.

हेफीस्टस : शक्ती आणि हिंसाचारा! तुम्हा दोघांपुरती तर
पूर्ती झाली झ्यूसच्या आज्ञेची.
तुम्ही झालात मुक्त. पण मी?
कसा टाकू मी हात माझ्याच वंशाच्या एका देवावर,
कोठून आणू मी मनोबल
त्याला श्रृंखलाबद्ध करण्याचे,
या भीषण, उघड्याबोडक्या खडकाशी?
पण तरीही केलेच पाहिजे ते मला,
इच्छा असो वा नसो, ते मला केलेच पाहिजे.
झ्यूसच्या शद्बाची अवहेलना –
फार भयावह परिणाम होतील त्याचे.
(प्रोमीथ्यूसला उद्देशून)
सूज्ञ थेमिसच्या पुत्रा! पर्वतप्राय उत्तुंग विचाराच्या देवा!
व्यथित अन्त:करणाने तुझ्याइतक्याच,
जखडणार आहे मी तुला ब्राँझच्या या सुदृढ बंधांनी
या ओसाड शिखराशी –
जिथे कानावर पडणार नाही तुझ्या आवाज कुणाचाही,
दिसणार नाही दृष्टीला आकार कुणा मानवाचा,
मात्र भाजून निघेल अंग तुझे सूर्याच्या धगधगणाऱ्या किरणांनी,
आनंदित होशील तू,
जेव्हा रात्र लपेटून टाकील दिवसाला
तिच्या तारांकित शबल वस्त्राने;
आणि पुन: अनुभवशील तोच आनंद,
जेव्हा पहाटेचे धुके विखरेल सूर्यकिरणांच्या उबेने.

तासामागून तास जातील,
व्याकुळ होईल शरीर वेदनांनी,
तासागणिक वाढणाऱ्या.
करू शकणार नाही मुक्त तुला,
कुणीही मानव आजवर जन्मलेला.
हे पारितोषिक मिळाले तुला
मानवजातीबद्दलच्या तुझ्या कनवाळूपणाचे.
देववंशीय असून तू जुमानले नाहीस देवांच्या क्रोधाला,
उल्लंघन केलेस अधिकारकक्षेचे;
दिलीस वरदाने तू मर्त्य मानवांना;
त्याचेच हे प्रायश्चित्त.
आता कर पहारा या भीषण खडकावर,
ताठ उभा राहून, न झोपता, न कलंडता विश्रांतीसाठी.
टाकशील दीर्घ उसासे, करशील चीत्कार वेदनांनी व्याकुळ होऊन;
सारे निष्फळ! फुटणार नाही पाझर झ्यूसच्या अन्तःकरणाला,
नवप्राप्त सत्ता अशीच असते पाषाणहृदयी.

शक्ती : कशाला वेळ दवडतोस असल्या करूणेपायी? चीड कशी येत नाही तुला
सर्व देवांचा शत्रू अशा या देवाची –
तुझाच अधिकार ज्याने प्रदान केला मानवजातीला?

हेफीस्टस : विलक्षण चिवट असतात धागे
सहोदरत्त्वाच्या अन् सहजीवनाच्या अनुबंधांचे.

शक्ती : खरं आहे ते. पण म्हणून का अवज्ञा करणार
तू प्रत्यक्ष त्या पित्याच्या आदेशाची?
जास्तच भय वाटत नाही तुला त्याच्या परिणामाचे?

हेफीस्टस : नेहमीचीच आहे तुझी ही
निर्घृण, जुलमी आक्रमक वृत्ती.

शक्ती : व्यर्थ आहे तुझं हे जीव टाकणं त्याच्यासाठी; सोड नाद हा.
तू मदत करूच शकणार नाहीस त्याला; नको दवडू वेळ उगीच हुरहुरीत.

हेफीस्टस : वीट आलाय माझ्या व्यवसायाचा मला,
आणि माझ्या हातातल्या या कसबाचा.

शक्ती : कशाला करतोस राग त्याचा?
साधा सरळ विचार कर:
आता जे करणे भाग आहे
त्यात दोष नाही तुझ्या व्यवसायाचा.

हेफीस्टस : खरे आहे ते. पण किती बरे झाले असते,
हे माझे कसब दुसऱ्या कुणाच्या वाट्याला येते तर!

शक्ती : सगळीच कामे असतात भारभूत,
फक्त एक काम सोडून – देवांवर राज्य करण्याचे!
मुक्त असा एकच – फक्त झ्यूस!

हेफीस्टस : जाणतो मी ते. (प्रोमीथ्यूसचा निर्देश करीत)
हा सगळा आहे ना त्याचाच पुरावा – निर्विवाद!

शक्ती : त्वरा कर तर मग. इकडे बघ! ठोक त्याला बेड्या,
तुझी दिरंगाई त्या पित्याच्या नजरेस पडण्यापूर्वी.

हेफीस्टस : ठीक! पहा तर मग!
या मनगटावरील लोहशृंखला आहे तयार!
(बेड्या ठाकठीक करू लागतो.)

शक्ती : हां! उचल त्या बेड्या. अडकवून टाक त्याला!
घाल घणाचे घाव सर्व शक्तीनिशी. खिळवून टाक त्याला खडकात.

हेफीस्टस : हो!हो! करतोच आहे मी ते! हं, पहा, आता मुळीच खिळखिळा होणार नाही हा लोखंडी खिळा.

शक्ती : ठोक! जाऊ दे आणखी आत. घट्ट जखडून टाक त्याला, ढिलाई नको कोठे त्यात!

हेफीस्टस : हा हात तर झाला पक्का. इकडून तरी निसटू शकणार नाही तो.

शक्ती : दुसरा हातही ठोक खिळ्याने पक्का. समजू दे त्याला,
की सगळे शहाणपण त्याचे
म्हणजे निव्वळ मूर्खपणा आहे झ्यूसपुढे.

हेफीस्टस : हं, झालं आता. सहजासहजी काढू शकणार नाही कोणी दोष या कामात
– अर्थात् तो स्वता - प्रोमीथ्यूस - सोडून!

शक्ती : आता घुसव सरळ त्याच्या छातीत –
तुझी सर्व शक्ती एकवटून –
त्या वज्रसमान पाचरीचा निर्दय जहरी दात.

हेफीस्टस : हाय! अश्रू ढाळतो आहे मी व्याकुळ होऊन तुझ्या वेदनांनी, प्रोमीथ्यूस!

शक्ती : अजूनही कच खातोस? अश्रू ढाळतोस झ्यूसच्या शत्रूसाठी?
सांभाळ बरं! नाहीतर कीव करावी लागेल तुला स्वत:चीच!
(हेफीस्टस पाचर ठोकतो.)

हेफीस्टस : हं, हे झालं! पण डोळ्यांनी पाहावत नाही आता हे दृश्य!

शक्ती : मला दिसतं ते हे की
प्रोमीथ्यूस भोगतो आहे आपल्या कर्माचे यथा योग्य प्रायश्चित्त.
चल, बांध त्या श्रृंखला. त्याच्या फासळ्यांभोवती.

हेफीस्टस : ते तर प्राप्तच आहे. पण असे हुकुम सोडून पिच्छा पुरवू नकोस माझा.

शक्ती : हुकुम तर मी सोडणारच!
होय बरं. अगदी हात धुऊन
मागे लागणार तुझ्या तू काम चालू ठेवावंस म्हणून.
हं! आता जरा खालचा भाग. घुसव त्याचे पाय या कडीत.

हेफीस्टस : हे. तेवढे मात्र झाले झटपट!

शक्ती : आता पक्क्या ठोक या शृंखला. हं! घाल घाव जोरात!
कठोर आहे परीक्षक आपल्या या कामाचा.

हेफीस्टस : जसा आहे तुझा अवतार, तसाच आहे तुझ्या शब्दांचा भडिमार!

शक्ती : (उपरोधिकपणे) तर मग तू वाग कनवाळूपणे पण मग
मी जर असलो कठोर आणि निष्ठुर,
तर टोमणे मारू नको मला त्याबद्दल.

हेफीस्टस : चला, बांधले पक्के त्याचे पाय. जाऊ या आता.
**(हेफीस्टस निघून जातो.)**

शक्ती : (प्रोमीथ्यूसला उद्देशून)
कर मुक्काम तिथे आता आणि फुगत जाऊ दे
तुझा उर्मट उद्दामपणा.
दे देवांचे अधिकार चोरून
त्या मर्त्य मानवांना!
कसे तोडता येणार आहे तुझे हे बंधन
तुझ्या त्या मर्त्य मानवांना?
तुझ्या नामकरणात झाली आहे गफलत, प्रोमीथ्यूस!
म्हणे "भावी घटनेआधी शहाणपण सुचणारा"!
तुझ्या अंगी नेमकी उणीव आहे ती शहाणपणाची--

## शृंखलाबद्ध प्रोमीथ्यूस

जर तुझ्या मनात असेल विचार
या अत्युत्कृष्ट लोहारकामाने घडविलेल्या शृंखलांतून निसटण्याचा.
**(शक्ती व हिंसाचार जातात.)**

प्रोमीथ्यूस : हे आकाशदेवते! हे वेगवान पंखांच्या वायूंनो!
आणि हे उसळणाऱ्या जलप्रवाहांनो!
हे सागरी लाटांच्या असीम हास्या!
हे जीवनदात्री पृथ्वीमाते!
तुम्हा सर्वांना हे माझे आवाहन!
आणि त्या सर्व साक्षी सूर्यबिंबालाही!
पहा त्या देवांनी काय दशा केली आहे माझी – एका देवाची!
पहा केवढ्या अत्याचारी क्रौर्याने चालला आहे
माझा हा छळ, ही विटंबना.
सहन करायच्या आहेत मला या यातना
एक सहस्त्र वर्षे!
पहा हा लाजिरवाणा तुरुंग –
खास माझ्यासाठी निर्मिलेला,
त्या नव्या अधिपतीने देवांच्या!
कासावीस होऊन कण्हतो आहे मी
यातनांनी – आजच्या आणि आगामी!
`कोठे दिसेल मला उदय पावताना
तारा तुझ्या मुक्तीचा?

काय म्हणतो आहे मी? मी तर यथातथ्य जाणतो
पुढे घडणारी प्रत्येक घटना;
पूर्वसूचित नाहीत अशा
कोणत्याच यातना नशिबी येणार नाहीत माझ्या.
नियतीने ललाटी लिहिलेले भोग
भोगलेच पाहिजेत मला निमूटपणे माझ्या शक्तीनुसार,
हे जाणून की व्यर्थ आहे प्रतिकार नियतीच्या सत्तेपुढे.

असल्या भयंकर यातनांनी पिडलेल्या मला
बोलवत नाही – तसेच गप्पही राहवत नाही.
मानवजातीला वरदाने दिल्याबद्दल
झालो आहे बंदिस्त या यातनांच्या खोड्यात.
कारण, मीच शोधून काढले अग्नीचे उगमस्थान
चोरला तो अग्नी, अन् केला बंदिस्त
फेनेल वृक्षाच्या शुष्क देठाच्या अंतर्भागात.
आणि हा अग्नी बनला मानवाचा गुरु
प्रत्यक्ष कलेच्या क्षेत्रात – मानवांचे महान् साधन.
हेच माझे पाप. त्याचे आता मोजतो आहे मी परिपूर्ण मोल
अवकाशातील झंझावातांशी अंगोपांगांनी झुंजत जखडलेला, क्रूसावर चढवलेला!
आ:! कोण आहे ते तिकडे?
कशाचा आवाज, कसला हा सुगंधित वायूचा स्रोत
माझ्या भोवती तरंगत आहे?
कोठून येतो आहे तो ते दिसत नाही मला.
देवाकडून, की मानवाकडून, की कोणा दैवताकडून?
तू या जगाच्या टोकाला,
या शिखरावर
माझ्या यातना पाहाण्याला आला आहेस की काय?
की दुसऱ्या कशासाठी?
पहा, पाहून घे मला. एक दु:खित, दुर्दैवी बंदी,
– एक देव, झ्यूसचा शत्रू,
रोष ओढवून घेतला आहे ज्याने,
झ्यूसच्या दरबारात नेहमी येणाऱ्या सर्व देवांचा,
झालो प्रमाणाबाहेर उत्तम मित्र मानवांचा म्हणून.
आ:! आ:! पुन: ऐकू येतोय तो आवाज अगदी माझ्याजवळ!
आणि ऐकू येते आहे वातावरणात कुजबुज
पंखांच्या हळुवार उघडझापीची!
आगमन कोणाचेही असो – भयप्रद भासते आहे ते!

## शृंखलाबद्ध प्रोमीथ्यूस

(पंख लावलेल्या नौकेतून किंवा रथातून सागरकन्या गायिकावृंदाचा प्रवेश.)

सागरकन्यावृंद : भिऊ नकोस. आम्ही सर्व सख्या आहोत तुझ्या.
वेगवान पंखांवर आरूढ होऊन आलो आहोत या पर्वतावर;
आमच्या पित्याने नाखुषीने दिलेली संमती घेऊन निघालो आम्ही,
अन् आणले आम्हाला वायूंनी येथे त्वरेने.
पोलादाच्या खण्खण् आवाजाचे प्रतिध्वनी
कंपने उठवीत आले आमच्या गुहेच्या खोलीत
त्यांनी हुसकून लावली अबोल लज्जाशीलता आमच्या चित्तकोषांतून
अन् निघालो होतो तशाच अनवाणी
तडक आमच्या पंख लावलेल्या रथातून.

प्रोमीथ्यूस : अरेरे! हाय!! सुफला टेथिसच्या मुलींनो!
अहर्निश ज्याच्या लाटा अखिल पृथ्वीला सतत वेढून असतात,
त्या ओसिआतसच्या कन्यांनो!
पहा– पहा माझी ही दशा.
पहा किती क्रूर बंधनात,
या दरीवरील सुळक्यांच्या शिखराला जखडून घेऊन
भयानक पहारा करीत राहाणे आले आहे माझ्या नशिबात!

सागरकन्यावृंद : पाहाते आहे मी, प्रोमीथ्यूस!
अन् जाताहेत माझे नेत्र एकाएकी भरून आकस्मिक भीतीने,
कोमेजून जाताना पाहून या खडकावर
तुझी काया – वज्रासारख्या कठीण बेड्यांच्या अत्याचाराखाली जखडलेली.
एक नवा स्वामी सूत्रचालक बनला आहे ऑलिंपसचा,
हे नवे नियम आहेत खचित
त्या झ्यूसच्या नव्या जुलमी राजवटीचे;
नष्ट करतो आहे तो महान् शक्ती सगळ्या पुरातन.

प्रोमीथ्यूस : बरे झाले असते यापेक्षा जर
झ्यूसने मला खोल गाडून टाकले असते पृथ्वीच्या खाली,
मृतात्म्यांचे आश्रयस्थान असलेल्या हेडीजच्याही खाली,
टाटरिसच्या प्रचंड अवकाशात,
बंदिस्त करून क्रूर बेड्यांच्या अतूट बंधनात.
म्हणजे मग कोणीही देव, कोणताही अन्य प्राणी,
पावू शकला नसता संतोष माझ्या यातना पाहून.
पण आता मात्र मी बनलो आहे
प्रत्येक वायुलहरीचे दयनीय क्रीडास्थान,
आणि माझ्या यातना देताहेत
माझ्या शत्रूंना समाधान.

सागरकन्यावृंद : इतका पाषाणहृदयी कोणता देव आहे
जो हर्षित होईल असले दृश्य पाहून?
कोण आहे असा जो समदु:खी नाही तुझ्या यातनांनी फक्त झ्यूस सोडून?
झ्यूस त्याचा कोण आहे दुर्दम्य अन् अचल,
युरॅनसचा सारा वंश पायदळी तुडवतोय् तो,
शमणार नाही त्याचा क्रोध
त्याच्या उद्दीप्त भावनांची तृप्ती होईपर्यंत,
किंवा कोणी कपट-कारस्थान रचून
त्याचे अभेद्य साम्राज्य त्याच्या हातातून हिसकावून घेईपर्यंत.

प्रोमीथ्यूस : शपथपूर्वक सांगतो तुला मी,
असलो जरी अशा अपमानित अवस्थेत,
हाती-पायी भक्कम वाद्यांनी बंधनात जखडलेला,
तरीही गरज पडणार आहे माझी त्याला,
त्या अमर देवांच्या अधिपतीला,
नियतीची नवी योजना उलगडून घेण्यासाठी,
कोण घेणार आहे त्याची सत्ता आणि वैभव हिरावून,
हे माझ्याकडून ऐकण्यासाठी.

मी भुलणार नाही
त्याच्या लाघवी जिव्हेवरील मधाळ मोहिनी मंत्रांनी,
किंवा दबणार नाही त्याच्या क्रूर धमक्यांनी,
अन् करणार नाही भेद या रहस्याचा,
जोवर करीत नाही तो मुक्तता माझी
या पाशवी बंधनातून,
आणि मान्य करीत नाही
या अत्याचाराची भरपाई करण्याचे.

सागरकन्यावृंद : किती उद्धट आहेस तू प्रोमीथ्यूस!
तुझी हिंमत खचलेली नाही लवलेश,
इतक्या यातना सोशीत असूनही!
पण फार स्वतंत्र बाण्याने बोलतो आहेस तू.
भयानक भीतीने कापते आहे माझे हृदय
थरकाप होतो आहे माझा कल्पनेने तुझ्या भवितव्याच्या.
कसा काय होणार आहे अंत तुझ्या या संकटांचा?
आणि कसा पोचशील तू सुरक्षित विश्रांतीस्थानात?
कारण क्रोध असा जाज्वल्य आहे क्रोनसच्या पुत्राचा,
की कोणी समजावू शकणार नाही त्याला,
अन् कोणत्याही शद्बांनी द्रवणार नाही त्याचे अन्तःकरण.

प्रोमीथ्यूस : झ्यूस आहे अत्यंत निष्ठुर,
केवळ त्याची इच्छा हाच आहे त्याचा न्यायदंड,
– हे सर्व जाणतो मी.
तरीही कालांतराने त्याच्या संतापाचा पारा निश्चित उतरेल,
जेव्हा खरी ठरेल माझी वाणी
आणि त्याचा नक्षा उतरेल.
मग अखेर त्याचा निर्घृण क्रोध शांत होईल,
अन् तो मैत्रीच्या करारासाठी हात पुढे करील,
आणि मीही त्याचे स्वागत करीन.

सागरकन्यावृंद : आता सांग सगळे उघड करून. समजावून सांग आम्हाला
कोणत्या अपराधासाठी बंदिस्त करवले तुला झ्यूसने,
आणि केली तुझी अशी अवहेलना अन् वागवले अशा क्रूरतेने.
सांग आम्हाला, पण त्या कथनाने तू संकटात सापडणार नसशील तर!

प्रोमीथ्यूस : यासंबंधी बोलावे तरी तापदायक,
पण स्तब्ध राहाणे हेही तितकेच क्लेशदायक!
काही केले तरी दु:खच येणार वाट्याला.

अमर देवांमध्ये प्रथम झाला जेव्हा क्रोधाचा स्फोट,
तेव्हा पडले त्यांचे दोन तट. एक उठला क्रोनॉसच्या विरूद्ध,
सत्ता त्याची उलथून पाडण्याला, अन् केला निर्धार
झ्यूसला राज्यपद देण्याचा, अन्-नीट ऐका हे–
अगदी निरंकुश राजा बनविण्याचा!
तितकाच उत्कट होता निर्धार विरूद्ध बाजूचा,
की होऊ देणार नाही कदापि झ्यूसला राजा देवांचा.
पुढे झालो मी सर्वोत्तम सल्ला देण्यासाठी तेव्हा –
प्रयत्न केला समजूत पटवण्याचा,
स्वर्ग आणि पृथ्वी यांचे पुत्र असलेल्या टायटनांचा,
पण सारे निष्फळ!
युक्तीचा धूर्त मार्ग त्यांनी झिडकारला, –
गर्व होता त्यांना आपल्या शक्तीचा,
आधीच खूणगाठ घातली मनात की सहज मिळेल विजय,
अन् करू राज्य शक्तीच्या बळावर!
पण मला ज्ञात होते नियतीचे निर्धारित घटनाचक्र.
मातेने माझ्या – थेमिस किंवा पृथ्वी
(नावे विविध, पण व्यक्ती एकच),
– तिने वारंवार भविष्य वर्तविले होते मजपाशी.
ना पाशवी शक्तीने, ना हिंसेने,
युक्तीच्या धूर्त मार्गानेच मिळेल विजय भावी सत्ताधाऱ्यांना.

## शृंखलाबद्ध प्रोमीथ्यूस

हे सगळे समजावून सांगितले मी त्यांना,
कारणेही दिली पटविण्यासाठी,
पण त्यांनी क्षणभरही विचार करण्याइतकी किंमत दिली नाही
त्यांना.
मग समोर होते त्यापैकी एका मार्गाचा केला मी स्वीकार
ठरविले की हेच सर्वात हितकर, संमतीने माझ्या मातेच्या
की उभे ठाकावे झ्यूसच्या बाजूने. त्यानेही केला सहर्ष स्वीकार.
मीच सुचवला तो मार्ग, परिणामी ज्याच्या
वृद्ध कोनॉस अन् सारथी त्याचे
चिरनिद्रा घेताहेत आता टार्टोरसच्या अंधःकारमय खोल दरीत.
अशी केली मी मदत त्या देवांच्या राजाला
अन् हे त्याचे मला मिळालेले पारितोषिक.
त्याची काळीकुट्ट संशयी दृष्टी सगळ्या मित्रांविषयी. ही विकृती
स्वाभाविकच असावी सर्वच निरंकुश सत्ताधाऱ्यांच्या अंतरी.

आता वळतो तुझ्या प्रश्नाकडे : काय आहे असा माझा अपराध,
ज्यासाठी हा छळ मांडला आहे झ्यूसने माझा?
सांगतो या प्रश्नाचे उत्तर – ऐक.
होताच आरूढ पित्यानंतर त्याच्या सिंहासनावर,
तात्काळ केले अधिकार स्वाधीन त्याने निरनिराळ्या देवांच्या,
दिले नेमून ज्याचे त्याचे निवासस्थान आणि प्रभुत्वक्षेत्र.
क्षुद्र मानवांची नव्हती त्याला दखल,
करायचा त्यांचा संहार अन् करायची निर्मिती नव्या वंशाची,
असा होता त्याचा निर्धार.
निर्धाराला या त्याच्या, करीना कोणी विरोध,
मीच निधालो एकटा.
मीच दिले आव्हान. मीच वाचवले मानववंशाला
पार धुळीस मिळण्यापासून, संपूर्ण संहारापासून.
त्या साठीच भोगतो आहे या दारुण यातना,
या असह्य वेदना–बघणाराचे सुद्धा अन्तःकरण विदीर्ण करणाऱ्या.
करूणा आली मला मर्त्य मानवांची,

पण मी स्वतः मात्र ठरलो नाही करूणेस पात्र;
म्हणून मिळाले हे कठोर शासन मला
कलंकित करणारे आहे हे दृश्य झ्यूसच्या नावाला.

**सागरकन्यावृंद :** हृदय असेल लोखंडाचे, अन् वृत्ती पाषाणातून कोरलेली,
तरच पाझर फुटणार नाही तुझ्या या यातना पाहून, प्रोमीथ्यूस!
मला ही वस्तुस्थिती प्रथमच माहीत असती
तर मला कधीच पाहावेसे वाटले नसते हे दृश्य;
आता ते पाहिल्यावर मात्र विदीर्ण होत आहे माझे हृदय,
दुःखाने अन् क्रोधाने!

**प्रोमीथ्यूस :** माझ्या मित्रांना करूणा येते खरीच ही माझी दशा पाहून.

**सागरकन्यावृंद :** तू सांगतोस तेवढाच तुझा अपराध? काही अधिक तर नाही ना?

**प्रोमीथ्यूस :** हो, आणखी एक केले मी.
आपले मरण मानवांना आधी कळू नये
अशी योजना केली मी.

**सागरकन्यावृंद :** त्यांच्या दुःखहरणासाठी कोणता उपाय शोधून काढलास तू?

**प्रोमीथ्यूस :** आंधळा आशावाद – त्याचे पक्के
बीजारोपण केले मी त्यांच्या हृदयात.

**सागरकन्यावृंद :** ही तुझी देणगी म्हणजे त्यांना मोठेच वरदान प्राप्त झाले
म्हणावयाचे!

**प्रोमीथ्यूस :** याहूनही आणखी एक मोठी गोष्ट केली मी:
मी दिली भेट त्यांना अग्नीची.

**सागरकन्यावृंद :** काय? त्या मानवांना – ज्यांचे जीवन केवळ एक दिसाचे –

झाली प्राप्ती त्यांना अग्नीच्या प्रखर तेजाची?

प्रोमीथ्यूस : होय, खरे आहे ते. आणि आता नाना कला
साध्य करून घेतील ते त्याच्या साहाय्याने.

सागरकन्यावृंद : हा होता तर तुझा अपराध,
ज्यासाठी येथे या यातना भोगतो आहेस तू –

प्रोमीथ्यूस : हो! निर्दय झ्यूसने क्रूरपणे लादलेल्या यातना.

सागरकन्यावृंद : आणि या यातनांचा अंत नाही तुझ्या नशिबात लिहिलेला?

प्रोमीथ्यूस : नाही ना, योग्य वेळ येईपर्यंत – त्याच्या मर्जीनुसार – तरी नाहीच.

सागरकन्यावृंद : त्याला कधीच वाटणार नाही अंत करावा असं.
तर मग आशेला जागाच नाही? खरंच, चुकलंच तुझं –
तुला पण नाही असं वाटत? 'चुकलं तुझं'
असं म्हणताना मी होते व्यथित,
अन् तुलाही होतात वेदना.
तर मग नकोच आता या विषयाबद्दल अधिक काही बोलणं.
त्याऐवजी पाहू या सापडतो का
काही मार्ग तुझ्या मुक्ततेचा.

प्रोमीथ्यूस : हूं! सोपे आहे उपदेश करणे
यातना भोगणाऱ्याला,
यातनामय तुरुंगाच्या भिंतीबाहेर उभे राहून.
जे जे म्हणालीस तू मला उद्देशून,
जाणतो मी ते सगळे फार पूर्वीपासून.
माझी चूक? मान्य! मान्य करतो मी तो शब्द. पण अगदी
बुद्धिपुरस्सरच केली मी ती चूक!

आणि करीत असता साहाय्य मानवांना,
ओढवून घेतले मी संकट स्वत:वर.
पण तरीही अपेक्षिली नव्हती मी शिक्षा इतकी भयंकर –
एका ओसाड, निर्जन शिखरावर, अधांतरी लोंबकळत,
खडकाच्या मगरमिठीत कुजण्याची, सडण्याची!
ऐका! थांबवा हा आक्रोश माझ्या सध्याच्या वेदनांसाठी
चालविलेला.
उतरा खाली धरतीवर. माझ्या भविष्यात काय लिहिले आहे
ते विधिलिखित सांगतो तुम्हाला.
अगदी सगळे जाणून घ्या अथपासून इतिपर्यंत.
करा मी सांगेन तुम्हाला ते. कराच! व्हा दु:खात सहभागी
ज्याच्यावर ती पाळी आली आहे त्याच्या.
दु:ख म्हणजे एक भटक्या–
भ्रमंती करीत जातो अनेकांच्या भेटीला,
प्रत्येकासाठी नेहमी आणतो एकमेव भेट!

सागरकन्यावृंद : उत्सुक आहोत आम्ही, प्रोमीथ्यूस,
तुझ्या आवाहनाला प्रतिसाद देण्यासाठी.
चला, भगिनींनो, सोडा स्थाने आपापली,
पक्षांच्या पवित्र राजमार्गावरून उडणाऱ्या नौकेतील,
अन् उतरा हलक्या पावलांनी या खडकाळ भूमीवर.
ऐकण्याला उत्सुक आहोत प्रोमीथ्यूस आम्ही अखेरपर्यंत,
कहाणी तू भोगलेल्या सगळ्या व्यथांची.
(सागरकन्यावृंद नौकेतून बाहेर पडतो. तेथील भूमीवर सर्वजणी
गोळा होत असतानाच पंख असलेल्या एका चतुष्पाद प्राण्यावर
आरूढ झालेला ओसिआनस तेथे अवतीर्ण होतो.)

ओसिआनस : हा! पोचलो येथे मी अखेर!
फार दूरवरून आलो आहे तुला भेटण्यासाठी प्रोमीथ्यूस!
या वेगवान पंखांच्या प्राण्याला गती देत,
जोरावर केवळ इच्छाशक्तीच्या, कुठलाही लगाम न लावता.

विश्वास ठेव मजवर, खरोखरच व्यथित आहे मी
तुझ्यावरील दुर्दैवाच्या फेऱ्यांमुळे.
आप्त आहे ना तुझा मी, म्हणूनच मला वाटते
सहानुभूती तुझ्याविषयी.
पण हे नाते ठेवले बाजूला,
तरी एकंदरीतच दुसरा कोणी नाही मला वाटत
तुझ्याहून अधिक आदरणीय.
अगदी सत्य आहे हे. प्रमाण देईन मी त्याचे तुला,
कारण निव्वळ खुशामतीची कला अवगत नाही मला.
तर मग आता सांग.बोल,काय करू मी तुला मदत करण्यासाठी?
कधी म्हणू शकणार नाहीस तू, प्रोमीथ्यूस,
की ओसिआनसपेक्षा अधिक सच्चा मित्र आहे तुला कोणी म्हणून.

प्रोमीथ्यूस : काय चाललं आहे हे? कोण आलंय ते?
असं! तूही आलास तर
मी कसा तडफडतोय ते पाहाण्यासाठी?
कसा आलास सोडून तुझी ओसिॲनस नदी,
अन् तुझ्या नैसर्गिक गुंफा खडकाळ छपराच्या?
कशी झाली हिंमत तुझी,
भेट देण्याची या लोह-धारिणी धरती मातेला?
कशासाठी आलास इथं? माझा छळ एकटक पाहाण्यासाठी?
अन् माझ्या दुःखात तुझ्या दुःखाची भर घालण्यासाठी?
पहा, पहा, हे विलक्षण दृश्य!
हा मी– झ्यूसचा मित्र,
माझ्याच साहाय्याने प्रस्थापिली त्याने सार्वभौम सत्ता स्वतःची.
त्यानेच पहा हे किती भयंकर यातनांचे शासन केले आहे मला!

ओसिआनस : ते पाहातोय मी, प्रोमीथ्यूस,
अन् तू स्वतः जरी कुशाग्र बुद्धी आहेस,
तरी मला शक्य तो उत्तम सल्ला देऊ इच्छितो मी तुला.

देवांवर राज्य आले आहे आता एका नव्या राजाचे;
म्हणून तूही आत्मशोधन कर
आणि अंगिकार कर नव्या मार्गांचा,
या बदलत्या काळाशी जुळते घेण्यासाठी.
तू अशा प्रकारे बोचऱ्या आणि संतप्त
भाषणांच्या फेकी करीत राहिलास तर,
– तर कदाचित् त्या झ्यूसच्या कानी जातील –
जरी तो सिंहासनारूढ असला खूप उंचावर; –
परिणामी होईल तुझ्या यातनांचा कहर,
असा कहर की आजच्या यातनांचा बोजा वाटावा पोरखेळ!
हाय! माझ्या दुर्दैवी मित्रा!
झाडून टाक हा संतापाचा झटका
अन् शोधायला लाग मार्ग
या तुझ्या साऱ्या यातनांपासून मुक्ती मिळविण्याचा.
आता मी सांगतोय ते वाटेल कदाचित तुला निव्वळ चर्वितचर्वण!
पण प्रोमीथ्यूस! तुझी ही दु: खस्था
म्हणजे अटळ फलनिष्पत्ती आहे फाजील अहंकारी वाचाळ जिव्हेची
तू अजून नमत नाहीस, वेदनेपुढे शरणागती स्वीकारीत नाहीस;
अशाने घालून घेत आहेस भर सध्याच्या यातनांत नव्या यातनांची.
चल आता-ऐक माझा सल्ला:आपल्यावर राज्य आहे अशा एकाचे,
ज्याच्या कठोर आणि एकछत्री सत्तेला
आव्हान देण्याची हिंमत नाही कुणाची.
स्वीकार कर या वास्तवाचा, अन् बंद कर त्या अंकुशाविरूद्धची
लाथाळी.
जातो आता मी अन् पाहातो यत्न करून
काढण्याचा मार्ग तुझ्या मुक्ततेचा एखादा माझ्या आटोक्यामधला.
दरम्यान तू मात्र शांत राहा,
क्रोधावेग आवर आणि तुझी आरडाओरड बंद कर.
बुद्धिमान आहेस तू; हेही पूर्णपणे जाणतोस, की
जिव्हा बेलगाम झाली म्हणजे शिक्षा आहेच ठेवलेली.

प्रोमीथ्यूस : हेवा वाटतो मला तुझ्या सुदैवाचा, की
माझ्याबद्दल सहानुभूती बाळगण्याची हिंमत दाखवूनही
रोष झाला नाही झ्यूसचा तुझ्यावर.
आता जाऊ दे ते, आता नको करु अधिक विचार त्यावर.
काय वाटेल ते केलेस तरी
मन वळवू शकणार नाहीस तू त्याचे; अगदी अविचल आहे तो.
तू स्वत: मात्र सांभाळ, संकटात सापडशील आपल्या अशा वर्तनाने
तूच नाहीतर.

ओसिआनस : अधिक सूज्ञ सल्लागार आहेस तू– स्वत:पेक्षा इतरांचाच!
अनुभवांती हे दिसून आले आहे स्पष्ट मला.
पण जाण्याचा निर्धार पक्का आहे माझा,
तेव्हा बोलू नकोस त्याविरूद्ध अधिक काही आता.
खात्री आहे माझी- हो, आहेच खात्री,
झ्यूस नक्की करील विनंती मान्य माझी,
आणि माझ्याखातर करील तुला मुक्त
सोडून तुझी बंधने सगळी.

प्रोमीथ्यूस : धन्यवाद. सदैव ऋणी राहीण मी तुझा.
सदैव असू दे सद्भाव तुझा, एवढेच माझे जास्तीत जास्त मागणे.
पण करू नकोस माझ्यासाठी एवढीशीही हालचाल,
निष्फळ होईल तुझा खटाटोप;
जे काही करण्याचा विचार असेल तुझा,
ते सारे निरर्थक ठरेल माझ्या बाबतीत.
म्हणून म्हणतो काही सुद्धा करू नकोस,
आणि संकटाच्या वाटेला जाऊ नकोस.
मी यातनाग्रस्त असलो म्हणून
जास्तीत जास्त लोकांनीही यातनाग्रस्त व्हावे
अशी मुळीच इच्छा नाही माझी. उलट ते होऊ नये
असेच तीव्रतेने वाटते मला.
ॲटलासच्या नशिबी आलेले भोग हे मोठे दु:ख आहे माझे-

माझाच बंधू तो–तो तिकडे दूरवर पश्चिमेकडे,
अवजड ओझे पाठीवर पेलून उभा आहे
– स्वर्ग आणि पृथ्वीच्या स्तंभाचा भार–
कीव येते मला टायफॉनची–
तो पृथ्वीवर जन्मलेला, विध्वंसक राक्षस,
सहस्त्रशीर्ष, सैलिशिअन गुंफांचा निवासी–
पाहिले आहे मी त्याला–
सगळे त्याचे प्रखर सामर्थ्य बलपूर्वक दडपून टाकलेल्या अवस्थेत,
उभा ठाकला होता तो
एकजूट केलेल्या देवांच्या विरुद्ध,
फूत्कार टाकीत अघोरी, आपल्या भयंकर जबड्यांतून.
लखलखली त्याच्या नेत्रांतून एक विकट तेजशलाका,
वाटले आता करणार ही विध्वंस झ्यूसच्या सिंहासनाचा.
पण झ्यूसचे सदा-जागृत शस्त्र कोसळले त्याच्यावर.
होरपळून निघाला तो त्या कडाडून आदळणाऱ्या
वज्राच्या दाहक वाफांनी.
सगळ्या त्याच्या लंब्याचवड्या बढाया,
सुरुंग लागावा तशा उडाल्या दूर;
अचूक वेध घेतला त्या अस्त्राने त्याच्या हृदयाचा,
अन् झाली गंधकमय राख सगळ्या त्याच्या शक्तीची.
आहे आता तो दडपलेला
एट्ना पर्वताच्या तळाशी, समुद्राच्या आखाताजवळ,
अस्ताव्यस्त पसरलेला असहाय्य असा एक सांगाडा;
आणि वर शिखरावर
हेफीस्टस घालतो आहे घण लाल तप्त लोखंडावर.
आणि तेथूनच एक दिवस
उफाळून उसळतील प्रवाह ज्वालांच्या नद्यांचे,
अन् आपल्या अक्राळविक्राळ जबड्यांनी
गिळून टाकतील सुपीक सिसिलीच्या रसरशीत मखमली शेतांना.
असे फूत्कार टाकील टायफॉन,
जरी कोळसा झालेला असेल त्याचा झ्यूसच्या अस्त्राने;

तरी उकळत्या फुटतील त्याच्या जबड्यातून क्रोधाच्या,
भयंकर फवारे सोडणाऱ्या ज्वलंत फेसाच्या,
अशा की ज्यांना कोणी शमवू शकणार नाही.
पण तूही अननुभवी नाहीस;
गरज नाही तुला माझ्या सूचनांची.
आत्मरक्षण कर – कसे ते ज्ञात आहेच तुला.
दरम्यान मी पिऊन टाकतो माझ्या दु:खाचा पेला,
अगदी शेवटच्या थेंबापर्यंत,
झ्यूसच्या क्रोधाचा पारा उतरेपर्यंत.

ओसिआनस : तू हे शिकला नाहीस का, प्रोमीथ्यूस,
की क्रोध हा विकार आहे एक,
जो शब्दांनी बरा होऊ शकतो?

प्रोमीथ्यूस : हो ना– पण योग्य क्षणी त्याचे शमन केले तर,
उसळत्या क्रोधाला आडदांडपणे अडवण्याने नव्हे.

ओसिआनस : हे मला सांग, प्रोमीथ्यूस, धाडस केले जर मी
तुझ्याविषयी सहानुभूती दाखवण्याचे,
तर तेवढ्यानेही काही धोका संभवतो?

प्रोमीथ्यूस : अनावश्यक श्रम आणि उथळ बुद्धीचा मूर्खपणा.

ओसिआनस : तर मग मूर्खपणाचा दोष पत्करीन मी. कधीकधी
शहाण्या माणसाचा हेतू साध्य होतो,
तो शहाणा नाही असा समज झाल्याने.

प्रोमीथ्यूस : इथे मात्र शहाणपणाच्या अभावाचा दोष येईल तो मजवर.

ओसिआनस : ही तऱ्हा तुझी बोलण्याची
म्हणजे माझी घरी उघडउघड रवानगीच की!

प्रोमीथ्यूस : तर काय मग! खरेच आहे ते.
दाखवून दया मजवर, निर्मिते आहेस
तू एक शत्रू स्वत:साठी, अशी भीती वाटते मला.

ओसिआनस : कोणता शत्रू? तो नव्याने सिंहासनाधिष्ठित झालेला सर्वशक्तिमान स्वामी?

प्रोमीथ्यूस : सांभाळून रहा! संतापून उठेल तो.

ओसिआनस : तुझ्या नशिबीचे भोग हा एक धडाच आहे मला, प्रोमीथ्यूस.

प्रोमीथ्यूस : जा! निघ येथून! जसा खरा आहेस तसाच वागत जा!

ओसिआनस : जाण्यासाठी मीही आहे आतुर; गरज नाही ओरडण्याची.
या चतुष्पाद प्राण्याने केलाच आहे प्रारंभ पंख फडफडवून
अवकाशातील निष्कंटक मार्ग आक्रमिण्याला.
होय, चांगलाच आनंद होईल त्याला
मिळेल जेव्हा पहुडण्याला स्वगृही आरामात
प्राणिशाळेत स्वस्थानावर.
**(ओसिआनस जातो.)**

सागरकन्यावृंद : मला रडू येते, प्रोमीथ्यूस, तुझी ही भयंकर अवस्था पाहून.
अश्रू वाहताहेत माझ्या नेत्रांतून,
पाझरतो आहे त्यांचा मंद प्रवाह,
धुऊन काढतो आहे माझे कपोल,
एखाद्या निर्झराप्रमाणे.
हे केविलवाणे दृश्य,
आहे एक प्रचीती,
झ्यूसच्या अहंकारी सत्तेची–
स्वनिर्मिती नियमांनुसार
भूतपूर्व देवांवर.

तो गाजवीत असतो आधिपत्य;
आता प्रत्येक प्रदेश
व्याकुळ होऊन करीत आहे आक्रोश:
युरोपचे सारे लोक झाले आहेत शोकाकुल
तुझ्यासाठी आणि टायटन वंशासाठी,
स्मरतात तुझी दैदीप्यमान, प्राचीन राजवट
आणि तुझे स्थान मानाचे:
आणि वस्ती करून राहिलेल्या सगळ्या जमाती,
पवित्र आशियाच्या भूमीवरील कुरणांत गुरे चरविणाऱ्या,
त्याही करताहेत आक्रंदन तुझ्यासाठी,
आहेत सहभागी त्याही तुझ्या दु:खात;
कॉल्किस देशातील त्या अॅमाझॉन स्त्रिया,
युद्धात निर्भयपणे झुंजणाऱ्या त्या कुमारिका;
थेट जगाच्या टोकाला,
मेओटिस सरोवराच्या किनाऱ्यावर राहाणाऱ्या
सिदिअन लोकांच्या टोळ्या;
कॉकेशस पर्वताजवळ डोंगराच्या कड्यावरील
आपल्या किल्ल्याचे रक्षण करणारे अरेबियाचे झुंजार राजे,
ज्यांच्या युद्धगर्जनांनी धडकी भरते
तीक्ष्ण भाले पारजणाऱ्या भालाइतांच्या उरात,
तेही करताहेत रुदन तुझ्यासाठी.

यापूर्वी पाहिला आहे मी फक्त एकदाच,
टायटन वंशाचा कोणी एक देव अशा यातना भोगताना
झालेला निष्प्रभ अभेद्य बंधनांनी–
तो म्हणजे अॅटलास,
शक्तीसामर्थ्यात अतुलनीय–
जो वाहातो पाठीवर ओझे आकाशाच्या घुमटाचे,
आणि कण्हतोय त्या ओझ्याने दडपून;
आणि प्रचंड लाट विशाल सागराची
गरजते त्याच्या दु:खाशी एकरूप होऊन,

सखोल जलप्रवाह– तेही करताहेत रुदन;
मृत जगताच्या गुंफांतील अंध:कार
पुटपुटतो आहे दबलेल्या आवाजात खोलावर
अन् प्रवाही सरितांचे पवित्र झरे,
करताहेत रुदन व्याकुळ होऊन त्याच्या दु:खाने.

प्रोमीथ्यूस : मी गप्प आहे त्याचे कारण
मी गर्विष्ठ आहे अथवा हटवादी आहे
असे समजू नकोस.
नाना विचार आणि क्रोध कुरतडताहेत अन्त:करण माझे,
पाहून माझी स्वत:ची ही विटंबना.
अरे! कोणी दिले या नव्या देवांना त्यांचे सगळे मानसन्मान–
अथपासून इतिपर्यंत? मीच ना?
ते सगळे जाणतोसच तू. मी बोलणार नाही त्याबद्दल.
आता ऐक मी काय केलंय
मर्त्य जनांसाठी, त्यांच्या आपत्काली .
आधी होते ते मनरहित, दिले त्यांना मन आणि बुद्धी.
बोलत नाही हे मानवजातीची निंदा करण्यासाठी मी
तर तुला हे कळावे म्हणून
की त्यांना देणग्या दिल्या त्या सगळ्या सद्हेतुने प्रेरित होऊन.
त्या काळी त्यांना डोळे होते, पण दृष्टी शून्यवत् होती;
आवाज कानात शिरत होते, पण जाणीवपूर्वक ऐकता येत नव्हते;
समग्र जीवनपथ ते आक्रमीत –
संभ्रमित, हेतूशून्य अशा स्वप्नांतील धूसर आकृतींसारखे;
सूर्यकिरणांची ऊब असलेली विटांची घरे, सुतारकाम,
कशाचीच काही कल्पना नाही त्यांना;
कुठल्यातरी खबदाडात वस्ती करून राहात,
वारुळातील मुंग्यांच्या झुंडीसारखे
किंवा खोलवर गुहांमध्ये– जिथे पोचत नव्हता सूर्यप्रकाश;
हिवाळयाचा प्रारंभ, फुलांनी बहरलेला वसंत,
किंवा त्यापाठोपाठ येणारा फळांनी समृद्ध ग्रीष्मऋतू–

हे ऋतुचक्राचे भ्रमण
निश्चितपणे ओळखण्याचे ज्ञान नव्हते त्यांना.
प्रत्येक कृत्य होते त्यांचे ज्ञानशून्य, निर्बुद्ध–
माझे आगमन होईपर्यंत.
मीच शिकवली त्यांना कठीण विद्या
तारकांच्या अस्तोदयांच्या कालनिर्णयाची.
संख्यागणना शास्त्रांचा मूलारंभच तो– मीच निर्मिला तो त्यांच्याकरिता,
उच्चारित शद्बांना लिखित संकेत देण्याची कला–
– कौशल्यच ते सगळे स्मृतीत जतन करून ठेवण्याचे–
जन्मदाते अनेक कलांचे.
पशूंना मानेवर जू देऊन,
रथाला जोडून अथवा खोगीर चढवून
माणसाचे गुलाम बनविणारा–
अती अवजड ओझी वाहण्याच्या कामाला
माणसांऐवजी पशूंना जुंपणारा
मीच पहिला.
अश्वाला रथाला जुंपला मी,
लगाम लावून काबूत आणला त्याला,
आणि वैभवाचे, मोठपणाचे भूषण बनविला.
नाविकाचा गाडा– तागाचे पंख लावून
समुद्रात संचार करणारे गलबत–
त्याचाही शोध कोणी लावला नव्हता माझ्यापूर्वी.
अशी अवजारे अन् अशी कसबे
शोधून काढली मी मानवासाठी.
पण मी स्वत: मात्र असा दुर्दैवी की माझी या यातनांतून सुटका करणारी
एक सुद्धा क्लृप्ती अवगत नाही मला.

सागरकन्यावृंद : दीनवाणेपणा येतो असा यातनांच्या पाठोपाठ; संभ्रमित अवस्थेत
मनाच्या हरवून बसला आहेस तू मार्ग स्वत:चा;
वैद्य असावा एखादा अल्पज्ञानी, पडावा आजारी तो स्वत:,

मग सापडत नाही औषधी
रोगमुक्तीची त्याला स्वतःच्या
तद्वत् झाली आहे नैराश्यग्रस्त अवस्था तुझी.

प्रोमिथ्यूस : मला अजून सांगायचे बाकी आहे,
ऐकून घे ते नीट. कोणत्या कला, कोणत्या रीती,
शोधून काढल्या मी– ऐकून आश्चर्य द्विगुणित होईल तुझे.
सर्वांत महत्त्वाची पहिली गोष्ट :
जरी आजारी पडला कोणी माणूस, उपाय नव्हता त्याला निरामय करण्याचा कसलाच ज्ञात :
घन वा द्रव्य प्राश्य औषधी वा मलम एखादे;
औषधाच्या अभावी झिजत जाणे हेच माणसांच्या नशिबात.
हे असंच चाललं होतं,
सौम्य औषधी वनस्पतींच्या मिश्रणाने
सर्व व्याधींपासून रक्षण करण्याचे उपाय
मी त्यांना दाखवीपर्यंत.
मग मी संशोधिल्या नाना रीती भविष्य वर्तविण्याच्या,
स्वप्नांचा अर्थ लावून विधिलिखितानुसार काय घडणार आहे ते सांगणाराही मीच प्रथम.
विविध प्रकारचे आवाज, ध्वनी, दृश्ये– सहज मार्गावर दिसणारी–
या सर्वांचा गूढ अर्थ उकलून दाखविणाराही मीच.
वक्र नख्यांचे पंजे असलेली गिधाडे–
त्यांच्या भिन्न भिन्न प्रकारांच्या उड्डाणांचा प्रस्थापित केला मी काटेकोर अर्थ.
सुचिन्हे कोणती, व कोणती दुश्चिन्हे,
प्रत्येक प्राणिजात कशी जीवन जगते
आपापल्या विशिष्ट रीतीने;
भिन्न भिन्न जाती कोणती जतन करतात
परस्परांतील वितुष्टे, कोणते स्नेह, लागेबांधे,
कसा ओळखावा आशय हवनातील लक्षणांचा,
मृदु हृदय अन् मुलायम प्रकाश,

प्रत्येकातील कोणते रंग देवांना प्रसन्न करणारे,
यकृताच्या लोलकांचा ठिपक्याठिपक्यांचा सबक घाट
या सर्वांचे ज्ञान मीच दिले मानवांना.
ज्वालेवर धरी मी चरबीने वेढलेली हाडे मांडीची, आणि लांब कणा पाठीचा,
गूढविद्येचा महामार्ग मानवांना दाखविण्यासाठी;
अन् ज्वालांमधून व्यक्त होणाऱ्या चिन्हांचे
पूर्वी अनाकलनीय असलेले गूढ, मीच दाखविले त्यांना उलगडून.
हे झाले भविष्यज्ञानाविषयी. नंतर भूगर्भातील संपत्ती,
ब्रॉंझ, लोह, रौप्य, सुवर्ण खोलवर दडलेले–
यांचाही शोध प्रथम लावल्याचा दावा कोण करू शकतो माझ्याशिवाय?
कोणी केलाच तर खुशाल समजा ती कोणा मूर्खाची बडबड!
तर मग संपूर्ण सत्य सांगतो आता एका शब्दात:
सगळे मानवी तंत्रज्ञान अन् विज्ञान म्हणजे केवळ देणगी प्रोमीथ्यूसची.

सागरकन्यावृंद : परिणामी स्वतःला क्लेश होईपर्यंत केलीस मदत मानवाला,
आता मात्र करू नकोस दुर्लक्ष
या यातनांपासून आत्मरक्षण करण्याकडे.
आशा बाळगून आहे मी,
अजूनही मुक्तता होईल तुझी अन्
सत्तेच्या बाबतीत स्पर्धा करशील तू झ्यूसशी.

प्रोमीथ्यूस : दैव सारे काही पार पाडते क्रमाक्रमाने;
पण या घटनांची अशी परिणती
मंजूर नाही नियतीला अजून.
माझ्या नशिबी लिहिलेली आहे मुक्तता
अगणित यातना भोगल्यानंतरच.
युक्तीप्रयुक्ती ठरते दुर्बल अटळ नियतीपुढे.

सागरकन्यावृंद : आणि कोणाच्या हाती असते नियंत्रण
सुकाणूचे अटळ नियतीच्या?

प्रोमीथ्यूस : तीन नियती देवता आणि क्रोधदेवता–
ज्यांना विस्मरण होत नाही कशाचे.

सागरकन्यावृंद : झ्यूची शक्ती कमी आहे त्यांच्यापेक्षा?

प्रोमीथ्यूस : टाळता येणार नाही दैवगती त्याला सुद्धा.

सागरकन्यावृंद : चिरंतन सत्ता– यापरते काय दैव असणार झ्यूसचे?

प्रोमीथ्यूस : ही एक गोष्ट अशी आहे की तुला नाही कळण्याजोगी,
म्हणून पृच्छाही करू नकोस तिच्याबद्दल.

सागरकन्यावृंद : काहीतरी पवित्र सत्य असावे ते,
ज्याला तू देतो आहेस गूढतेचे आवरण.

प्रोमीथ्यूस : दुसरा कसला तरी विचार कर; ही नाही वेळ
त्या गोष्टीसंबंधी बोलण्याची. असे गुपित आहे ते की
ज्याची गोपनीयता राखलीच पाहिजे, हरप्रयासाने.
ते गुपित राखण्यानेच सुटणार आहे मी
या मानहानीच्या तुरुंगातून अन् या भयानक वेदनांतून.

सागरकन्यावृंद : सर्व गोष्टींची सूत्रे हालविणारा झ्यूस
न करो उपयोग कधी त्याच्या सत्तेचा
माझी इच्छाशक्ती चिरडून टाकण्यासाठी!
ना येवो कधी कंटाळा मला
बैलांच्या पवित्र बलिदानाने देवांची आराधना करण्याचा,
मत्पिता ओसिआनस याच्या अखंड प्रवाहाच्या किनाऱ्यावर.
शद्वानेही दुखावले न जावोत ते देव माझ्याकडून,
हा निर्धार अविचल राहो सदैव माझ्या हृदयात.

किती सुखाची गोष्ट आहे व्यतीत करणे समग्र जीवन

## शृंखलाबद्ध प्रोमीथ्यूस

विश्वास अन् आशेच्या बळावर
आणि वाढविणे आत्मबल
प्रकाशाच्या व आनंदी वृत्तीच्या आधारे.
पण थरकाप होतो माझा प्रोमीथ्यसु,
जेव्हा पहाते मी तुला अनंत यातनांनी व्याकुळ होताना.
कारण तुला नाही वाटत भय झ्यूसचे,
पण पाठपुरावा करताना स्वत:च्या ध्येयाचा
भलताच आदर दाखवतोस तू मर्त्य मानववंशाविषयी.

पाहतो आहेस ना मित्रा,
किती निष्फळ ठरले आहेत तू केलेले सर्व उपकार!
हे सांग मला की सामर्थ्य आहे कितीसे, अन् कशात,
काय मदत मिळणार मानवाकडून ज्याचे आहे जीवन अवघे एक दिनाचे?
लक्षात आली नाही तुझ्या असहाय दुर्बलता,
—क्षीण एखाद्या स्वप्नासारखी— जी जखडून टाकते
मानवांच्या आंधळ्या जमातींना बंधनात?
कारण मानवी ध्येयांची झेप जाऊ शकत नाही
उल्लंघून सुसंवादित्व झ्यूसच्या शासनाचे.

तुझ्या पतनाने मला शिकविले हे सत्य, प्रोमिथ्यूस.
माझ्या कानांना जाणवतो आहे फरक दोन आवाजांतील.
पहिले आवाज आजच्या दु:खाचे,
अन् दुसरे— त्या गीतांचे सूर,
जी गीते गाईली आम्ही तुझ्या विवाहाच्या मांगल्याप्रीत्यर्थ.

एक गीत स्नानाचे, एक गीत शय्येचे,
जेव्हा तू केलेस प्रणयाराधन, दिलेस नजराणे,
आणि माझी भगिनी हेसिओने हिची
करून घेतलीस प्राप्ती, आपली विवाहित वधू म्हणून.
**(आइओ प्रवेश करते.)**

**आइओ :** कोणता देश आहे हा? कोणा वंशाचे लोक राहातात इथे?
कोण दिसतो आहे मला हा माझ्यासमोर शृंखलांनी खडकाला जखडलेला,
वाऱ्याच्या आणि वादळांच्या तडाख्यात सापडलेला?
कोणत्या पापाची शिक्षा म्हणून भोगतो आहेस तू हे असले मरण?
सांग मला, कोठे आणून सोडले आहे मला, माझ्या दुःखमय भ्रमंतीने?
**(वेदनेने व भयाने एकदम किंचाळते.)**
पुनः डंख मारला या गोमाशीने मला. हाय! हाय!
हे आर्गसचे भूत दिसते आहे मला–
भूतलावर जन्मलेला सहस्त्राक्ष गुराखी!
हे देवांनो! दूर ठेवा त्याला माझ्यापासून!
मृत्युमुखी पडला होता तो, पण कोणतीच भूमी
पोटात दडवून ठेऊ शकत नाही त्याला;
पिच्छा करते आहे माझा त्याची लबाड एकटक नजर.
आपल्या थडग्यातून निसटला आहे तो
निर्दयपणे माझा पाठलाग करण्यासाठी,
अन् दौडवतो आहे मला भुकेल्या पोटी, वालुकामय किनाऱ्यावरून.
आणि इकडे हे प्रसन्न संगीत– मेणांनी लिंपलेल्या वेणूतून प्रकटणारे
ज्याचे सूर शिरताहेत माझ्या कानात
अन् करताहेत मला निद्रातुर.

कुठे नेणार? कुठे?
कुठे नेऊन सोडणार आहे मला ही अंतहीन भ्रमंती माझी?
सांग, क्रोनॉसच्या पुत्रा! काय केले आहे मी?
कोणते पाप दिसले माझ्यात तुला,
म्हणून चढविलेस माझ्यावर हे यातनांचे जोखड,
ही डसणारी, सतत पुढे पिटाळणारी पीडा
नेमलीस मला पिडण्याला, छळवादाने वेडीपिशी करण्याला?
जाळून टाकू दे मला अग्नी,
गिळून टाकू दे मला पृथ्वी,
टाक माझा देह भक्ष्य म्हणून सागरी सर्पांना–

हे सर्वसत्ताधारी देवा! माझी एवढी प्रार्थनाही मान्य करणार
नाहीस तू?
ही येथवर भटकत आले मी,
भ्रमंतीचीच पुरेशी शिक्षा भोगली आहे मी;
समजत नाही मला सुटका होणार कशी माझी या वेदनांपासून.
ऐकू येतोय माझा आवाज तुला? मी आइओ – ती शृंगधारी मुलगी
रे मी!

प्रोमीथ्यूस : ऐकू येतोय मला खरंच
भ्रमिष्टावस्थेतील इनॅकस-कन्येचा आर्त स्वर,
जिला पाहून प्रज्वलित झाली झ्यूसच्या अन्तःकरणात प्रीतीची ज्योत,
आणि जाते आहे जी आता द्वेषापायी हेराच्या
तिचा क्रूर पाठलाग करणाऱ्या यातनांच्या दीर्घ दिव्यातून.

आइओ : माझ्या पित्याचे नाव उच्चारलेस तू–
कसे माहीत झाले तुला ते?
मला सांग कोण आहेस तू–
माझ्यासारख्याच केविलवाण्या अवस्थेत असणारा?
मी कोण, ते जाणतोस तू,
अन् तिचेही अचूक नाव घेतलेस तू,
जी पाठवली गेली स्वर्गातून मला यातना देण्यासाठी,
जी उध्वस्त करीत आहे माझे जीवन
अन् डंखांनी सारखी पुढे पुढे पिटाळते आहे मला.
अविश्रांत धावते आहे मी,
यातना आणि भूक यांच्या उसळणाऱ्या उन्मादात;
हेराच्या हिशेबी वृत्तीतून उद्‌भवलेल्या कोपाचा बळी बनलेली.
आले आहे का या साऱ्या दुःखी जगात
माझ्याइतके दुःख कुणाच्या वाट्याला?
आणखी काय काय भोगावे लागणार आहे मला–
कोणता उपाय, कोणते साधन वाचवू शकेल मला,
सगळे स्पष्ट सांगून टाक मला.

बोल तुला माहीत असेल तर.
तुझे साहाय्य, तुझे मार्गदर्शन
दे या निर्वासित, पीडित कुमारिकेला.

**प्रोमीथ्यूस :** स्पष्ट सांगेन तुला, तू जाणू इच्छितेस ते सगळे–
रहस्यमय शद्बांचे जाळे न विणता,
अगदी साध्या, सोप्या भाषेत,
जसे बोलतो आपण निकटच्या स्नेह्यापाशी.
मी आहे प्रोमीथ्यूस–
मानवाला अग्नीचे वरदान देणारा– तोच मी.

**आइओ :** तू! मानवजातीचे कल्याण करणारा
म्हणून सर्वमान्य झालेला–
पण पुढे कमनशिबी ठरलेला प्रोमीथ्यूस!
कशापायी हा सूळ आला तुझ्या नशिबी?

**प्रोमीथ्यूस :** व्यथा उगाळीतच होतो मी माझ्या वेदनांची,
पण आता थांबवला आहे मी माझा आक्रोश.

**आइओ :** एक सांगणार नाहीस मला–

**प्रोमीथ्यूस :** विचार. सगळे सांगण्याची तयारी आहे माझी.

**आइओ :** तर मग सांग,
कोणी जखडून ठेवले तुला भक्कम
या डोंगरकपारीतील प्रदेशात?

**प्रोमीथ्यूस :** झ्यूसच्या इच्छेने सुटले फर्मान.
अमलात आणणारे हात हेफीस्टसचे.

**आइओ :** अशी पापे तरी कोणती होती तुझी,

ज्यासाठी ही शिक्षा भोगतो आहेस तू?

प्रोमीथ्यूस : मी तुला सांगितले तेवढेच पुरे आहे.

आइओ : मग एवढे तरी उलगडून सांग :
कोठे होणार आहे अंत या माझ्या शापित भ्रमंतीचा, अन् कधी?

प्रोमीथ्यूस : तू हे जाणण्यापेक्षा न जाणलेलेच अधिक श्रेयस्कर.

आइओ : जे भोग भोगणे नशिबात असेल माझ्या—
लपवू नकोस माझ्यापासून त्यांची माहित.

प्रोमीथ्यूस : तू जे हे मला विचारतेस,
त्याबद्दल कोणताही आक्षेप घ्यायचा नाही मला.

आइओ : मग मला संपूर्ण सत्य सांगण्यास कचरतोस कशासाठी?

प्रोमीथ्यूस : सद्भावाच्या अभावी नव्हे. मी कचरतो आहे फक्त
तुझे अन्त:करण विदीर्ण होऊ नये यासाठी.

आइओ : हे पहा, माझ्या अपेक्षेपेक्षा
अधिक विवंचना करू नकोस तू माझी.

प्रोमीथ्यूस : एवढा निर्धारच आहे तुझा
तर मला सांगितलेच पाहिजे. ऐक तर मग.

सागरकन्यावृंद : एवढ्यात नको सांगू. आम्हालाही सहभागी व्हायचे आहे त्या आनंदात.
आधी आम्हालाच सांगू दे या आइओला
कथन करण्याला कहाणी तिच्या पीडेची,
ऐकायची आहे आम्हाला तिच्याच मुखातून कथा तिच्या विनाशाची.
नंतर मग ऐकू दे तिला तुझ्याकडून

कोणते कर्मभोग अजून भोगावयाचे आहेत तिला.

**प्रोमीथ्यूस :** त्यांची विनंती मान्य करणे तुझ्या हाती आहे, आइओ;
त्या तुझ्या पित्याच्या भगिनी आहेत म्हणून
साक्षेपाने अधिकच लक्ष घालावे तू या बाबतीत.
अश्रू अन् वेदनांच्या कहाण्या सफल तेव्हाच होतात,
जेव्हा ऐकणाऱ्यांच्याही नेत्रांत उभे राहातात अश्रू सहानुभूतीचे.

**आइओ :** मी अमान्य करू शकणार नाही तुमची विनंती.
ज्या घटनांपायी हे भोग प्रथम आले माझ्या वाट्याला,
आणि घडून आले माझे हे दुःखदायक परिवर्तन,
त्यांच्या नुसत्या उच्चाराने सुद्धा
वाहू लागतात अश्रू माझ्या नेत्रांतून.
तरीसुद्धा जे ऐकायचे आहे तुम्हाला,
ते सांगतेच अगदी सारे साध्या, सरळ शब्दांत.
माझ्या स्वतःच्याच शयनगृहात
रात्रीच्या वेळी मला स्वप्ने पडत,
अन् वारंवार भुलवणारे, भुरळ पाडणारे
शब्द माझ्या कानी येत.
'हे अत्यंत भाग्यवान ललने!
इतकी दीर्घकाळ कौमार्यदशेत कां राहतेस तू?
प्रीती तिष्ठत आहे तुझ्यासाठी–
तो सर्वश्रेष्ठ : झ्यूस,
कामशरांनी पेटून उठलेला,
आतुर आहे तुझ्याशी रत होण्याला.
माझ्या मुली, नाकारू नकोस झ्यूसची शय्यासोबत.
लेर्नामधील त्या गवताच्या दाट कुरणात जा,
जिथे गेलीस तू म्हणजे आतुरता निमेल झ्यूसच्या नयनातली,
आणि तृप्ती अवतरेल तिथे कामातुर झ्यूसची?
अशा स्वप्नांनी होऊ लागली संत्रस्त माझी प्रत्येक रात्र,
अखेर मोठी हिंमत करून सांगितले ते मी माझ्या पित्याला.

## शृंखलाबद्ध प्रोमीथ्यूस

त्याने मग अनेकवार पाठवले दूर पायथो अन् डोडोनाकडे,
देवांना संतुष्ट करण्यासाठी त्याने काय करावे किंवा बोलावे
हे जाणून घेण्यासाठी.
ते परतले वृत्तांत घेऊन,
गूढ कोड्यांच्या भाषेतील नाना देववाणीचे,
सगळे संदिग्ध शद्बांत, ज्यांचा अर्थ लावणे कठीण.
पण अखेर मिळाला एक स्पष्ट संदेश :
ती होती निःसंदिग्ध शद्बातील आज्ञा इनॅकसला,
मला मुक्त करण्याची— घरातून, नगरातून—
गृहहीन होऊन भटकण्याला, पृथ्वीच्या सीमांपर्यंत देवसमर्पित म्हणून.
आणि हे करण्याला त्याने नकार दिला तर—
तर झ्यूसच्या ज्वलंत विद्युतप्रपाताने
वंश उखडून निघेल त्याचा— अखेरच्या माणसापर्यंत.
अशी होती लोक्शिअसची देववाणी.
मानली आज्ञा माझ्या पित्याने;
काढले त्याने मला बाहेर, झाले बंद दार घराचे मला,
— इच्छेविरूद्ध माझ्या, तसेच त्याच्या स्वतःच्याही.
पण भाग पाडले त्याला हे करण्यास
झ्यूसच्या सत्तेच्या क्रूर लगामाने.
एकदम झाले परिवर्तन माझ्या रूपात,
मनातही झाले विकृत बदल.
शिंगे उगवली माथ्यावर— जी पाहातोच आहेस तू.
गोमाशीच्या चावऱ्या अंकुशाने होऊन व्यथित,
— प्रक्षुब्ध, वेडीपिशी.
धावत सुटले पुढेपुढे— केर्चनिआच्या स्फटिकवत् प्रवाहाच्या
अन् लेर्नाच्या निर्झराच्या दिशेने.
करीत होता पाठलाग माझा,
अनियंत्रित क्रोधाने व्याप्त, राक्षसी देहाचा गुराखी, आर्गस,
नजर ठेवीत होता माझ्या प्रत्येक पावलावर,
आपल्या दशसहस्त्र नेत्रांनी.
पण अचानक, अनपेक्षित एक प्रहार झाला,

अन् मुकला आपल्या प्राणाला.
मी मात्र अजून गोमाशीच्या डंखाने वेडीपिशी,
पिटाळली जाते आहे एका प्रदेशातून दुसऱ्या प्रदेशात,
देवाने योजिलेल्या या आसुडाचे प्रहार अंगावर घेत.
अशी आहे माझी कहाणी.
अजून कोणते भोग भोगावे लागणार आहेत,
ते सांग, तू सांगू शकत असशील तर.
अन् निव्वळ मजवर दया म्हणून
असत्य सांगू नकोस माझ्या समाधानासाठी.
असत्य भाषण ही सर्वांत ओंगळ व्याधी मानते मी.

सागरकन्यावृंद : किती भयंकर ही दैवगती! किती अनुकंपनीय!
स्वप्नातही वाटले नव्हते मला,
कानी पडेल कहाणी इतकी विलक्षण;
वाटले नव्हते कधीच, की
इतक्या वेदना, इतके क्रौर्य, इतकी भयग्रस्तता–
जी पाहाणे अन् सहन करणेही क्लेशदायक–
गोठवून टाकील माझ्या चित्तवृत्ती, इतकी तीक्ष्ण जखम करून!
दैवगती! हाय! दैवगती!
कंप सुटलोय मला, आइओची ही कर्मगती पाहून.

प्रोमीथ्यूस : फार आधीपासूनच अश्रू ढाळते आहेस तू,
एखाद्या भेदरलेल्या स्त्रीसारखी.
थोपवून धर त्या अश्रूंना,
आता पुढे काय घडणार आहे ते ऐकेपर्यंत.

सागरकन्यावृंद : बोल तर मग. सांगून टाक तिला सगळे.
पुढे कोणत्या यातना भोगाव्या लागणार
हे आधीच कळले तर तेवढेच समाधान लाभते वेदनाग्रस्तांना.

प्रोमीथ्यूस : तुझी पहिली विनंती सहज मान्य केली होती मी–

आइओला कोणत्या दिव्यातून जावे लागले,
ती कहाणी तिच्याच तोंडून ऐकण्याची होती तुझी इच्छा.
आता ऐक उरलेली कहाणी –
हेराच्या अवकृपेपायी अजून कोणत्या यातना नशिबात आहेत
या तरूण कुमारिकेच्या, त्यासंबंधीची.
आणि इनॅकसच्या कन्ये! नीट ध्यानात घे माझे शब्द,
अन् जाणून घे अंतिम लक्ष्य तुझ्या सगळ्या भ्रमंतीचे.
येथून वळ आधी उगवत्या सूर्याच्या दिशेला,
मग चालत राहा कधी न नांगरलेल्या माळरानावर,
भटक्या सिदिअन लोकांच्या भूमीत पोचेपर्यंत,
जे राहातात वस्ती करून जमिनीपासून उंचावर,
मजबूत चाकांच्या गाड्यांवर बांधलेल्या, कामट्यांच्या छपरांच्या घरात.
प्रभावी धनुष्यांनी सुसज्ज असतात ते; अगदी दूर राहा त्यांच्यापासून;
जोराची गर्जना करणाऱ्या खडकाळ किनाऱ्यालगतची वाट धर,
अन् अशा प्रकारे त्यांचा देश ओलांडून पुढे जा.
पुढे मग तुझ्या डाव्या हाताला लागेल देश
लोहारकामात कुशल असलेल्या कॅलिबिस लोकांचा.
सावध राहा त्यांच्यापासून; अत्यंत क्रूर आहेत ते लोक,
सुरक्षित नसतो त्यांच्यासमीप जाणारा वयस्थ कोणी.
नंतर तेथून पुढे जा हायब्रिस्टिस नदीच्या तीरावर,
उच्छृंखलता प्रवाहाची सार्थ करते नाव ज्या नदीचे.
नदी पार करण्याचा प्रयास मात्र करू नकोस–
फारच धोका आहे त्यात–
थेट कॉकेशसला पोचेपर्यंत चालत राहा.
तिथे शिखर आहे त्या समग्र पर्वतराजीचे,
ज्याच्या अगदी टोकावरून उसळ्या मारीत उडी घेतो
प्रक्षुब्ध लोंढा नदीच्या प्रवाहाचा.
तिथला सर्वात उंच कडा,आकाशीच्या ताऱ्यांना जवळजवळ भिडणारा,
– तो पार करून जा, अन् मग धर वाट दक्षिणा पथाची.

तिथे मग गाठ पडेल तुझी लढवय्या,
पुरुषद्वेष्ट्या ॲमाझॉन वंशाच्या स्त्रियांची.
पुढे कालांतराने त्यांचा वंश स्थापना करील थेमिस्किरा नगराची,
थर्मोडॉनच्या सुळक्यावर –
सॅल्मिडेससचा खडबडीत जबडा जिथे ठाकला आहे सागरतीरी,
खलाशांचा वैरी, जहाजांना सापत्नमातेप्रमाणे छळणारा.
मोठ्या आनंदाने दाखवतील तुला त्या ॲमाझॉन स्त्रिया मार्ग पुढे जाण्याचा.
मग तिथे पोचशील तू जिथे एका जलाशयात प्रवेशाने एक अरुंद खाडी,
आणि येशील सिमेरिअन संयोगभूमीपाशी.
घे उडी मग बेधडक भूमीवरून
अन् करून जा पार सामुद्रधुनी मेओटिकची.
भावी युगानुयुगे वर्णिली जाईल कहाणी तुझ्या या वाटचालीची,
अन् नाव दिले जाईल त्या स्थानाला 'बॉसरस' तुझ्या संस्मरणार्थ.
अशा रीतीने पोचशील तू युरोपमधून आशिया खंडात.

दिसून नाही का आले तुला की या देवांच्या अधिपतीची
सगळ्या बाबतीत सारखीच प्रवृत्ती आहे हिंसाचाराची?
एक देव– होतो मीलनोत्सुक या मर्त्य युवतीशी,
अन् झोकून देतो तिला अशा या प्रवासाच्या आपत्तीत!
असा प्रियकर वाट्याला यावा हे केवढे तुझे दुर्दैव, आइओ!
अन् विश्वास ठेव माझ्यावर, की
आतापर्यंत जे सांगितले तुला मी, ती नुसती सुरुवात सुद्धा म्हणता येणार नाही जे सगळे अजून सांगायचे आहे त्याची.

**आइओ :** (रुदन करीत) हाय! हाय! सहन होत नाही हे मला!

**प्रोमीथ्यूस :** पुनः पुनः इतका आक्रोश– अन् इतके विव्हळणे!
जेव्हा बाकीचं ऐकशील तेव्हा काय होईल मग?

सागरकन्यावृंद : अजून तिला आणखी काही सांगायचं आहे का तुला,
दुर्दशा आणि वेदनांबद्दल?

प्रोमीथ्यूस : होय ना! अजून सांगायचं आहे तिला–
घातकी दुर्दशेचा वादळी सागर अजून आहे पुढे.

आइओ : मग मी जगू तरी कशाला?
त्यापेक्षा एकदम या खडकाच्या सुळक्यावरून
खाली उडी का नको टाकू?
मग ठिकऱ्या होतील या शरीराच्या
अन् सुटेन या यातनांचा छळ भोगण्यापेक्षा
एकदाच मरण पत्करलेले उत्तम!

प्रोमीथ्यूस : मग माझ्या वाट्याच्या यातना सहन करणे भारी जड जाईल तुला,
कारण माझ्या तर मरण सुद्धा नाही नशिबात.
मृत्यू आला असता तर सुटलो असतो या यातनांतून;
पण आता माझ्या यातनांचा अंतच नाही दृष्टिपथात–
जोपर्यंत पदच्युत होत नाही झ्यूस त्याच्या सार्वभौमत्वापासून.

आइओ : काय म्हणतोस? शक्यता आहे झ्यूसच्या पदच्युतीची?

प्रोमीथ्यूस : मला वाटतं तसं झालं तर आनंद होईल तुला.

आइओ : कसा राहील मला आनंद झाल्याशिवाय
त्याने हा एवढा माझा छळ केल्यावर?

---

• तळटीप : 'बॉस्परस' या ग्रीक शब्दाचा अर्थ ox ford म्हणजे 'बैलाने ओलांडलेला पुल, असा आहे. आइओ हिला झ्यूसच्या करणीने माथ्यावर शिंगे असलेल्या कालवडीचे रूप प्राप्त झाले होते, त्या संदर्भात 'बॉस्परस' नावाशी जोडलेली ही दंतकथा.

प्रोमीथ्यूस : निश्चित घडून येणार आहे तसेच.
मनाशी खूणगाठ बांध ते सत्य असल्याबद्दलची.

आइओ : कोण हिरावून घेणार आहे सत्ता झ्यूसची?

प्रोमीथ्यूस : स्वतःच्या मूर्खपणाच्या उद्दिष्टांपायीच
गमावून बसेल तो आपली सत्ता!

आइओ : कसे काय घडून येणार आहे ते? सांग ते मला–
अर्थात् त्यामुळे काही अनिष्ट होणार नसेल तर.

प्रोमीथ्यूस : तो योजतो आहे एक मीलन,
जे कारणीभूत होणार आहे त्याच्या विनाशाला.

आइओ : कोणाबरोबर? कोणी मर्त्य, की अमर?
सांग तेवढे– हरकत नसेल तर.

प्रोमीथ्यूस : कशाला विचारतेस कोणाबरोबर म्हणून?
ती एक गोष्ट अशी आहे की जी सांगू नये मी.

आइओ : तर मग तीच करील त्याला पदच्युत
त्याला त्याच्या सिंहासनावरून?

प्रोमीथ्यूस : ती जन्म देईल एका पुत्राला, जो होईल
अधिक सामर्थ्यवान स्वतःच्या पित्यापेक्षा.

आइओ : काही मार्ग नाही या दैवगतीतून झ्यूसच्या सुटकेचा?

प्रोमीथ्यूस : दुसरा कोणताच नाही– फक्त एकच, माझ्या मदतीचा.
मीच करू शकेन सुटका त्याची,
पण माझी मुक्तता झाल्यावर.

आइओ : पण झ्यूसच्या इच्छेविरुद्ध कोण मुक्त करू शकेल तुला?

प्रोमीथ्यूस : मला बंधमुक्त करणारा म्हणून
तुझ्याच एका अपत्याचे नाव झाले आहे निश्चित.

आइओ : काय म्हणतो आहेस तू हे? माझ्या अपत्याकडून
मुक्तता होणार आहे तुझी या शृंखलांतून?

प्रोमीथ्यूस : होय. तुझ्यानंतरच्या तेराव्या पिढीत--

आइओ : आकलन होत नाही मला तुझ्या या आताच्या भविष्यवाणीच्या आशयाचे.

प्रोमीथ्यूस : मग करू नकोस प्रयत्न आपले स्वत:चे भवितव्य जाणून घेण्याचा.

आइओ : एवढी कृपा करण्याचे कबूल केले होतेस तू;
मग आता नको देऊ नकार.

प्रोमीथ्यूस : दोनापैकी एकच भविष्य सांगू शकेन मी तुला.

आइओ : कोणती दोन ते सांग. मला संधी दे
त्यातून एकाची निवड करण्याची.

प्रोमीथ्यूस : एक म्हणजे तुझ्या उर्वरित प्रवासाचा आलेख,
अन् दुसरे, माझी मुक्तता करणाऱ्याचे नाव.
कर यातून निवड.

सागरकन्यावृंद : प्रोमीथ्यूस, त्यापैकी एक भविष्य सांग या आइओला,
अन् दुसरे आम्हाला एवढी कृपा कर आमच्यावर.
नको करू टाळाटाळ ते सांगण्याची.
आइओला उघड करून सांग तिचा सारा भावी प्रवास;

अन् तुझी मुक्तता कोण करील
ते भविष्य आम्हाला ऐकू दे.
फार आतुर आहे ते जाणून घेण्याला.

प्रोमीथ्यूस : इतक्या आतुर आहात तुम्ही, तर मीही नकार देणार नाही
तुम्हाला हवे ते सगळे सांगण्याला.
प्रथम तू ऐक, आइओ; तुला सांगतो
नावे त्या नाना प्रदेशांची
जिथे नियती झोकून देणार आहे तुला तुझ्या भ्रमंतीत.
रेखून घे आता मी सांगणार आहे ते आपल्या स्मरणपटलावर.
दोन खंडांच्या सीमेवरील जलप्रवाह पार केल्यावर
वेगाने पुढे जा, समुद्राच्या उसळत्या लाटांवरून, पूर्वेकडे,
जिथे डौलाने वर येतो सूर्य तळपत्या शलाकांनी.
पुढे मग लागेल गॉर्गनांची भूमी, सिस्थेनी.
तिथेच राहातात त्या वृद्ध कुमारिका– फोर्सीसच्या कन्या,
हंसाच्या आकाराच्या– तिघींच्यात एकच समाईक डोळा,
अन् एकच दात असलेल्या.
असे जीव जगणारे की ज्यांच्यावर पडत नाहीत कधी किरण सूर्याचे,
किंवा रात्रीच्या वेळी चंद्राचे. अन् जवळच त्यांच्यापासून
राहातात त्यांच्या तीन बहिणी, पंख असलेल्या–
मानवजातीच्या घृणास्पद वैरिणी,
सर्पकुंतला गॉर्गन, ज्यांच्यावर दृष्टी टाकल्यानंतर
जिवंत राहू शकत नाही कोणी मानव.
पण ही झाली नुसती सुरुवात.
आता ऐक आणखी एका भयंकर दृश्याबद्दल,
जे पाहावे लागणारे आहे तुला.
आवाज न करणारे, तीक्ष्ण चोचीचे ग्रिफिन * –
झ्यूसचे जणू शिकारी कुत्रे– सावध राहा त्यांच्यापासून.

---

* ग्रिफिन : मस्तक व पंख गरुडाचे, आणि शरीर सिंहाचे, असे प्राणी.
प्लूटस : धनदौलतीचा देव.

पॉसैडानचा त्रिशूळ,
ज्या भयानक असुधापुढे चळचळा कापतात भूमी आणि समुद्र.
हाच तो कडा– याच कड्यावर पडेल झ्यूसच्या सत्तेचा प्रहार
आणि इथेच ठरेल तो हतबल. मग समजून येईल, त्याला
केवढी खोल दरी असते शासक आणि शासित या दोघात.

सागरकन्यावृंद : झ्यूसच्या विरुद्ध उच्चारलेल्या या धमक्यांनी
तुझ्या स्वतःच्या इच्छाच व्यक्त करतो आहेस तू.

प्रोमीथ्यूस : जे नक्कीच खरे ठरणार आहे
तेच बोलतो आहे मी. अन् अर्थात् माझी इच्छाही आहे तीच.

सागरकन्यावृंद : झ्यूसला शरण आणील असा कोणी अवतरेल
अशी अपेक्षा बाळगावी तर मग आम्ही?

प्रोमीथ्यूस : होय. झ्यूसला मान वाकवावी लागणार आहे
माझ्या यातनांपेक्षांही अधिक दारुण यातनांखाली.

सागरकन्यावृंद : असे अवहेलनेचे शब्द भिरकावताना भीती कशी वाटत नाही तुला?

प्रोमीथ्यूस : काय कारण आहे मला भिण्याचे?
मरण माझ्या ललाटी लिहिलेलेच नाही!

सागरकन्यावृंद : तुला अधिक क्लेशदायक यातना देण्याची क्लृप्ती
शोधून काढील की झ्यूस!

प्रोमीथ्यूस : करू दे तर मग त्याला तसे!
माझी तयारी आहे कशालाही तोंड देण्याची!

सागरकन्यावृंद : शहाण्या माणसाने कसे नम्रपणे बोलावे,
अन् अटळ नियतीचे भय बाळगावे.

प्रोमीथ्यूस : लीन व्हावे? प्रार्थना करावी?
सत्ताधाऱ्यांच्या पायाशी लोळण घ्यावी?
सत्ताधाऱ्यांचे पाय चाटावे?
सत्ताधाऱ्यांची थुंकी झेलावी?
असाच ना याचा अर्थ?
त्या महान् झ्यूसची मी काडी मात्र पर्वा करीत नाही!
त्याला मन मानेल तसे करू दे
अन् स्वतःच्या मर्जीनुरूप राज्य करू दे–
जो काही अल्प काळ त्याच्या वाटयाला आला आहे तोपर्यंत.
फार काळ नाही टिकणार आता देवांवर त्याचे राज्य.
अरे पण– तिकडे पहा! हा आलाच त्याचा दूत,
नवोदित जुलुमशहाचा थुंकीझेल्या.
नक्कीच काही संदेश घेऊन आलाय तो.
**(हर्मीज प्रवेश करतो.)**

हर्मीज : मी तुला उद्देशून बोलतो आहे,
तुला– बुद्धिमंतांच्या अग्रणीला–
हृदय मात्र प्रत्यक्ष कटुतेपेक्षाही जास्त कडवट असलेला–
गौरव केलास तू
केवळ एक दिसाचे आयुष्य असलेल्या मर्त्य मानवाचा,
अन् केलेस पाप अमर देवांच्या विरुद्ध जाण्याचे.
अरे, अग्नीचौर्याचे दुष्कर्म करणाऱ्या–
तुला आज्ञा आहे त्या पित्याची :
ज्या विवाहामुळे तो सत्ताभ्रष्ट होणार आहे
अशी बढाई मारतोस तू
त्याबद्दल सांगून टाक! बोल आता.
अन् गूढ, संदिग्ध, कोडयांच्या भाषेत बोलू नकोस,
स्पष्ट शद्बांत मांड तपशीलवार संपूर्ण सत्य.
आणि प्रोमीथ्यूस, मला पुनः इतक्या लांबवर
फेरी मारायला लावू नकोस.
तुझ्या त्या तसल्या उत्तरांनी समाधान होणार नाही झ्यूसचे.

शद्ब वेगाने बाहेर पडताहेत, भरकटलेले असंबद्ध,
जाऊन आपटताहेत भयंकर विनाशाच्या लाटांवर.
(आइओ जाते.)

सागरकन्यावृंद : तो खरोखर शहाणा माणूस असला पाहिजे,
ज्याने प्रथम मनाशी समतोलपणे असा विचार केला
व तो बोलूनही दाखवला, की
सर्वांत उत्तम नियम हा की विवाह करावा
आपल्या समान दर्जाच्या व्यक्तीशी.
– हाताने कष्ट करणाऱ्या माणसाने
कधी धरू नये अभिलाषा
विवाह करण्याची अशा स्त्रीशी,
की जी लाडावली आहे संपत्तीने
अथवा गर्व आहे जिला आपल्या खानदानी कुळाचा.

हे नियतीदेवतांनो!
तुम्ही करता सर्व घटनांची परिपूर्ती–
न येवो पाळी तुमच्यावर पाहाण्याची
मला झ्यूसची शय्यासोबत करताना;
न येवो प्रसंग मजवर कुणा देवाशी विवाहबद्ध होण्याचा!
कारण थरकाप होतो माझा जेव्हा पाहाते मी आइओला,
मुकली आहे जी कुवारपणात पुरुषाच्या प्रीतीला,
आणि छळ होतोय निर्वासित अवस्थेत जिचा,
अखंड, अविश्रांत भ्रमंतीत,
हेराच्या क्रौर्यामुळे नशिबी आलेल्या.
विवाह बरोबरीच्याशी होणार असेल तर
वाटणार नाही मला भीती अथवा धोका.
पण त्या श्रेष्ठतर देवांच्या प्रीतीची मात्र
न पडो दृष्टी मजवर,
जिच्या प्रतिकाराचे सामर्थ्य नाही मजपाशी.
अशी लढाई आहे ती की जी लढताच येत नाही,

तो थेट मार्ग आहे नैराश्याचा.
अशा स्थितीत काय होईल माझे ते सांगू शकत नाही मी,
कारण मार्गच दिसत नाही मला झ्यूसने रचलेल्या व्यूहातून बाहेर पडण्याचा.

प्रोमीथ्यूस : मी शपथपूर्वक सांगतो : झ्यूस कितीही हट्टी असू दे,
शेवटी त्याला वाकावेच लागेल.
इतकी आपत्ती कोसळणार आहे त्याच्यावर
या नियोजित विवाहापायी–
हा विवाह उखडून टाकील त्याला
त्याच्या सिंहासनावरून व सार्वभौम सत्तेवरून,
अन् फेकून देईल विस्मृतीच्या गर्तेत!
आणि मग खरा होईल तो शाप–
जो दिला होता त्याच्या पित्याने, क्रोनसने,
जेव्हा गमावले त्याने आपले प्राचीन सिंहासन.
माझ्याशिवाय दुसरा कोणताही देव नाही असा
की जो सांगू शकेल त्याला मार्ग ही मानहानी टाळण्याचा.
मी जाणतो ते सगळे.
सध्या बसू दे त्याला शांत, स्वस्थ, विश्वासून
आपल्या दैवी गर्जनांमध्ये
हातामध्ये पारजीत ते अग्नीचे फूत्कार सोडणारे,
अशनी पाताचे आयुध–
ते रक्षण करू शकणार नाही त्याचे.
त्याचे पतन अटळ आहे– लाजिरवाणे, दुःसह!
उभा ठाकेल त्याच्याविरुद्ध असा प्रतिस्पर्धी–
जो सध्या निर्माण करीत आहे तो स्वतःच–
अन् अवतरेल एक अद्‌भुत चमत्कार
ठरेल ज्याचा प्रतिकार केवळ अशक्य,
तो हस्तगत करील एक ज्वाला
जी जास्त प्रखर असेल विजेच्या लोळांहून;
तो चिरून टाकील आपल्या शक्तीने–

# शृंखलाबद्ध प्रोमीथ्यूस

मघाशी जिथे थांबलो होतो तेथूनच
करतो आरंभ पुढच्या कथनाला.
नाइलचा पूर जिथे पसरून टाकतो
सगळा गाळ किनाऱ्यावर,
तिथे, भूमीच्या अंतिम टोकाला तिथे
वसले आहे कॅनोपस नगर,
त्या ठिकाणी अखेर झ्यूस आणील
तुझे मन ताळ्यावर.
आणि मग तो, मीलनोत्सुक असा, तुझ्याजवळ येईल,
तुला भयभीत न करता,
हळूवार स्पर्श करील.
त्याच्या हस्तस्पर्शाने जीवधारणा होईल तुझ्या गर्भात,
आणि जन्म देशील तू झ्यूसच्या काळ्यासावळ्या पुत्राला,
त्याच्या या अशा जन्मामुळे तू नामकरण करशील त्याचे 'इपॅफॉस'–
'स्पर्शोत्पन्न बालक' या अर्थाचे.
स्वामी होईल तो सर्व धान्यसंपत्तीचा,
जी पिकेल नाइलच्या रुंद प्रवाहाने
जलसिंचन केलेल्या सर्व भूप्रदेशांवर.
त्याच्यापासून पाचव्या पिढीत, कुटुंब पन्नास बहिणींचे,
अर्गोसला परत येईल मोठ्या अनिच्छेने,
चुलत बंधूंशी सपिंड विवाहाची सक्ती निकराने टाळण्यासाठी.
ते प्रणयासक्त तरुण त्यांच्या पावलावर पाऊल टाकीत करतील त्यांचा पाठलाग,
– जसा शिकारी ससाणे करतात
सावज म्हणून हेरलेल्या कबुतरांचा.
अतिष्ट अन् अवैध अशा वासनेने पेटतील ते,
पण देवांना रुचणार नाही
त्यांचा आपल्या बंधूंशी प्रणयसंगम.
अर्गोसच्या भूमीवर स्वागत होईल त्यांचे;
पण रात्र पडल्यावर बसेल
निर्धाराने केलेल्या हिंमती पहारा, आणि मग

स्त्रियांचे हात करतील युद्ध आणि संहार,
आणि पुरुषी अहंकाराचा होईल संपूर्ण पराभव.
प्रत्येक स्त्री घालील आपल्या पतीला कंठस्नान
आपल्या तीक्ष्ण तरवारीचा वार करून.
असली ही प्रीती येवो फक्त माझ्या शत्रूच्या वाट्याला!
एक मुलगी मात्र भारली जाईल
मधुर प्रणयाच्या जादूने आणि होईल बोथट धार तिच्या निर्धाराची,
अन् परावृत्त होईल पतीला ठार करण्याच्या निश्चयापासून.
म्हणेल, 'भेकड म्हणवून घेणे पत्करले,
खुनी बनण्यापेक्षा!' ती राहील मग अर्गोसमध्ये,
आणि होईल जन्मदात्री नृपतींची.
कालावधीने मग तिच्या मुलांच्या मुलांपासून
जन्माला येईल एक निर्भय वीर—
(फार वेळ जाईल मधल्या प्रत्येक पिढीचा मागोवा घेत गेलो तर)—
विख्यात होईल तो धनुर्धारी म्हणून,
तोच करील माझी सुटका या बंधनातून.
अशी आहे भविष्यवाणी जी मला सांगितली माझ्या मातेने
— तिचे नाव थेमिस, टायटन वंशातील, फार प्राचीन काळी जन्मलेली.
हे सर्व कसकसे घडून येईल
ते सांगण्याला फार वेळ लागेल मला
अन् तुझाही काही फायदा होणार नाही ते ऐकल्याने.
**(आइओ मध्येच दुःखाची एक भीषण किंकाळी फोडून त्याला थांबवते.)**

**आइओ :** वेडाचा झटका पुनः भाजून काढू लागला आहे मला,
मेंदू गरगरतो आहे, आणि ती गोमाशी
आपल्या अमर शराने मारत आहे डंख.
माझे हृदय फार जोराने धडधडते आहे माझ्या शरीरात,
गरगरा फिरताहेत, वळताहेत माझ्या नेत्रांची बुबुळे;
वेडाचा फटका बसतो आहे माझ्यावर एखाद्या सोसाट्याच्या वादळासारखा,
आणि उधळून लावतो आहे मला माझ्या वाटेवरून नेमलेल्या.
माझ्या जिभेवर ताबा ठेवता येत नाहीय् मला,

तशीच सावध राहा त्या अश्वारूढ, एकाक्ष,
ॲरिमास्पिअन लोकांच्या जमातीपासूनही–
जे भेटतील तुला प्लूटसच्या राज्यात
सुवर्ण वाहून आणणाऱ्या नदीच्या किनाऱ्यावर.
जाऊ नकोस त्यांच्याजवळ.
मग तू पोचशील अशा एका दूरच्या प्रदेशात,
जिथे सूर्यकिरणांच्या उज्ज्वल फवाऱ्यांजवळ,
राहाते एक जमात कृष्णवर्ण लोकांची.
तिथेच आहे ती इथिओपिआतील नदी. तिच्या प्रवाहाचा
मागोवा घेत जा खालच्या बाजूला,
त्या धबधब्याशी पोचेपर्यंत,
जिथे बिब्लिन पर्वतावरून
कोसळत नाइल नदी आपल्या प्रवाहातील पवित्र जलराशी
प्रदान करतो मानवाच्या तृषापूर्तीसाठी.
तो नदच तुला मार्गदर्शन करून
नेऊन पोचवील नाइलच्या मुखाजवळील सुपीक प्रदेशात.
आणि आइओ, तिथेच! तू आणि तुझे वंशज
अखेरीस स्थापन कराल आपली अतिदूरची वसाहत,
नियतीने निश्चित केलेली.
यातली कोणतीही गोष्ट संदिग्ध वाटली असेल,
अथवा समजण्याला कठीण गेली असेल,
तर पुन: विचारून घे.
नीट खात्री करून सारे समजल्याची.
भरपूर रिकामा वेळ आहे मला, अगदी नको वाटावा इतका.

सागरकन्यावृंद : अजून काही सांगावयाचे राहून गेले असेल
आइओच खडतर प्रवासाविषयी
तर ते सांगून टाक.
जर तसे नसेल तर मात्र आता बोल त्या दुसऱ्या गोष्टीविषयी,
जी सांगण्याची कृपा करण्याविषयी
विनवले होते आम्ही तुला - आठवते ना ते?

प्रोमीथ्यूस : आइओने ऐकला आहे संपूर्ण आराखडा तिच्या भ्रमंतीचा.
आणि शंका येऊ नये तिच्या मनात की
माझे शद्ब म्हणजे होती पोकळ बडबड,
म्हणून आता सांगतो कहाणी
तिने येथे येण्यापूर्वी भोगलेल्या यातनांची,
माझ्या शद्बांची यथार्थता पटविण्यासाठी.
ऐक आइओ! बहुतेक सगळा तपशील वगळून
एकदम वळतो तुझ्या अगदी अलिकडच्या भ्रमंतीकडे.
तू जाऊन पोचलीस मोलोसिआ देशाच्या मैदानावर,
आणि डोडोनाच्या वरच्या बाजूच्या खडकाळ भिंतीपाशी–
जिथे बसले आहे थेस्प्रोशियाच्या झ्यूस
कौल लावण्याचे स्थळ, ओक वृक्षांच्या वनराईत,
जिथे दिसतो ओक वृक्ष बोलल्याचा महान् चमत्कार,
ज्यावर विश्वास बसणे सुद्धा कठीण–
त्यांनीच तुला पुकारले अन् संबोधले स्पष्ट, निःसंदिग्ध शद्बांत,
झ्यूसची नियोजित वधू म्हणून.
पटला ना तुला या बाबतीतला खरेपणा?
तेथून मग पळत सुटलीस तू,
गोमाशीच्या डंखाने व्याकुळ होऊन,
समुद्रकिनाऱ्यावरील वाटेने, विस्तृत ॲड्रिॲटिक समुद्रापर्यंत.
तिथून पिटाळली तुला परत उन्मादाच्या वादळाने,
ती पिसाटासारखी धावतपळत येऊन पोचलीस या ठिकाणी.
आणि आता समुद्राचे ते आखात
ओळखले जाईल यापुढे सदैव– ऐक नीट–
'ओयोनियन' नावाने, राहील ज्यायोगे अखिल मानवजातीला चिरस्मरण
आइओच्या भ्रमंतीच्या कहाणीचे.
भविष्याचा वेध घेणारी माझी प्रज्ञा पाहू शकते
साध्या डोळ्यांनी दिसते त्यापेक्षा कितीतरी अधिक,
याचा पुरावा म्हणून सांगितले मी हे सगळे तुला.
आता सांगतो बाकीचे तुम्हा सर्वांना,

प्रोमीथ्यूस : हा देवांचा क्षुद्र सेवक! केवढे उच्च भासणारे भाषण
करतोय घमेंडीने ओतप्रोत भरलेले!
अरे! तू, अन् तुझे साथी फार छोटे आहात,
अन् तसेच छोटे तुमचे सामर्थ्य! अन् तुमची कल्पना अशी
की आपण कोणा एका अजिंक्य किल्ल्याचे ठाणेदार आहोत.
पण मी पाहिले आहेत दोन राजवंश, पूर्वीच,
त्याच उच्च स्थानावरून फेकले गेलेले
आणि आता पाहाणार आहे तिसऱ्याचीही तीच गत झालेली;
– हा सध्याचा अधिपती, त्याचेही पतन होऊन
तो फेकला जाणार आहे पृथ्वीवर–
पूर्वीच्या राजवंशापेक्षाही अधिक लज्जास्पद रीतीने,
आणि अधिक लवकर.
अशा उर्मट उपटसुंभ देवांपुढे मी थरथरा कापेन
अन् भीतीने दबून जाईन असे वाटते की काय तुला?
थोडाफार सुद्धा विचार करू नको असला–
आता आल्या वाटेने परत जा कसा तू–
येथे काही हाती लागणार नाही तुझ्या.

हर्मीज : अशा हट्टी आणि उर्मट वागणुकी पायीच
यापूर्वी एकदा स्वतःची क्लेशदायक दुर्दशा करून घेतली आहेस तू.

प्रोमीथ्यूस : लक्षात घे नीट! ही माझी क्लेशदायक दुर्दशा पालटण्यासाठी कोणत्याही अटीवर तुझ्यासारखी अपमानित लाचारी पत्करणार नाही मी.

हर्मीज : देवपिता झ्यूसचा विश्वासू दूत असण्यापेक्षा या खडकाचा
जखडलेला गुलाम म्हणून राहाणे निःसंशय अधिक चांगले, नाही?

प्रोमीथ्यूस : उन्मत्तांना साजेशीच आहे भाषा तुझी.

हर्मीज : सध्याची तुझी अवस्था मोठी सुखाची

अन् चैनीची वाटत असावी तुला, असं दिसतंय!

**प्रोमीथ्यूस :** असं वाटतं तुला? तर मग
एक दिवस असा यावा की जेव्हा मी पाहीन
माझे शत्रू असलीच चैन भोगत असलेले
अन् त्यात असावा तुझाही समावेश!

**हर्मीज :** मी काय म्हणून? तुझ्यावर ओढवलेल्या या आपत्तीबद्दल
मलाही दोष देतोस तू?

**प्रोमीथ्यूस :** एका शब्दात सांगू? तिटकारा वाटतो मला सगळ्याच देवांविषयी,
ज्यांना करावीशी वाटली मी केलेल्या उपकारांची फेड
मला आत्यंतिक अपमानित अवस्थेत ढकलून.

**हर्मीज :** हे उघडच दिसते आहे की तुझे वेड गेले आहे फार पुढच्या अवस्थेत.

**प्रोमीथ्यूस :** कदाचित् तसंही असेल– शत्रूचा द्वेष करणे हे वेड ठरत असेल तर.

**हर्मीज :** आता तू जर मुक्त होऊन अधिकारारूढ झालास
तर असह्यच होईल की ते साऱ्यांना!

**प्रोमीथ्यूस :** हाय!

**हर्मीज :** हाय? हा एक शब्द असा आहे की
जो कधीच ठाऊक झाला नाही झ्यूसला.

**प्रोमीथ्यूस :** पण पुढे पुढे सरकरणारा काळ शिकवतो सगळे काही!

**हर्मीज :** पण काळाने तुला मात्र शिकवलेले दिसत नाही
आत्मनियंत्रण किंवा शहाणपण-अद्याप तरी!

प्रोमीथ्यूस : नाही ना! त्याशिवाय का मी असा वाद घातला असता
एका क्षुद्र सेवकाशी?

हर्मीज : झ्यूसला समजायला हवंय ते काहीच सांगणार नाहीस तू, असं दिसतंय!

प्रोमीथ्यूस : आणि तरीही पण त्याचं पुष्कळ ऋण आहे मजवर
जे मी फेडणार आहे मोठ्या आनंदाने.

हर्मीज : चेष्टा करतोस माझी लहान पोर समजतोस मला?

प्रोमीथ्यूस : लहान पोरच नाहीस का तू? नव्हे पोरकटापेक्षाही वाईट.
कारण तू अजून अपेक्षा करतोस माझ्याकडून उत्तराची!
झ्यूसने कसाही छळ केला माझा, अन् कसलीही क्लृप्ती योजली
तरी मला तो भाग पाडू शकणार नाही
मजजवळचे रहस्य सांगण्याला, जोवर होत नाही
मुक्तता माझी या बंधनांच्या क्लेशांतून.
म्हणून होऊ दे आकाशातून वर्षाव भाजून काढणाऱ्या ज्वाळांचा,
हादरू दे सबंध पृथ्वी, अन् होऊ दे उलथीपालथी
शुभ्रपंखी हिमवादळांनी, अन् भूगर्भातील गर्जनांनी;
कोणतीही शक्ती उद्युक्त करू शकणार नाही मला,
कोणाची योजना केली आहे नियतीने
झ्यूसची जुलमी सत्ता उलथून पाडण्यासाठी हे सांगायला.

हर्मीज : पुन्हा एकदा विचार कर. हा मार्ग वाटतो का तुझ्या हिताचा?

प्रोमीथ्यूस : फार पूर्वीच केला आहे विचार या सगळ्याचा
अन् मगच केला आहे निर्धार.

हर्मीज : चल, हटवादी मूर्खा! अजून वेळ गेली नाही;
स्वत:च्या अवस्थेचा नीट विचार कर जरा अन् समजूतदारपणे वाग.

प्रोमीथ्यूस : व्यर्थ वाफ दवडतोस तू तोंडाची.
समुद्राच्या लाटांना उपदेश करण्यासारखेच आहे हे तुझे बोलणे.
अशी क्षणभरही समजूत करून घेऊ नकोस स्वतःची
की झ्यूसचा मानस काय असेल या भीतीने
मी वागेन स्त्रीसम भीरू वृत्तीने, किंवा
मुक्ततेची भीक मागेन दुबळे बायकी हात पुढे पसरून,
गुडघे टेकून माझ्या तिरस्करणीय वैऱ्यापुढे!
नाही! कदापि नाही!

हर्मीज : माझ्या शब्दांनी नुसते अधिकाधिक शब्द वाढताहेत, पण निष्फळ!
मी कितीही विनवण्या केल्या तरी तू शांत होणार नाहीस,
किंवा नरम येणार नाहीस.
अजून लगामाची सवय नसलेले शिंगरु जसे स्वतःची शक्ती अजमावून पाहाते,
लगाम तोडण्यासाठी धडपडते,
त्यातला पोलादी तुकडा दातात धरून चावत बसते,
तद्वतच आहे तुझी धडपड.
पण या तुझ्या साऱ्या दांडगाईच्या मुळाशी असलेला
तुझा हिशेबच मुळात चुकलेला आहे,
कारण मूर्खाच्या अंगच्या नुसत्या लंगड्या आडमुठेपणात
जोर नसतो अजिबात. आता याचा विचार कर की
पर्वतप्राय लाटांच्या वादळी तडाख्याप्रमाणे
कोणत्या शिक्षा कोसळणे अटळ आहे तुझ्यावर,
जर तू माझे ऐकण्याचे नाकारलेस तर.
पहिले असे की ही खडकाळ भेग
दुभंगण्यासाठी झ्यूस पाठवील
कडकडाट करीत येणारे लोळ विजेचे,
मग तू गाडला जाऊन भूगर्भ बनेल तुझे थडगे
या खडकाच्या मगरमिठीत जखडलेल्या अवस्थेतच.
मग एक सुदीर्घ युग लोटल्यावर तू येशील पुनः भूपृष्ठावर प्रकाशात,

अन् मग येईल कृष्णवर्णी पंख फडफडपणारा
झ्यूसचा क्रूर शिकारी गरुड पक्षी
आगंतुकपणे मेजवानीचा आस्वाद घेण्यास;
सारा दिवस लचके तोडेल तुझ्या मांसाचे,
अन् ताव मारील तुझ्या यकृतावर
ते कुरतडून काळे पडेपर्यंत.
मग करू नकोस तसल्या यातनांतून सुटकेची आशा.
जेव्हा तयार होईल कोणी देव
तुझे क्लेश स्वतावर घेण्याला
अन् जाण्याला स्वेच्छेने थेट खाली पाताळलोकात
– जिथे पोचत नाही प्रकाश सूर्याचा,
आणि अंधकारमय टार्टारसच्या कुहरात
– तेव्हाच काय ती सुटकेला आशा.
म्हणून म्हणतो, पुन: विचार कर. आता सांगितले ते सगळे
म्हणजे कपोलकल्पित वल्गना नाहीत,
तर सत्य आहे ते झ्यूसने स्वमुखाने सांगितलेले!
अन् झ्यूस कधी असत्य उच्चारील हे शक्यच नाही,
खरा करतो तो प्रत्येक शद्ब त्याच्या मुखातून निघालेला.
सर्व बाजूंनी नीट परीक्षण अन् विचार कर,
अन् एवढी खात्री असू दे
की शहाणपणाच्या सल्ल्याप्रमाणे वागणे
हे केव्हाही अधिक हितावह असते आडमुठेपणापेक्षा.

सागरकन्यावृंद : हर्मीज सांगतो ते सूज्ञपणाचे वाटते आम्हाला.
तो सांगतोय तुला की सोडून दे प्रतिकार
अन् घे सल्ला तुझ्या हिताचा.
तसेच कर तू. शहाण्याने मूर्खपणा करणे म्हणजे
प्रतिष्ठा गमावून बसणे.

प्रोमीथ्यूस : मी जाणून होतो हर्मीस काय सांगणार ते,
त्याच्या या बढाईखोर भाषणापूर्वीच.

आपल्या वैऱ्याच्या हातून यातना भोगणे
यात वैर करणाराची अप्रतिष्ठा होत नसते.
चढवू दे हल्ला त्याला मजवर तीक्ष्ण विजेच्या लोळांचा,
दुमदुमून उठू दे वातावरण विजेच्या कडकडाटांनी
अन् झंझावाती वाऱ्याच्या तडाख्यांनी.
टाकू देत तुफाने उखडून मुळापासून पाया पृथ्वीचा,
उसळू दे उग्र थैमान समुद्राच्या लाटांचे,
ज्यायोगे स्वमार्गभ्रष्ट होतील तारे आकाशीचे;
खुशाल उंच उचलून द्यावे त्याने मला अंधाऱ्या टार्टरसच्या गर्तेत–
दुर्दम्य कर्मभोगाच्या निर्घृण महापुरात;
पण मला कदापि मरण नाही त्याच्यापासून!

हर्मीज : असले विचार अन् असले शब्द
ऐकायला मिळू शकतात फक्त माथेफिरु वेड्याच्या तोंडून.
आताच्या या त्याच्या प्रार्थनेत
होती सगळी लक्षणे उन्मादाच्या लहरीची,
अन् मला तरी कुठलेच चिन्हे दिसत नाही सुधारणा होण्याचे.
(सागरकन्यावृंदाला उद्देशून)
याच्या क्लेशाविषयी सहानुभूती बाळगणाऱ्यांनो,
तुम्ही मात्र त्वरित निघून जा येथून, नाहीतर–
अशनीपाताच्या असह्य कडकडाटाने
इंद्रिये बधीर होतील तुमची.

सागरकन्यावृंद : माझे मन वळवू इच्छित असशील तर,
निराळ्या रीतीने बोल, अन् सल्लाही दे निराळा.
फार उतावीळपणे बोलतोस तू, अन् सांगतोस मला करण्याला
ज्याचा विचार सुद्धा करू शकणार नाही मी.
मी भ्याडपणाने वागावे असा सल्ला देतोस तू?
प्रोमीथ्यूसपाशीच राहाणार मी, मग परिणाम काही होवो!
मित्रांना संकटात सोडून जाणाऱ्यांचा तिरस्कार
करण्याची शिकवण मिळाली आहे मला;

सर्वात जास्त तिटकारा वाटतो मला तो त्याच दुष्कीर्तीचा.

हर्मीज : लक्षात ठेव तर मग माझा इशारा,
आणि जेव्हा आपत्ती कोसळेल तुझ्यावर,
तेव्हा दोष देऊ नकोस दैवाला,
किंवा असे म्हणू नकोस की
ढकलले तुला झ्यूसने
अनपेक्षित दुःखाच्या खाईत.
(कारण) तो दोष ठरणार नाही झ्यूसचा,
तो दोष सर्वस्वी तुझाच!
काय घडणार आहे हे आधीच जाणतेस तू–
ते आकस्मिक नाही अथवा गुप्तही नाही.
केवळ तुझ्या मूर्खपणामुळेच अडकणार आहेस तू
ज्यातून बाहेर पडता येणार नाही
अशा विनाशाच्या जाळ्यात.
**(हर्मीज निघून जातो.)**

प्रोमीथ्यूस : आता हे प्रत्यक्षात घडू लागणार आहे–
धमक्यांच्या जागी कृतीचा प्रारंभ झाला आहे.
पृथ्वी हादरू लागली आहे; वादळाच्या कडकडाटाचा
खोलातून येणारा प्रतिध्वनी प्रतिसाद देऊ लागला आहे;
विजेचे लोळ चमकून उठत आहेत,
धुळीचे चक्रीवादळ नृत्य करीत आहे;
चारी दिशांतील वाऱ्यांच्या प्रचंड झोतांची चकमक उडू लागली आहे,
अन् सुसज्ज होताहेत ते लढाईसाठी.
आकाश आणि समुद्र खवळले आहेत –
भिन्नता लोपली आहे उभयतांच्या खवळण्यातील.
माझ्यावर चाल करून येणारा हा प्रलय स्पष्ट होत आहे–
मला भयभीत करण्यासाठी झ्यूसने पाठवलेला.
हे माझ्या पवित्र पृथ्वीमाते!

हे आकाशा– जेथून आळीपाळीने सूर्य आणि चंद्र
प्रकाश देतात सकळांना–
पाहाता आहात ना तुम्ही माझ्यावर होणारा हा घोर अन्याय!

**(खडक कोसळून अदृश्य होतो व सागरकन्यावृंद चौफेर विखुरला जातो.)**

## समाप्त